

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका





दीपावली दिवाळी १९५९

# PUT YOUR FINGER ON

*New Manohar packaging!*





FIRST PRIZE WINNERS OF
GOVERNMENT OF INDIA
STATE AWARD 1958
FOR 'PACKAGINGS'

**SPECIALISTS IN
MODERN PACKAGINGS &
SALES AIDS OF ALL TYPES.**

PHONE:- 27754 GRAMS:- NUMANOHAR

## NEW MANOHAR PRESS

ANGREWADI, V.P. ROAD, BOMBAY-4.

TOM & BAY






श्रीदत्तात्रय रामतीर्थे नगरीं गर्भात आले पहा। माता देवि बया, मनोहर पिता, लाडाख्य ॑द्वाचिया॥
ग्रामीं बालचरित्र दावुनि जना कल्याण क्षेत्रासि ये। तो हा दत्त प्रभु निजात्म भुवनीं माणीक क्षेत्रीं असे॥



अनुक्रमणिका



# दी पा व ली

साहित्य—कला—संगम

ं १५ वें नोव्हेंबर १९५९




संपादक :

**दीनानाथ दलाल**


## श्रेयनामावलि






दलाल आर्ट स्टुडिओ . ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

चित्रांचे सेट्स् :

१९५५ रु. १॥, १९५८ रु. २ ; १९५९ रु. २॥ तिन्हीएकत्रित रु. ; अधिक र. पो. ७५ न. पैसे.






## हृद्गत



संयुक्त महाराष्ट्राच्या शुभागमनाच्या ललकाऱ्या कानीं येऊं लागल्या आहेत. खडतर महागाईच्या दिवाळींतहि या शुभवार्तेमुळें मराठी माणसांचें मन आनंदित आणि प्रफुल्लित झालें आहे. फार दिवस उराशीं बाळगलेलं साडेतीन कोट मराठी माणसांचं गोड स्वप्न आतां साकार होणार ! अशा आनंदमय वातावरणांत आम्हालाहि प्रतिवर्षाप्रमाणें दीपावलीचा हा अंक वाचकाच्या हातीं देतांना अत्यंत आनंद होत आहे.

पंधरा वर्षांपूर्वी दीपावलीनें वार्षिकांच्या प्रांगणांत पदार्पण केलें आणि त्या दिवसापासून मराठी वाचकांच्या हृदयांवर अढळ स्थान मिळविलें. यामुळें प्रतिवर्षी दीपावलीवर फार मोठी जबाबदारी पडली. यंदा तर 'दीपावली' मासिक रूपांत प्रसिद्ध होऊं लागली, आणि त्यामुळें दरवर्षापेक्षां दीपावली–दिवाळी अंकाचें स्वरूप वेगळें आणि आकर्षक, ढंगदार आणि नवलाईचें, असें ठेवण्याची अवघड जबाबदारी आमच्यावर येऊन पडली. दीपावलीला आपली मानणाऱ्या विविध क्षेत्रांतील अनेक मान्यवर व्यक्ति आणि संस्था सहकार्यासाठीं हात पुढें करतात म्हणून अशा अवघड जबाबदारींतून आम्ही सहज पार पडतों. प्रा. मं. वि. राजाध्यक्ष, पु. भा. भावे, स. आ. जोगळेकर, ग. दि. माडगूळकर, अच्युत बर्वे हे लेखकमित्र सदैव दीपावलीच्या पाठीशीं असतात. श्री. बाळ सामंत आणि गोपाळकृष्ण भोबे यांचें अंकाची योजना आणि अंमलबजावणी याबाबत मोलाचे साहाय्य झालें.

'टॉम अँड बे'चे श्री. गणेशराव तांबे यांनी जाहिरात रूपानें दीपावलीला 'प्राणवायु' पुरविण्यांत इतकी तत्परतेनें मदत केली आहे कीं त्यांचे नी आमचे जुने घनिष्ठ संबंध असूनहि त्याचा निर्देश केल्यावांचून राहावत नाहीं. नागपूरच्या भारतविख्यात शिवराज फाईन आर्टचे श्रीमंत बाबुराव धनवटे आणि त्यांचे बंधू यांच्याकडे दीपावलीच्या रंगीत छपाईचें श्रेय आणि न्यूभारत प्रिंटिंग प्रेसचे श्री. चिंतामण देसाई आणि त्यांच्या मुद्रणालयांतील कुशल कामगार बांधव यांच्याकडे आंतील छपाईच्या उत्कृष्टपणाचें श्रेय. याशिवाय जगदीश्वर प्रेसचे श्री. भालचंद्र पाठक आणि त्यांच्या प्रेसमधील कामगारवर्ग यांचेंहि परोपरीनें साहाय्य होत असतें. आमचे हितचिंतक श्री. रा. ज. देशमुख आणि श्री. श्री. स. दाभोळकर यांचे नी दीपावलीचे संबंध इतके जुने आहेत कीं ते नेहमीं अडल्या वेळीं साहाय्याला धांवून येत असतात. ब्रॉंबे प्रोसेसचे श्री. मोहनराव कामत आणि प्रभात प्रोसेसचे श्री. विष्णुपंत कडव यांची कामगिरी उत्तम ब्लॉक्स करून देण्याची. साधना प्रेसचे श्री. मेघर्जीभाई यांनींहि रंगीत छपाईची कांहीं जबाबदारी हौसेनें उचलली. निर्मिति क्षेत्रांतील आमचे सहकारी श्री. श्रीकृष्ण ठाकूर, श्री. परब, आणि श्री. म. सु. देसाई व वितरण क्षेत्रांतील श्री. बाबुराव बागवे हे दीपावलीचे प्रमुख आधारस्तंभ.

या सर्व व्यक्ति आणि संस्था यांच्या अगत्यपूर्वक साहाय्याचें मोल इतकें मोठें आहे कीं तें शब्दांनीं वर्णन करणें अशक्य आहे. आणि त्यामुळेंच त्यांच्या ऋणाचें मोल कमी करण्याची इच्छा नसल्यामुळें आम्ही त्यांचे औपचारिक आभार मानीत आहोंत. मात्र त्याचा आवर्जून निर्देश करणें हें आमचें पहिलें कर्तव्य आहे. या सर्वांचा आणि वाचकांचा लोभ असाच निरंतर रहावा अशी मनःपूर्वक इच्छा.

आमचे असंख्य वाचक, लेखक, हितचिंतक, जाहिरातदार, मुद्रक आणि विक्रेते या सर्वांना दीपावलीच्या आणि नव्या वर्षाच्या शुभकामना.


प्रकाशन स्थळ :
**दलाल आर्ट स्टुडिओ**
४०/४२ केनेडी ब्रिज
मुंबई ४

ऑफसेट प्रिंटिंग :
**श्री शिवराज फाईन आर्ट लिथो वर्क्स**
नागपूर.

मुद्रण स्थळ :
**न्यू भारत प्रिंटिंग प्रेस**
६ केळेवाडी गिरगांव
मुंबई नं. ४

ब्लॉक्स :
**ब्रॉंबे प्रोसेस स्टुडिओ**
मुंबई.
**प्रभात प्रोसेस स्टुडिओ**
मुंबई.







अनुक्रमणिका




# उःशाप

वि. स. खांडेकर

तमसेचें पाणी खळखळत वाहत होतें. जणु ती गात होती, महाकवि वाल्मिकींच्या पवित्र हस्तांनीं सकाळ संध्याकाळ दिल्या जाणाऱ्या अर्घ्यांतून तिला नवजीवन मिळत होतें. त्या जीवनांतून हें संगीत स्फुरत होतें.

पण तमसेच्या तीरावर बसलेल्या एका व्यक्तीला हें मधुर संगीत ऐकूं येत नव्हतें. ती व्यक्ति पुनःपुन्हां नदीच्या पात्रांत डोकावून पाहत होती. तिचें काय हरवलें होतें आणि तमसाहि तें तिला कसें शोधून देणार होती तें त्या दोघांनाच ठाऊक !

पाहतां पाहतां ती व्यक्ति एकदम दचकली. तिनें झटकन् मान वळवून मागें पाहिलें. तो किलबिलणाऱ्या पांखरांचा थवा नव्हता ! ऋषिकुमारांचा घोळका होता. अरण्यांतल्या वाटेनें चालतां चालतां तो घोळका एकदम थांबला होता. त्यांतला एक कुमार नदीतीराकडे पाहत म्हणाला, ‘ कोण रे तें ? ’

दुसऱ्या वेंधळ्या मुलानें विचारलें, ‘ कुठं, कुठं ? ’

‘ तो पहा, तो पहा. तमसेच्या तीरावर कुणीतरी मनुष्य बसला आहे. ’

‘ बसूं दे. ’ तिसरा अति व्यवस्थित कुमार उद्गारला, ‘ आपल्याला त्याच्याशीं काय करायचंय ? पीत असेल कुणी नदीचं पाणी ! आज आश्रमांत रामायण-गायन होणार आहे. ऋषिमहर्षी तें ऐकायला आले आहेत, येताहेत, त्या सर्वांच्या पर्णकुटिका स्वच्छ ठेवणं, गोळा करून आणलेल्या या फुलांचे गुच्छ करून तें त्यांना देणं, हीं कामं आतां लवकर पार पाडलीं पाहिजेत. आल्यागेल्या वाटसरूची चौकशी करीत बसायला इथं वेळ कुणाला आहे ? ’

पहिल्या कुमारानें हें सारें बोलणें शांतपणें ऐकून घेतलें. मग तो म्हणाला, ‘ या तमसेच्या तीरावरच भगवान् वाल्मिकींवर देवी सरस्वती प्रसन्न झाली. एक क्रूर कृत्य पाहून त्यांची करुणा उचंबळून आली. अशा महाकवीच्या आश्रमांतले शिष्य आहोंत आपण हा नदीच्या कांठावर असलेला मनुष्य एखादा दीन, दुःखी जीव असेल ! त्याला आपण आश्रमांत नेऊं. महर्षींना भेटवूं ते त्याचं दुःख हलकं करतील ! ’

*वाल्मिकींच्या शापवाणींनं महाकाव्याचा आविष्कार झाला, असें शतकानुशतकें आबालवृद्ध मानीत आले. त्या शापाच्या प्रसंगाला दुसरीं कांहीं बाजू असेल, याची कुणाला कल्पनाहि नव्हती; परंतु ती बाजू कळली तेव्हां वाल्मिकींच्या डोळ्यांत मात्र पाणी उभं राहिलं......*

अस्तांपर्यंत न बोललेला एक वृद्ध एकदम पुढें आला आणि म्हणाला, ' अहो कविमहाशय, तुमचं पांडित्य पुरें करा. म्हणे हा कुणीतरी दुःखी जीव असेल ! अरे वेड्या, आपण रामराज्यांत राहतों. या राज्यांत मनुष्य दुःखी असणं शक्य आहे का ? या राज्यांत दैन्य औषधालातरी मिळेल का ? तसं असतं तर भगवान वाल्मिकींनी रामाला आपल्या महाकाव्याचा नायक कधीच केला नसता ! '

इतर कुमारांशीं वाद घालण्यांत अर्थ नाहीं असें पहिल्या कुमारानें मनाशी ठरविलें. तो रुक्ष स्वरानें म्हणाला, ' तुम्ही चला आश्रमाकडं पर्णकुटिका शृंगारा. पाहुण्यांची उठाबस करा. फुलांच्या माळा गुंफा ! हा मनुष्य कोण आहे, इतका वेळ तो नदीच्या कांठावर कां बसला आहे हें कळल्याशिवाय मी आश्रमाकडं येणार नाहीं. '

तो कुमार घोळक्यांतून बाहेर पडला आणि तीरासारखा तमसेच्या काठीं आला. खाली मान घालून बसलेल्या त्या पुरुषाकडे त्याने निरखून पाहिलें. तो त्याला ओळखीचा वाटला नाहीं. त्याच्याजवळ जाऊन कुमार मृदु स्वराने म्हणाला, ' महाराज,—'

त्या पुरुषाने चमकून मान वर केली आणि मागे वळून पाहिले. कुमार त्याच्या मुद्रेकडे निरखून पाहूं लागला. तो एक वार्धक्याकडे झुकलेला ओबडधोबडे पुरुष होता. तरुणपणीं त्याची अंगकाठी खूप वळकट असावी ! कदाचित् तो एखादा प्रसिद्ध धनुर्धरहि असेल ! त्याचे बाहू अजूनहि पिळदार दिसत होते. त्याच्या डोक्यावरल्या रुक्ष जटा काळ्यापांढऱ्या केसामुळें अर्धवट वाळलेल्या गवताच्या पुंजक्याप्रमाणें दिसत होत्या. तो एक फाटकें वल्कल नेसला होता. त्याचे पाय धुळीने भरले होते. तमसेच्या कांठावर इतका वेळ बसूनहि ते त्याने धुतले नव्हते. तो कोण असावा याचा कांहीं केल्या कुमाराला तर्क करतां येईना !

त्या अनोळखी पुरुषाने त्याला प्रश्न केला, ' बाळ, वाल्मिकि-ऋषींचा आश्रम इथं कुठं जवळच आहे ना ? '

वाल्मिकिऋषि ? एक वचन ? हा कुणी तरी असभ्य मनुष्य असावा असें कुमाराला वाटलें. पण आपला भाव मुद्रेवर दिसूं न देतां त्यानें उलट विचारले, ' भगवान वाल्मिकींचा आश्रम ? '

' भगवानबिगवान मला कांहीं ठाऊक नाहीं ! वाल्मिकि नांवाचा एक ऋषि या बाजूला पूर्वी राहत होता. त्याला भेटायचंय् मला. '

नागरसंस्कृतीशीं अपरिचित असलेला हा कुणीतरी रानटी मनुष्य असावा अशी कुमाराला शंका आली. त्याने विचारलें, ' भगवान् वाल्मिकींची आणि तुमची ओळख आहे ? '

' मी त्यांना चांगलं ओळखतों. इतकी वर्षे झालीं ! पण त्यांची आठवण झाली नाहीं असा एक दिवस गेला नाही माझा. '

कुमार क्षणभर विचारमग्न झाला. मग तो म्हणाला, ' मी त्यांच्याच आश्रमांतला एक शिष्य आहे. माझ्याबरोबर चला तुम्ही तिकडं. पण महर्षी लगेच तुम्हाला भेटणार नाहींत ! '

' तें कां ? '

' त्यांनी रामायण म्हणून एक सुंदर महाकाव्य रचलं आहे. मोठमोठ्या विद्वान् मंडळींपुढं त्यचं गायन होणार आहे आत्तां. '

' रामायण ? काय आहे या रामायणांत ? '

' राजा रामचंद्राची पवित्र कथा आहे ती ! '

' राजा रामचंद्र ? अयोध्येचा राजा राम ? ' उपहासाने हंसत तो पुरुष पुढे म्हणाला, ' चार लोक तोंडाला येईल तें बोलत सुटले, म्हणून आपली बायको टाकून देणारा राम ? '

कुमार दचकला. हा मनुष्य वेडाबिडा तर नाहीं ना अशी आतां त्याच्या मनांत शंका आली. तो गडबडीनें म्हणाला, ' माझे सारे सोबती पुढं गेले. आश्रमांत जायला उशीर होतोय् मला ! '

तो मनुष्य उठला आणि त्याला म्हणाला, ' चल, मीहि येतों तुझ्याबरोबर. वाल्मिकी मला सावकाश भेटले तरी चालेल. '

कुमार गोंधळून गेला. पण आतां या विक्षिप्त व्यक्तीला टाळणें त्याला शक्य नव्हतें.

दोघे बरोबर चालूं लागले. चालतां चालतां तो पाहुणा प्रत्येक मोठ्या झाडाकडे पाहात होता. तो एकदम मध्येंच थांबला. एका वृक्षाच्या आडव्या फांदीकडे टक लावून पाहूं लागला. कुमारानें विचारलें, ' काय पाहतांय् एवढं ? '

पाहुणा उत्तरला, ' माझा जुना मित्र आहे हा ! त्याच्याशीं थोडा बोलतोंय् ! '

कुमार आश्चर्यानें उद्गारला, ' म्हणजे ? तुम्ही या भागांत पूर्वी राहत होता ? '

' हो ! पुष्कळ वर्षे झालीं त्याला. '

' इथून कुठं गेलां ? '

' कुठं ? कुठं म्हणून सांगूं ? एकसारखा भटकतोंय् मी. डोकं टेकायला कुठं जागाच मिळत नाहीं मला ! काय सांगूं पोरा, मला गांव नाहीं, मला नांव नाहीं; फक्त हा जीव आहे ! तो कांहीं केल्या जात नाहीं रे ! '

कुठल्या तरी भयंकर दुःखानें पाहुण्याचें मन भारावून गेलें आहे हें कुमारानें ओळखलें. तो मुकाट्यानें पुढें चालूं लागला.

भगवान् वाल्मिकीचे रामायण गायन सुरू झालें. आश्रमांतल्या एका भव्य वृक्षाखालीं उंच जागीं बसलेल्या वाल्मिकींच्या मुखांतून श्लोकामागून श्लोक बाहेर पडूं लागले. पावसाळ्याच्या प्रारंभींच्या सरीसारखे ते सर्वांना शीतल आणि सुखदायक वाटेल. त्या ध्येयामुळें श्रोत्यांचीं मनें टवटवलीं. हिरवीगार होऊन पुढल्या जीवनस्पर्शाची आतुरतेने वाट पाहूं लागलीं. '

महर्षि रामकथा गात होते. तिच्यांतल्या काव्याने, नाट्याने आणि कारुण्याने श्रोतृवृंद तल्लीन होऊन गेला होता. वयस्क ऋषिमुनि पुनः पुन्हा ' साधु ! साधु ! ' असे उद्गार काढीत होते. एखादी सुंदर उपमा आली किंवा मार्मिक स्वभावच्छटा प्रगट झाली की श्रोत्यांतली पंडित मंडळी प्रसन्न मुद्रानी माना डोलावीत होती.

आबालवृद्ध श्रोत्यांच्या या आनंदांत सहभागी न होणारी एकच व्यक्ति त्या समाजांत होती. ती म्हणजे कुमाराबरोबर आश्रमांत आलेला तो पाहुणा ! तो दूर एका कोपऱ्यांत बसला होता. जिकडे-तिकडे सुंदर चांदणें पसरावें, त्यांत वृक्षवेलींनी नाहून निघावें पण अरण्यांतल्या एखाद्या निबिड जाळींत मात्र अंधारच असावा तसा तो निर्विकार पाहुणा वाटत होता ! काव्यांतली रामसीता वनवासाला

निघालीं. सारी अयोध्या रडूं लागली. तें वर्णन कविमुखाने ऐकतां ऐकतां संयमी म्हणून गाजलेल्या ऋषिमुनींचेहि डोळे पाणावले. पण हा पाहुणा मात्र एखाद्या शिलाखंडाप्रमाणे स्तब्ध बसला होता ! हें दुःख त्याच्या गांवींहि नसावें.

महर्षि वाल्मिकींच्या मुखांतून श्लोकामागून श्लोक बाहेर पडत होते. भगवान शंकराच्या मस्तकांतून निघणाऱ्या गंगेच्या तरंगाप्रमाणे !

कथाभाग सीताहरणापर्यंत आला. रात्र होतांच आकाशांत एक एक चांदणी उगवावी, हां हां म्हणतां आभाळ लाखो चांदण्यांनी फुलून जावें, आणि नील गगनाला एक अपूर्व शोभा यावी, तशी आतां श्रोतृवृंदाच्या मनाची स्थिति झाली होती. रामाचा पराक्रम, सीतेचें सौंदर्य, कैकेयीचा हट्ट, राम, लक्ष्मण व सीता यांचा त्याग, सारें सारें आदिकवींनी मोठ्या अपूर्वशैलीने वर्णन केलें होते. पण आता जो प्रसंग येणार होता, तो—

सारी सभा जीवाचा कान करून पुढला कथाभाग ऐकूं लागली. कांचनमृगाचें आगमन होतांच दोनतीन ऋषिपत्नींच्या मुखांतून चुक्‌चुक् असा आवाज नकळत निघाला ! आगामी दुःखाची छाया साऱ्या श्रोतृवृंदावर पसरली.

दूर कोपऱ्यांत बसलेला पाहुणा मात्र कांचनमृगाचें नांव निघतांच उल्हसित झाला. धनुष्याला बाण लावून तो सोडावा तसे हातवारे त्यानें उगीचच केले. एकदोन शिष्यांचे लक्ष त्याच्याकडे गेलें. त्याचे ते हातवारे त्यांना वेड्यासारखे वाटले. त्याच्याजवळ जाऊन ' स्वस्थपणें कथा ऐका ' असें गोड शब्दांत त्यांनीं त्याला सांगितलें.

लगेच तो पाहुणा एखाद्या पुतळ्यासारखा निश्चल झाला. नदी नवीं वळणें घेत घेत भरभर समुद्राकडे जाते, तशी कथा पुढें चालली होती. रावण आला. त्यानें सीतेला उचलली. सीता आक्रोश करूं लागली. सारी सभा करुण रसांत बुडून गेली. एकदोन तापसी स्त्रिया डोळे पुशीत उठल्या आणि बाहेर गेल्या. त्यांना पुढचा कथाभाग ऐकवेना. आकाशांतून सीतेला घेऊन जाणाऱ्या रावणाची, स्कंधावर वीज धारण करणाऱ्या कृष्णमेघाशीं कवीनें केलेली तुलना पाहून कांहीं पंडित ऋषि इतके आनंदित झाले कीं नकळत त्यांनी टाळ्या वाजविल्या ! लगेच आपल्या कृतीची त्यांची त्यांनाच लाज वाटली. प्रसंग कारुण्यानें ओतप्रोत भरलेला, सीता आक्रोश करीत असलेली, श्रोतृवृंद दुःखांत बुडून गेलेला आणि

ती पंडित मंडळी खालीं मान घालून पुढला कथाभाग ऐकूं लागली. मात्र सीतेच्या करुण आक्रोशाचा पुतळ्याप्रमाणें निश्चल बसलेल्या त्या पाहुण्यावर कांहींहि परिणाम झाला नाहीं.

कथा हरणाच्या वेगानें पुढें धावूं लागली. राम आश्रमांत परत आला. तिथें सीता नाहीं हें पाहून व्याकुळ झाला. ' हा सीते, हा सीते ' म्हणून तो शोक करूं लागला. ती गोदावरीवर पाणी आणायला गेली असेल म्हणून तो नदीतीरावर गेला. तिथें वृक्षांना कवटाळून वेली नेहमींप्रमाणें हंसत उभ्या होत्या. पक्ष्यांची जोडपीं नदीच्या प्रवाहांत आनंदानें क्रीडा करीत होतीं. फक्त राम तेवढा एकटा होता ! सीते, सीते, जानकी, जानकी. ' अशा मोठमोठ्यानें त्यानें हांका मारल्या. भोंवतालच्या वन-भागांतून या हांकांचा प्रतिध्वनि तेवढा परत कानीं पडला !

## असेंच कांहीं—

— कुसुमाग्रज



आकाशाला वाटतें
आपण गाणें म्हणावें
ती विराटता उतरते बासरींत
स्वल्प रूपानें
आणि सात स्वरांच्या गवाक्षांतून
बाहेर पडताना
स्वतःच होतें गाणें.
सागराला वाटते
आपण पाहावा पर्जन्य
उजाड मरुभूमीवर झिमझिमणारा,
मेघांच्या रथांत बसून
तो जातो मरुभूमीकडे
आणि रथांतून उतरल्यावर
स्वतःच होती
पर्जन्याची धारा.
प्रकाशाला वाटते
आपण पाहावी दिव्यांतील ज्योत
विजनांत जळणारी,
स्फुलिंगरूपानें तो उतरतो दिव्यांत
आणि जळत बसतो
स्वतःच ज्योत होऊन
पडशाळेच्या दाराशी.
असेंच कांही तरी
तुला वाटलें
तूं आलास स्वतःच्या बाहेर
अलिप्तता ओलांडून
आणि हें सारें निर्माण करतां करतां
स्वतःच झालास निर्मिती
या विश्वांतली.

राम रात्रभर आश्रमाभोंवतालचा वनभाग शोधीत होता. लता-कुंज, वनगुंफा, जिथें जिथें म्हणून सीता कधीं ना कधीं गेली होती, बसली होती, विसावली होती, तिथे तिथे तो गेला. रात्रीं चांदणें पडल्यावर, सीतेचें पाऊल कुठें उमटलेलें दिसतंय् का हें पाहण्यासाठीं त्यानें वनांतल्या अनेक पाऊलवाटा न्याहाळल्या. पण ती कुठें गेली असावी हें सांगणारी एकहि खूण त्याला मिळाली नाहीं ! तो वेड्यासारखा झाला. वृक्षलतांना, पुष्पकळ्यांना आणि हरिणशावकांना ' सीता कुठं तुम्हांला दिसली का ? ' असें व्याकुळ स्वरानें तो विचारूं लागला.

रामाचा शोध आणि विलाप सुरूं होतांच कोपऱ्यांत बसलेला पाहुणा चुळबुळ करूं लागला. तो पळा-पळाला अधिक अधिक अस्वस्थ होऊं लागला. त्याच्या मुद्रेवरला दगडी मुखवटा क्षणार्धांत गळून पडला. किती तरी सूक्ष्म, आर्त करुणभाव त्याच्या ओबड-धोबड चेहऱ्यावर आलटून पालटून आपलें अस्तित्व प्रगट करूं लागले. आपल्या राकट हातांचीं बोटें एकमेकांत गुंतवून तो त्यांची चाळवाचाळव करूं लागला. असे कांहीं क्षण गेले. मग त्यानें आपली मान खाली केली. दोन्ही हातांनी मस्तक घट्ट धरून तो बसला. आणखी कांहीं क्षण गेले. मग एक अस्फुट हुंदका त्याच्या तोंडून बाहेर पडला. त्या शांत सभेंत तो सर्वांना ऐकूं आला ! पुढल्याच क्षणी दोन्ही हातांनी तोंड झांकून घेऊन तो ओक्साबोक्सी रडूं लागला.

भगवान् वाल्मिकींचें लक्ष त्याच्याकडे गेलें. त्यांचे काव्यगायन थांबलें.

तो कोण होता, कां रडत होता, हें कुणालाच कळलें नाहीं ! सारे त्याच्याकडे टकमक पाहूं लागलें. इतक्यांत दोनतीन शिष्य त्याच्या जवळ गेले. त्यांनी त्याचा हात धरून हळूहळू त्याला दूर नेलें.

पुष्कळ वेळानें तो पाहुणा परत आपल्या जागेवर येऊन बसला. आतां त्याचें मन शांत झालें असावें ! त्याची मुद्रा पहिल्यासारखी अगदीं दगडी दिसत होती.

कथेचा ओघ पळापळाला पुढे धांवत होता. सीतेची अग्निशुद्धि झाली. प्रभु रामचन्द्र पुष्पक विमानांतून अयोध्येला परत आले. राज्याभिषेकाचा आनंदी आनंद जिकडे तिकडे पसरला. त्यांतच सीतेला डोहाळे लागले. आणि नेमकी याचवेळीं तिच्या शुद्धतेविषयीं प्रजाजनांना वाटणारी अमंगल शंका रामाच्या कानांवर पडली ! त्याने तिचा त्याग करण्याचा निर्णय घेतला.

या प्रसंगाचें गायन करतांना खुद्द वाल्मिकींचा स्वर घोगरा झाला होता. श्रोत्यांमध्यें विलक्षण उदासीनता पसरली होती. दुर्दैवी सीते-विषयीं प्रत्येकाला सहानुभूति वाटत होती. जो तो आपापल्यापरीने ती व्यक्त करीत होता. कुणी डोळे पुशीत होते. कुणी खिन्नपणाने खाली मान घालून बसले होते.

दूर कोपऱ्यांत बसलेल्या त्या पाहुण्याचे डोळे पाणावण्याऐवजी

[ पान १८९ वर चालू ]



ज्या स्त्रीच्या सहवासांत मी दोन तीन दिवस घालवणार होतों तिची माझी ओळखही नव्हती. तिचा फोटोसुद्धां मी पाहिला नव्हता. मोठी विचित्र गोष्ट होती. रक्तांतलं सगळं कुतूहल, धाडस आणि पाप जागं करणारी घटना होती. एका अनोळखी तरुणीबरोबर मी एका अपरिचित शहरांत दोन दिवस आणि दोन रात्री भटकणार होतो !...आपल्या-कडच्या जुन्या विवाहपद्धतित काय किंवा जगभर चालू असलेल्या वेश्याव्यवसायांत काय, स्त्रीचं दर्शन आधी होतं--अन् मग सहवासाचा सौदा केला जातो. इथं कलंदरासारखं भटकायला मला सोबतीण मिळाली होती ती मला अज्ञात होती. तिचं नांव, तिचा निरोप--एवढ्याच ओळखीच्या खुणा मजजवळ होत्या. माझ्याबद्दल तेवढीच माहिती तिच्या पर्समध्यें जमली होती. तेवढ्या खुणेवर आम्ही एका अद्भुत नगरात भेटणार होतो व उन्हाचं आईस्क्रीम व चादण्याचं मद्य घेत कांहीं काळ एकत्र घालवणार होतो.

तिला भेटायचं पक्कं झालं, संकेतस्थळीं तिनें यायचं ठरलं आणि माझं मन पेटून निघालं. अनेक बरे वाईट-वाईटच विचार माझ्या मनांत बोलूं लागले. ती स्त्री कशी दिसेल, कशी वागेल ह्याचे अंदाज बांधूं लागलो. मग तोही खेळ सोडून मला हव्या तशा लावण्याची, मादकतेची मूर्ति मी मनाशीं चितारूं लागलो. मला हवी तशी ती वागेल, मला हवं ते देईल अशी कल्पना करण्यांत गुंगून गेलो. मला स्नेह हवा होताच, पण स्त्रीसुख हवं होतं. गेली दोन वर्षं माझी उपासमार झालेली होती. अनेक स्त्रियांशी माझा परिचय झाला होता, मैत्री झाली होती; कित्येकींच्या बरोबर मी नृत्य केलं होतं, मद्यपान केलं होतं; पण हें सारं त्रुटित होतं. स्त्रीसुख राहूं दे, पण चुंबनालिंगनाचाही मला लाभ घडला नव्हता. भोवताली स्त्रिया होत्या अन् मी कोरडाच राहिलो होतो. स्त्रीसुखासाठीं मी आंतल्या आंत जळत होतो. आणि आतां एक सोन्याची संधी चालून आली होती. एक तरुणी कांहीं तास केवळ माझ्यासाठीं, माझ्या सहवासांत घालवणार होती. अपरिचित ठिकाणी परक्या माणसाची भेट घेणारी स्त्री कुठल्या वर्तनाची असेल ! एकत्र हिंडल्यावर, मद्य प्राशन केल्यावर

*सगळं सगळं विसरलं जाईल; पण अपूर्व आदरातिथ्य करणारीं अशीं तीं अन् विलक्षण आणि अद्भुत शिक्षा करणारीं प्रेमळ, खोडकर, कठोर, धाडसीं, नेकदार मूर्ति माझ्या हृदयांत कायमचीं कोरलीं जाईल.*

ती कितपत तोल सावरेल ? असं भेटण्याचं व भटकण्याचं धाडस करणारी मुलगी नीतिकल्पनांच्या पलिकडे गेलेली नसेल काय ? ह्या अपूर्व भेटीनें, मनमोकळ्या भटकण्यानें नि रंगेल वातावरणानें तिचा उरलासुरला संकोच राहील का ?—कुठलाही विवेक करून विचारलेल्या प्रश्नांची उत्तरं माझ्या मनासारखीच मिळत होती. माझी वासना अनावर करीत होती. एका अद्भुत् अभिसारासाठीं मी वेडावलो होतो.

अनोळखी मैत्रिणीला ज्या न पाहिलेल्या नगरांत मी भेटणार होतो, त्या वास्तूबद्दलही मी अपार औत्सुक्यानें भारावलो होतो. सॅन फ्रॅन्सिस्कोनें माझ्या मनांत लहानपणापासून कुतूहल निर्माण केलं होतं. तेथल्या भूकंपाची अनेक चित्रं मी जमविली होती. त्या आगळ्या गावाबद्दल तऱ्हतऱ्हेच्या हकीकती मी वेळोवेळी ऐकल्या होत्या. सॅन फ्रॅन्सिस्को म्हणजे थंड धुक्याच्या आवरणाखाली छोट्या टेकड्यावर निर्माण झालेली एक यक्षनगरी अशी कांहींशी कल्पना माझ्या मनांत होती. त्या भूमीचं दर्शन घ्यायची महत्वाकांक्षा मी कधीची बाळगली होती. आणि आतां अमेरिकेच्या पश्चिम किनाऱ्यावरील त्या द्वारकापुरीला जाण्याचा योग आला होता.

सॅन फ्रॅन्सिस्कोचं मंदमादक धुकं, तेथले कलावंत व क्रीडागृहं, केबलकार, चायना टाऊन, नाईट क्लब्स...आणि रोझमेरी रॉजर्सचे सोनेरी केस, निळे डोळे, उभार बांधा, धुंद वागणं...दोन्हींबद्दल अनेक गहिरीं, सुखद स्वप्नं सारखी तरळत होती. ती जुनाट, अद्भुत् नगरी एकाद्या प्रणयलोलुप नवोढेसारखी दिसत होती आणि ती लवकरच भेटणारी मैत्रिण जुन्या वास्तूसारखी विश्वासू, लाघवी भासत होती. सुवर्णरंगी मद्यांत ऑलीव्हचं हिरवं कंच फळ तरंगत असावं तशी लाव्हारसाच्या धुकेऱ्या वास्तूत ती निर्भर अभिसारिका दिसत होती.

फ्रिस्कोच्या विमानतळावरून निऑन साईन्सच्या वणव्यांत मी आलो. नव्या मुलुखांत आल्यानें बावरल्यासारखं झालं. रोझमेरीसाठी मन ओढ घेतच होतं. रोझमेरी आता कुठे असेल ? माझंच चिंतन करीत असेल कां ? उद्यां सकाळी ठरल्याप्रमाणें भेटेल कीं नाही ? नाहीच आली तर ? भेटल्यावर दिवसभर काय करायचं ?... तिचे विचार मनांत येत होते आणि मला उतरवून न्यायला आलेल्या वृद्ध जोडप्याशी मी इस्तांदोलन करीत होतो.

"प्रवास चांगला झाला ना ? किती दिवस राहाणार आहांत आमच्या ह्या स्वर्गीय शहरांत ?"

"दोन तीन दिवस. आपल्याला तसदी पडणार आहे—"

"तसदी कसली ! परदेशी माणसाबद्दल आम्ही नेहमीच उत्सुक असतो. तुम्ही आलांत; आता आम्हाला हिंदुस्थानची खूप माहिती कळेल—" तो वृद्ध गृहस्थ मोटर सुरू करीत मोठ्या प्रेमानें म्हणाला.

"पण मी तुमच्याकडे नुसता झोपण्यापुरता राहाणारा आहे. दिवसभर गाव पहायला हिंडणार आहे—एका मैत्रिणीबरोबर—"

म्हातारीनें पुढल्या सीटवरून माझ्याकडे विचित्र नजरेनें पाहिलं, आमचं संभाषण तिथेच थांबलं. क्षणकाल मला माझी लाज वाटली. इतकी आतुरता, लंपटवृत्ती दाखवणं बरं नाही असं वाटलं. त्या जोडप्याचा रागही आला. त्यांच्या घरांत रात्रसुद्धां कशी काढायची, कळेना ! चर्चचं काम करणारं ते वृद्ध जोडपं मला अनोळखी गांवात आसरा देत होतं. गरम कॉफी, उबदार पांघरुणं, अमेरिकन अगत्य. अन् मी मात्र उगाचच फुरंगटून बसलो होतो.

उत्सुकतेचा, अस्वस्थतेचा कडेलोट करणारी रात्र कशीबशी गेली आणि दहिंवरानें चिंब झालेल्या पहाटे मी खडबडून जागा झालो. दोन तासांनी रोझमेरी भेटणार. दोन दिवस एक स्वर्ग साकार होणार. छाती धडधडत असतांना मी दाढी केली, स्नान केलं, कपडे केले आणि त्या जोडप्याचा जेमतेम निरोप घेऊन निघालो.

युनियन स्क्वेअरमधल्या होटेलशी मी टॅक्सी करून आलो. कपडे ठीक करीत व केसावरून हात फिरवीत होटेलच्या लुंजमध्यें गेलो. दिसणारी प्रत्येक स्त्री मला रोझमेरी रॉजर्स वाटत होती. ती येईल कीं नाहीं अशी कुशंका एकदां डोकावून गेली. पण मग ती येईल आलीही असेल ह्याबद्दल माझं मन एकदम निश्चिंत झालं. लुंजमध्यें अनेक स्त्रीपुरुष बसले होते. उभे होते. इकडून तिकडे जात होते. एवढ्या सकाळीं खूप वर्दळ होती.

उजव्या भिंतीजवळ ठेवलेल्या जुन्या पियानोजवळ हातांची घडी घालून रोझमेरी उभी होती. आमची नजरानजर झाली आणि आम्ही एकमेकांना ओळखलं. तिचे ओठ विलगले, हात खाली गेले व ती माझ्या दिशेनें आली. मी अर्ध्या वाटेत तिला गाठलं. आम्ही एकमेकाचे हात धरले.

"उशीर झाला मला ?"

"उशीर नाही झाला. पण मी केव्हांची येऊन उभी राहिले आहे—"

"चल...कुठे जायचं ?"

"आधी कॉफी घेऊं या—"

ती मादक, उफाड्याची नव्हती, पण माझ्या कल्पनेप्रमाणेच तिचे केस सोनेरी होते, डोळे निळे निळे होते. तिनें ओठ रंगवले नव्हते आणि त्यामुळें ती मला एकदम आवडली !

कॉफीगृहांत लांब टेबलापुढच्या खुंटावर आम्ही शेजारी शेजारी बसलो. तिनें आपली पर्स समोर ठेवली, त्याभोवतीं हाताची कोपरं टेकली व ओंजळीत हनुवटी ठेवून मला विचारलं,

"वॅगर काय म्हणतात ?"

अरविंद गोखले



अनुक्रमणिका





"दोघंही छान आहेत. सुट्टीत मेक्सिकोला जाणार आहेत...त्यांचा मी फार ऋणी आहे...त्यांना मी सहज म्हटलं कीं मी फ्रिस्कोला जाणार आहे अन् त्यांनी लगेच तुझं नांव सांगितलं. तूं भेटशील, मला गांव दाखवशील..."

"कॅथी वेंमर नि मी एका खोलीत रहात होतो कॉलेजांत असतांना. चार वर्षांपूर्वी. फार गोड पोरगी आहे कॅथी. नाही ?"

ओंजळीत ठेवलेली हनुवटी तशीच माझ्याकडे वळवून तिनें विचारलं. तिच्या चेहऱ्यावरचा बालसुलभ भाग मोठा गोड होता. डोळ्यातली निळवंती आकर्षक होती. मी उत्तेजित स्वरांत म्हटलं.

"कॅथी गोड आहे...रोझमेरी गोड आहे..."

"ओ ऽ—" ओठांचा चंबू करून ती हसली. पर्समधून सिगरेटचं पाकीट काढीत म्हणाली, "मला मिट्झी म्हणायचं. सगळे मिट्झी म्हणतात—"

जरा वेळ आम्ही सिगरेटी ओढीत बसलो. मग मी विचारलं, "काय करायचं आता ? कुठे जायचं ?"

"बेकर स्ट्रीटवर. एक म्हातारं जोडपं आहे. अशीच ओळख काढलीय..."

"मला होटेलमध्यें जागा बघितली पाहिजे. माझी बॅग इथे ठेवली आहे मी. ती घेऊं व वाय् मध्यें खोली मिळते कां बघूं..."

मी चकित झालो. हॉटेलमध्ये खोली घेऊन राहायच्या हेतूनें ही घराबाहेर पडली व मला भेटायला इथें आली ! क्षणभर माझा विश्वास बसेना. मला कांहीं सुचेना. हृदयाचा ठेका चुकत राहिला व मी म्हटलं, "म्हणजे होटेलांत रहायचं !...तुझं—तुझं घर ?"

"मी इथे, फ्रिस्कोला राहात नाहीं. गेल्या वर्षापासून मॉंटरे गावी राहाते. इथून दोनशे मैल दूर—"

" माझ्यासाठी मुद्दाम आलीस ? "

" तुझ्यासाठी. अन् कॅथीसाठी. कॅथीला मी मॉंटरेला आहे हे ठाऊक नव्हतं. तिचं इथे पूर्वीच्या पत्यावर आलेलं पत्र मला मॉंटरेला मिळालं. तुला भेटायला, तुला फ्रिस्को दाखवायला तिनें खास विनंति केली नि म्हणून..."

आम्ही आता चालायलाही लागलो. मिट्झीची बॅग घेऊन, युनियन केअर ओलांडून वाय. एम्. सी. ए. ची वाट धरली. मी थरारून गेलो होतो. माझ्यासाठी मिट्झी मुद्दाम आली...हॉटेलमध्यें खोली घेऊन एकटी राहाणार...सकाळची गुलाबी थंडी, समुद्रावरुन येणारा खारा गंध, लगबगीनें जाणारी माणसं, चढण घेणारे रस्ते व जुनाट घरं...आणि बरोबर पावलं टाकणारी निर्भय, निळ्या डोळ्यांची तरुणी ! मी एकदम म्हटलं,

"आपण दिवसभर, अन् अपरात्रीपर्यंत हिंडणार. आणि तूं होटेलांत नि मी दूर कुणाच्या तरी घरीं राहणार !...मला वाटतं, मी ही वाय. मध्येच खोली घेऊन राहातो. ते सोयीचं होईल..."

" ओ खे..."

बेकर स्ट्रिटवर गेलो व बॅग घेऊन तसाच परतलो. त्या वृद्ध जोडप्याला काय सांगितलं, टॅक्सीला किती पैसे दिले, ह्याची कांहींही नोंद मनावर झाली नाही. कल्पनेतही नव्हतं ते थरथरतं सुख समोर होतं अन् मी शहारून गेलो होतो. वायच्या दारांतच मिट्झी वाट पहात उभी होती.

" कशाबशा खोल्या मिळाल्या. पाचव्या मजल्यावर तुला, नवव्या मजल्यावर मला..."

नवव्या मजल्यावरच्या मिट्झीच्या खोलीत तिची बॅग ठेवली. " तूं तुझी बॅग ठेवून खाली लुंज्मध्यें ये. मी अर्ध्या तासानें तिथें तुला भेटते—" ती म्हणाली व दार लावूं लागली. तो अरुंद पलंग, सुबकशी खोली मी परत एकवार बघून घेतली आणि पाचव्या मजल्यावर माझ्या तसल्याच खोलींत आलो. शेजारच्या खोलीतून एक तरुण तरुणी बाहेर पडली. कमरेला विळखा घालून तो इसम त्या मुलीला लिफ्टकडे नेत होता. ओढाळपणे लिफ्ट खाली जाईपर्यंत मी तिकडे पहात राहिलो. माझ्या खोलीला पलंगही अरुंद होता. मी कुठे झोपणार ? कसा !—खोलींत एकटं बसल्यानें वेड्यासारखं झालं. कोट-टाय काढून टाकून शर्टानिशी खाली आलो. लुंजमध्यें कोक पीत रेंगाळूं लागलो.

तासाभरांत ती आली. ताजीतवानी होऊन. केसांची रचना बदलली होती. उंच टाचेचे बूट घातले होते. निळ्या शमीजवर निळ्या गोळ्यांची माळ घालली होती. ओठ रंगवलेले नव्हते !—उमलतं हास्य करीत ती म्हणाली, ' चलो--' मी हात पुढें केला पण ती पुढें चालूं लागली होती. तिच्याबरोबर चालत आम्ही हमरस्त्याला लागलो.

"तूं कॅमेरा घेतला नाहीस हें छान केलंस. मला असं टूरिस्ट-सारखं भटकणं आवडत नाही. खांद्यावर कॅमेरा, हातांत गावाचे नकाशे, खिसा पैशांनी फुगलेला, चेहेरा गोंधळलेला..."

छक्कापन्हुति :



हे दांडीवर लोंबकळणारे वानर, बहुरंगी बहुढंगी
सदा कांहीतरी चघळीत, वांकुल्या दाखवीत
चाळे करीत बडबडणारे—जणुं नवथर कॉलेजकुमार
फुटपाथवर, मोक्याच्या जागेवर
झुलपीं हलवीत रेंगाळणारे—दुस्वास करीत
कुणाच्या प्रेमप्रकरणाची टरफलें उडवीत—
वाघ्कळबहाद्दर खांकरणारे !

" मलाही प्रवासी, परदेशी म्हणून मिरवायला आवडत नाहीं. मला भारताबद्दल उगाच कांहींतरी विचारून तूं सतावणार नाहीस ना ?—"

" नाही. आपण दोन दिवस मजेत घालवणार आहोत. फ्रिस्कोचं व्यक्तिमत्व समजून घेणार आहोत--"

"समोर स्ट्रीट कार दिसतांच ती धावतच त्यांत चढली. मी मागोमाग उडी घेतली. दाटीनें बसलेल्या दोन लठ्ठ बायांच्या मध्यें ती बसली. मी तिच्या पुढ्यांत उभा राहिलो.

" कुठे चाललो आपण ? "

" स्ट्रीट कारची गंमत अनुभवायला. अमेरिकेतलं हे एक जुनं ऐश्वर्य आहे--"

ती ट्रॅमगाडी डोंगर चढल्यासारखी उंच रस्त्यावर जात होती नि घरंगळत उतरणीला लागत होती. जीव मुठीत घेऊन आम्ही दाटी करीत होतो. मोठ्यानें हंसत होतो. सॅन फ्रॅन्सिस्कोचं आगळं जीवन लुटायला सुरवात झाली. केवल कारमधून चायना टाऊन. चॅाप सुई, चित्रविचित्र चिजा...फेरी वार्फवरच्या फेऱ्या...सी फुड,...पॅसिफीकचं दर्शन...दिवसभर आम्ही सैरावैरा भटकत होतो.

त्या वेगळ्या शहरानें व मिट्झीच्या खेळकर वागण्यानें माझ्या मनाचा ताण कमी केला. कांहीं काळ विशुद्ध मैत्री मनांत भरून राहिली. होटेलमधल्या खोल्या, दोन वर्षांची उपासमार, सोनेरी केसांचं भुरभुरणं--सगळं विसरल्यासारखं झालं—पण मग गोल्डन गेट ब्रिज् पुढें भारावून उभं असतांना अचानक संध्याकाळ झाली. सूर्याचा रक्त गोल समुद्राच्या लाटांवर टेकला व कोवळ्या अंधेराच्या गूढ सावल्या आमच्या अंगाला स्पर्श करूं लागल्या. मी मिट्झीकडे पाहिलं. ती सुवर्णव्हाराच्या पुलावरून जाणारं हेलीकॉप्टर पहात


दीपावली शुभचिंतन...
सर्वेऽपि सुखिनः सन्तु ।
सर्वे सन्तु निरामयः ।
सर्वे भद्राणि पश्यन्तु ।
मा कश्चित् दुःखमाप्नुयात् ॥
सर्वांना सुख मिळूं दे. सर्वांना निरोगी राहूं दे, सर्व उत्तम नागरिक बनूं देत.
आणि कोणीहि दुःखी न राहोत—
दिवाळी आणि नूतन वर्षाच्या शुभ दिवशी, 'वालचंद उद्योग समूहातर्फे'
आपल्या असंख्य ग्राहक आणि हितचिंतकांकरितां हीच प्रार्थना.
वालचंद
उद्योग समूह
कन्स्ट्रक्शन हाऊस
बॅलार्ड इस्टेट, मुंबई-१
धी प्रिमिअर कन्स्ट्रक्शन कंपनी लि.
धी हिंदुस्थान कन्स्ट्रक्शन कंपनी लि.
वालचंदनगर इंडस्ट्रीज लि.
धी रावळगाव शुगर फार्म लि.
धी इन्डियन ह्यूम पाईप कंपनी लि.
कूपर इन्जिनीअरींग लि.
धी ॲक्मे मॅन्युफॅक्चरींग कंपनी लि.
मीहनाईट मेटल डिव्हिजन ऑफ कूपर इन्जिनिअरींग लि.
धी प्रिमिअर ऑटोमोबिल्स लि.

QTS जलद वाहतुक योजना

माल ठराविक दिवसांत पोहोंचविते



*जीवनाच्या कुठल्या तत्वज्ञानाचा अर्क हीं मंडळी प्यालीं आहे देव जाणे. विशाल सागरतीर, नारळींचीं बनें, पोफळींच्या बागा सारं कांहीं आहे; पण त्या उदात्ततेला दारिद्र्य विलक्षण छेद देऊन जातं, आणि उरतं तें एक भयाण विनोदाचं अभेद्य कवच !...*

— पु. ल. देशपांडे



रत्नागिरीच्या त्या मधल्या आळींत लोकोत्तर पुरुष रहातात. देवानें ही माणसांची एक निराळीच घडण केलेली आहे. त्यांच्यांत रत्नागिरीच्या लाल चिऱ्याचे, नारळा फणसाचे, खाजऱ्या आळवाचे आणि फट् म्हणतां प्राण कंठाशीं आणणाऱ्या ओल्या सुपारीचे गुण अगदीं एकवटून आहेत. रत्नागिरीच्या शितांतच ही भुतावळ लपली आहे कीं पाण्यांतच प्राणवायू नि पाणवायूच्या जोडीला आणखी कसला वायू मिसळला आहे तें त्या रत्नांग्रीच्या विश्वेश्वरालाच ठाऊक.

अंतू बरवा ह्याच मातींत उगवला नि पिकला. वास्तविक अंतु बरव्याला कुणी अंतू असें एकेरी म्हणावें हें त्याचें वय नव्हे. मी बाराचौदा वर्षांपूर्वी त्यांना प्रथम पाहिले त्यावेळींच त्यांच्या दाढीचे खुंट नि कानावरचे आणि छातीवरचे केस पिकलेले होते. दातांचा बराचसा अण्णू गोगट्या झाला होता. अण्णू गोगट्या होणें म्हणजे 'पडणें' हा अंतूनें मराठी भाषेला बहाल केलेला वाक्प्रचार आहे. रत्नांग्रीचा अण्णू गोगटे वकील गेलीं सहा वर्षं ओळीनं मुन्शिपाल्टीच्या निवडणुकींत पडत आला आहे. तेव्हांपासून विहिरींत पोहरा पडला तरी पोऱ्याचा "'अण्णू' झाला काय रे ?" म्हणून अंतू ओरडतो.

समोरासमोर अंतूला कोणी अंतू म्हणत नाहीं. परंतु उल्लेख मात्र सहसा एकेरी. किंबहुना कोंकणांतली मंडळी एकूणच एकवचनी. पण अंतूला संबोधन 'अंतूशेट' हें आहे. ह्या चित्पावनला ही वैश्य-वृत्तीची उपाधी फार प्राचीन काळीं चिकटली. अंतूच्या हातून तें पाप घडलें होतें. पहिल्या महायुद्धाच्या वेळीं अंतूनें बंदरावर कसलें तरी दुकान काढलें होतें. तें केव्हांच बुडालें. परंतु 'अंतुशेट' व्हायला तें कारण पुरेसें होतें. त्यानंतर अंतूनें पोटापाण्याचा उद्योग केल्याचें कोणाच्या स्मरणांत नाहीं. दोन वेळच्या भाताची त्याची कुठें तरी सोय आहे. थोडी जमीन आहे. नारळींचीं पांचपंचवीस आणि



अनुक्रमणिका

# अंतू बरवा

पोफळीचीं दहा पंधरा आणि रातांबीचीं कांहीं अशीं झाडें आहेत. दोनपांच हापूस आंबे आहेत—कुठें फणस, चिंच उभी आहे. वाडवडलार्जित घराच्या वाटणींत एक पडवी आणि खोली आली आहे. विहिरीवर वहिवाटीचा हक्क आहे. ह्या सगळ्या आधारावर अंतूशेट उभे आहेत.

त्यांची आणि माझी पहिली भेट बापू हेगिष्ट्याच्या दुकानांत झाली. मी सिगरेटी घ्यायला गेलों होतों आणि केसरीच्या मागून अर्धा जस्ती काड्यांचा चष्मा कपाळावर घेत अंतूशेटनी तडक प्रश्न केला होता...

" वकीलसाहेबांचे जांवई ना ? "

" हो ! "

" झटक्यांत ओळखलेंच मी ! बसा ! बापू जावयबापूंना चहा मागवा. "

एकदम इतक्या सलगींत आलेला म्हतारा कोण हें मला कळेना. पण अंतूशेटनींच खुलासा केला. " तुमचे सासरे दोस्त हो आमचे. सांगा त्यांना अंतू बरवा विचारीत होता म्हणून..."

" ठीक आहे ! "

" केव्हां आलांत पुण्याहून ? "

" परवांच आलों. "

" बरोबर. दिवाळसण असेल. मागा चांगली फोर्ड गाडी ! काय ?"

" तुमचे दोस्त आहेत ना, तुम्हीच सांगा. "

" वा...पुण्याचे तुम्ही...बोलण्यांत ऐकणार काय आम्हाला !... मग मुक्काम आहे कीं आपली फ्लाइंग व्हिजीट ? "

" दोन तीन दिवसांनी जाईन ! "

" उत्तम ! थोडक्यांत गोडी असते. त्या सड्यावरच्या कसोपकर वकिलाच्या जांवयासारखें नका करूं. त्यानें सहा महिने तळ ठोकला—शेवटीं कसोपकर वकीलानू एक दिवस खळं सारवायास लावलें त्यास ! जास्त दिवस जांवई राहिला की तो दशमग्रह होतो. कसें ? "

" बरोबर आहे ! "

" बापूशेट ओळखलंत की नाहीं ? आमच्या वकिलांचे जांवई ! आम्ही दोघेहि त्यांचेच पक्षकार हो ! "

हेगिष्ट्यांनीं नमस्कार केला.

" चहा घेतां ? "

" नको हो, उकडतंय् फार ! " मी म्हणालों.

" अहो रत्नांग्रीस उकडायचेंच. गोठ्यांत निजणारान् बैलाच्या मुताचो वास येतो म्हणून भागेल काय ? " शेवटला ' काय ? ' वरच्या पट्टींत उडवीत अंतूशेट म्हणाले, " रत्नांग्रीस थंड हवा असती तर शिमला म्हणाले नसते काय आमच्या गांवाला ?...पण उकाड्याचा तुमच्या सड्यावर अधिक त्रास ! दुपारच्या वेळीं मारा सायकलीवर टांग नी थेट या आमच्या पोफळीच्या बागेंत झोंपायला. पोफळींची बाग म्हणजे एअरकंडिशन हो..." मनमुराद हंसत अंतूशेट म्हणाले. वर आणि ' आमचा कंट्री विनोद हो जांवयबापू ' हेंहि ठेवून दिलें. " बापूशेट पाहुणे लेखक आहेत हो...आमच्या आबा शेट्यासारखीं नाटकें लिहिली आहेत. फार बोलूं नका. नाहींतर तुमच्यावर लिहितील एखादा फर्मास फार्स ! "

अंतुशेठ बर्व्यापर्यंत माझी कीर्ति पोहोंचल्याचें ऐकून झालेला आनंद बापूशेट हेगिष्ट्याच्या प्रश्नानें मावळला. मला नीट न्हाहाळीत बापूशेट म्हणाले," काय करतात ? "

" करतात काय म्हंजे ? खुळे की काय तुम्ही हेगिष्टे ? ती रद्दी काढा. दहा ठिकाणीं फोटोखालीं नांव छापलेलें आढळेल तुम्हाला. सिनेमांत असतात. "

" म्हणतां काय ? " हेगिष्टे माझ्याकडे ' अजि म्यां ब्रह्म पाहिलें ' असा चेहरा करून पहात म्हणाले.

" काय हो जांवईबापू एक विचारूं काय ? " मिस्किल प्रश्नाची नांदी चेहऱ्यावर दिसत होती.

" विचारा की—"

" एक सिनेमा काढला की काय मिळतं हो तुम्हाला..."

मी कांहीं कोंकणांत प्रथमच आलों नव्हतों त्यामुळें ह्या प्रश्नाला मी सरावलों होतों—

" तें सिनेमासिनेमावर अवलंबून आहे..."

" नाहीं, पण आम्ही वाचलंय् एक लाख दीड लाख मिळतात..."

" मराठी सिनेमांत एवढे कुठले ? "

" समजा !—पण पांच पुज्यं नसलीं तरी तीन पुज्यं पडत असतीलच..."

" पडतात कधींकधीं...बुडतातहि ! "

" अहो तें चालायचंच. धंदा म्हटला कीं चढणं आलं नी बुडणं आलं...आणखी एक विचारूं काय ?...म्हणजे रागावणार नसलात तर..."

" छे रागवायचं काय..."

" सिनेमांतल्या नट्यांबद्दल आम्ही हें जें कांहीं वाचतो तें खरें असतें कीं आपलें गंगाधर बाट्याच्या अस्सल बेळगांवी लोण्यासारखं पीठ मिसळलेलें ? "

" हें जें कांहीं म्हणजे ? " मी उगीचच वेड पांघरलें.

" वस्ताद हो जांवयबापू ! कोर्टांत साक्षीदार म्हणून नांव काढाल ! अहों हें जें कांहीं म्हणजे तर्जनीनासिकान्यायांतला प्रकार म्हणतात तें..." हा तर्जनी नासिकान्याय चटकन माझ्या ध्यानांत आला नाहीं. शेवटीं अंतुशेटनीं आपली तर्जनी नाकपुडीला लावीत साभिनय खुलासा केला. तेवढ्यांत हेगिष्ट्यांनी मागवलेला चहा आला. " घ्या ? " अंतूशेठनी माझ्या हातांत कप दिला आणि त्या चहा-वाल्या पोराला, " रत्नांग्रीच्या समस्त म्हयशी तूर्तास गाभण कायरे झंप्या " असें म्हणून जातां जातां चहाच्या रंगावर शेरा मारला. आणि बशींत चहा ओतून फुर्र फुर्र फुंकायला सुरवात केली. वास्तविक त्या पोऱ्याला चहांत दूध कमी आहे हें त्यांना सरळ सांगतां आलें असतें. पण अंतूशेटचेंच काय त्यांच्या साऱ्या आळीचें बोलणेंच तिरकें. "

अंतूशेटचा आणि माझा परिचय आतां जुना झाला. गेल्या दहा बारा वर्षांत मी जितक्या वेळां रत्नागिरीला गेलों तितक्या वेळां मी त्यांना भेटलों. त्यांच्या अड्ड्यांत त्यांनी मला जमवूनहि घेतलें. एक दोनदां गंजीफा शिकवायचा प्रयत्नहि केला. आणि त्या साठीच्या आसपास उभ्या असलेल्या वृद्धांच्या अड्डयांत मग अंतूशेट आणि त्यांचे सांगाती यांचं जीवनविषयक अचाट तत्त्वज्ञान मी खूप ऐकलं. त्यांची विशिष्ट परिभाषा तिथें मला कळली. खांद्यावर पैरणी, कमरेला पंचा, पायांत करकरती वहाण, एका हातांत दंडा नि दुसऱ्या हातांत फाणस घेऊन, " रे गोविंदभट टाकतोस काय दोन डाव ? " किंवा " परांजपे, जागा आहेस की झाला तुझा अजगर ? " अशा आरोळ्या मारीत पत्त्यांतले भिडू गोळा करणाऱ्या त्या मंडळींत मीहि भटकलों. पत्त्यांचा डाव फारसा रंगला नाहीं कीं पानें टाकून, " जांवयबापू, म्हणा एखादा मालकंस...गडबोल्या कूट थोडा तबला पाव्हण्याबरोबर...खातूशेट उघडा तुमचा खोका..." असल्या फर्माइशीनंतर मी आवाजहि साफ करून घेत असें. " नरड्यांत मज्जा आहे हो तुमच्या " ही दाद तिथेंच मिळे.

वर्षा दोनवर्षांतून एखादी फेरी रत्नागिरीला घडे. दरफेरींत मात्र एखादा मेंबर गळाल्याच कळे.

" दामूकाका दिसले नाहींत कुठें अंतूशेट ! "

" कोण ? दामू नेना ?—तो चैनींत आहे ! वरती रंभा त्याच्या टकलावर तेल थापत्ये नि उर्वशी पंख्यान् वारा घालत्ये म्हणतात. "

" म्हणजे ? "

" अहो म्हंजे वाघाचे पंजे ! दामू नेन्याची रत्नांग्रीहून झाली बदली ! " असें म्हणून अंतूशेटनी आकाशाकडे बोट दाखवलें.

" अरे अरे अरे ! कळलं नाहीं मला. "

" अहो कळणार कसं ? दामू नेना चचला म्हणून रेडिओंत का बातमी सांगणार आहेत ? केसरींत आला होता गृहसंसार छापून. मनमिळावू, प्रेमळ व धर्मपरायण होते असा ! छापणारे काय—घाल तें छापतील. दामू नेना कसला प्रेमळ ? ताटीवर आडवा पडला होता तरी कपाळावरची आठी तशीच !—एके रात्रीं उकडतांय् घरांत म्हणून खळ्यांत झोंपला तो तिथेंच संपलेला आढळला पहांटे ! पुण्यवान् माणूस. गतवर्षी आषाढीच्या दिवशीं गेला वैकुंठ लोकीं...रत्नांग्रींत दोन पालख्या निघाल्या आषाढीला... एक विठोबाची नि दुसरी दामू नेन्याची...आषाढांत तो गेला नि विजयादशमीला आपल्या दत्तू परांजप्यान् सीमोल्लंघन केलेनींत. अवघ्या देहाचें सोनें झालें—इजा झाला बिजा झाला आतां तिजाची वाट पहातोय् ! " मिष्किलपणानें खांदा उडवीत अंतुशेट म्हणाले.

पांच फुटांच्या आंतबाहेची उंची, तांबूस गोरा वर्ण, तोंडावर बारीक वांगाचे ठिपके, घारे मिचमिचे डोळे, वयोमानाप्रमाणें वाढत चाललेल्या सुरकुत्या, डोक्यावर ईशान्य नैर्ऋत्य दाखवणारी तेलाच्या कडा उमटलेली टोपी, अंगांत अंगरखा, कमरेला गुढघाभर पंचा, पायांत कोकणी वहाणा, दातांची अर्धी पंगत उठून गेलेली, त्यामुळें मोकळ्या हिरड्यांना जीभ लावीत बोलायची खोड– आणि ह्या साऱ्या साजासकट वजन सुमारें शंभर पौंड...ह्या सगळ्या जराजीर्ण होत चाललेल्या गोष्टींत एक गोष्ट ताजी म्हणजे सानुनासिक परंतु सुस्पष्ट आवाज आणि डोक्यावर पिढ्यान् पिढ्या थापलेल्या खोबरेल तेलानें दिलेली वंशपरंपरागत तैलबुद्धि ! अंतुशेटच नव्हे, तर त्या आळींतले त्या वयाचे सारेच नमुने कमी अधिक फरकानें एकाच वळणाचे किंवा एकाच आडवळणाचे. भाषेला फुरश्यासारखी पायांत गिरकी घेऊन चावायची संवयच झालेली. कुणाचं बरं झाल्याचं सुख नाहीं; वाईट झाल्याचं दुःख नाहीं. जन्माचं सोयर नाहीं; मरणाचं सुतक नाहीं. गाण्याची रुचि नाहीं–तिटकाराहि नाहीं–खाण्यांत चवी-पेक्षां उदरभरण हाच स्वच्छ हेतु ! आयुष्याची सारवट गाडी वंगण नाहीं म्हणून कुरकुरली नाहीं–आहे म्हणून वेगानें पळाली नाहीं–चाल मात्र कोंकणी वाटेसारखी सदा नागमोडीची. नशिबांत

अश्वत्थाम्यावरच्या पिठाच्या दुधाची वाटी ! त्याच्या घरीं पिठाचं दूध झालं. इथें देवानें नारळाचा कल्पवृक्ष दिलेला. पण त्यांतल्या शोवऱ्याहून करवंटीची सलगी अधिक !

उन्हाळ्यांत कुठली तरी मुंबईची दुय्यम नाटक कंपनी—झापाच्या थेटरांत ' एकच प्याला ' घेऊन आली होती. संच जेमतेमच होता. पहिला अंक संपला. बाहेर सोड्याच्या बाटल्यांचे चीत्कार सुरू झाले. किटसनच्या प्रकाशांत अंतुशेटची मूर्ति दिसली. अंतूशेट फ़रक्यावरवाल्या मॅनेजरशीं चर्चा करीत होते,

" कशी काय गर्दी ? "

" ठीक आहे ! "

" प्लान तर मोकळाच दिसतोय . सोडतां काय अर्ध्या तिकिटांत..."

" छे छे ! ! "

" अहो छे छे म्हणून झिटकतां काय पाल झाडल्यासारखे ? पहिला अंक ऐकला मी हितूनच. सिंधूच्या पार्ट्यांत काय दम दिसत नाहीं तुमच्या...लागे हृदयीं हुरहुर म्हणजे अगदींच पिचकवणी म्हटलंनीत...बालगंधर्वाचें ऐकलें होतेंत काय ? " नेहमीप्रमाणे शेवटला ' काय ' उडवीत अंतूशेट म्हणाले.

मॅनेजरहि जरा उखडले,

" आग्रह नाहीं आमचा तुम्ही नाटक बघायला चला असा..."

" गांवांत आग्रहाचे बोर्ड तर टांगले आहेत—आणि काल घरोघर जाहिरातीची अक्षत देखील घेऊन हिंडत होते तुमचे ब्यांडवाले ! अहो एवीतेवीं रिकाम्या खुर्चीला नाटक दाखवायचें—चार आण्यांत जमवा. "

" चार आण्यांत बघायला काय डोंबाऱ्याचा खेळ आहे काय ? "

" अहो तो बरा ! आधीं तो खेळ दाखवतो आणि मग थाळी फिरवतो...तुम्ही तसें करा. पुढलें कशि या त्यजूं पदाला जमलें फक्कड तर थाळींत चार आणे आणखी टाकीन .." बाजूची मंडळी हसली आणि मॅनेजर आणखी उखडला. तेवढ्यांत अंतूशेटची नजर माझ्याकडे वळली.

" नमस्कार हो जांवय बापू .."

" नमस्कार ! "

" काय जमलाय काय एकच प्याला ? "

" ठीक आहे ! "

" फुकट पासांत की काय तुम्ही ? बाकी तुम्हीहि त्यांतलेच. एक न्हावी दुसऱ्या न्हाव्याच्या दाढीचे पैसे घेत नाहीं म्हणतात. "

" नाहीं हो—हें पहा तिकीट आहे ! "

" मग ठीक आहे म्हणून मुळमुळीतसें उत्तर दिलेंत ? दमड्या मोजल्या आहेत ना तुम्ही ?—तो सिंधूचा पार्टी तर एकदम कंडम वाटला मला—"

" अहो सिंधूचा पार्टी कसला ? बाई आहे ती काम करणारी..."

" सांगताय काय ? कसला हो आवाज नि कसलें तें दिसणें ? मनांत आणील तर कडेवर घेईल सुधाकरला—सिंधु कसली सिंधुदुर्ग आहे मालवणचा नुसता..."

छकापन्हुति : १ .



हे पाहिलेत हा पोपट रंगीबेरंगी अन् नुकतुकीत
बसले आहेत कसे दांड्यांवर तटस्थ आणि शिस्तीत.
तो वरचा तुर्रेबाज पोपट त्यांचा पुढारी
मधेंच कांहींतरी बोलतो आणि डोलतो सगळे गांव
आणि मग पास होतात पक्षाचे ठराव
सगळे एक मतानें.

" पाहिलंत वाटतं नाटक ? "

" उगीच जरा—त्या कोपऱ्यांतलीं दोन झापें बाजूला करून पाहिलं घटकाभर...छ्याः ! ह्यांच्यापेक्षां दशावतारी बरे—"

कांहीं कारण नसतांना आपल्या मताची एक पिंक टाकून अंतूशेट निघून गेले. बाकी अशा दिवसरात्र ' पिंका ' टाकीतच त्यांचें आयुष्य गेलें. अंतूशेटची माझी आतां इतक्या वर्षांची ओळख, परंतु त्यांच्या कौटुंबिक परिस्थितीविषयीं मला फारसें कधींच कळलें नाहीं. त्यांच्याच अड्ड्यांतल्या अण्णा सान्यांनी एकदांच फक्त कांहीं माहिती पुरवली होती. कधीं तरी त्यांच्या बोलण्यांतून अंतूशेटच्या मुलाचा उल्लेख आला.

[ पान ५४ वर चालू ]




— ग. दि. माडगूळकर

शहरापासून दूर, एका मोठ्या खडकावर वसलेलें तें हॉटेल आतां अगदीं शांत होतें. हॉटेलमधें रहिवासी नव्हते असें नाहीं. पुष्कळ होते. भलें मोठें आवार आणि एकामेकांपासून दूर दूर अंतरावर असलेलीं पृथक् पृथक् निवासस्थानें, यामुळें गर्दी असली तरी कोलाहल नव्हता. आम्ही सर्वजण आमच्या निवास-स्थानासमोरील बागेंतच बसलों होतों. आम्हांला हव्या होत्या तेवढ्या मद्याच्या आणि सोड्याच्या बाटल्या आमच्या हाताशीं ठेवून, वेटर्सनीं रजा घेतली होती. खाण्याची कुणाला शुद्धहि राहूं नये, इतकें पिणें झालें होतें. ढेरपोट्या रंजनकाका खुर्चींतल्या खुर्चीत मांडी घालून बसला होता, नाकेश्वर जयंत ज्याचें विमान पार वैकुंठाच्या दारीं पोंचलें होतें. अण्णांना तसें कांहीं झालें नव्हतें. ते आनंदांत होते. मद्याच्या प्रत्येक घुटक्याचा मजा घेत होते. या सर्व 'हिंद' मंडळींत मी एकटाच काय तो 'नमाजी' होतों. श्रावण महिनाभर माझें एकाशन व्रत असल्यानें, इच्छा असूनहि मी त्या पेयाच्या प्याल्याला स्पर्श करूं शकत नव्हतों. एका अगदीं छोट्या प्याल्यांतील अननसाचा रस मी गेले दोन तास पुरवून पुरवून पीत होतों. त्या मद्यप्यांच्या मेळाव्यांत बसल्यामुळें कीं काय कोण जाणे, पण माझ्याहि मेंदूवर मळभ आलें होतें. शरीर हलकें झाल्या-सारखें वाटत होतें. ऐकण्याची शक्ति थोडकी कमी झाली असल्याचा भास होत होता. गप्पा मारण्याच्या मनःस्थितींतहि कुणी नव्हतें. समोरच्या बाटलींतील मद्य आपल्या पेल्यांत ओतून घेणें, खालीं वाकून सोड्याची बाटली उचलणें, लोखंडी 'उचकटण्या'नें ती हलकेंच उघडणें, तिच्या फसफसण्याचा प्रवाह पेल्यांतल्या पेल्यांत सांवरणें, आणि मग हलकें हलकें मद्यानंद घेण्यास प्रारंभ करणें, या क्रिया बिनबोभाट चालल्या होत्या. मधेंच रंजनकाकाचें लक्ष माझ्याकडे गेलें. मीहि त्या आनंदांत सामिल आहे अशा ठाम कल्पनेनें त्यानें लाडिक स्वरांत मला विचारलें,

'दादाजी, तमे सुखी छो के बाप्पा ?'

'हां व्हाला. सुखी छूं !' मी उत्तर दिलें. रंजनकाकाच्या या

*' हीं वही आम्हां गरीबांना परवडणारीं नाहीं,*
*पण मीं पितों. पितो साहेब, पितो. पिऊं नको*
*तर काय करूं ? प्यायलों नाहीं तर मीं मरून*
*जाईन. मरून जाईन नाहींतर वेडा होईन.*
*तुम्हींच सांगा—जगावं कुणीं, कुणींच भरोशाचं*
*भेटलं नाहीं तर माणसानं भरोसा कुठं धुंडावा ? '*

प्रश्नाला उत्तर देण्याइतकें माझें गुजरातीचें ज्ञान आतां प्रौढ झालें होतें. पिऊन मस्त झाला कीं, रंजनकाका हा प्रश्न हटकून विचारी आणि मी त्याला इच्छित उत्तर देई. हा खेळ आतां आमच्या दोस्तान्याइतकाच जुना झाला होता. तेवढा एकच प्रश्न आणि त्याचें तेवढेंच उत्तर, इतकाच संवाद झाला. परत सारे मद्यानंदी आपापल्या आनंदांत गर्क झाले.

पाऊस नुकताच शिंवडून गेल्यामुळें हवेंत गमतीदार गारठा होता. लहडलेल्या पारिजातकाचा वास आसमंतांत दरवळत होता. मद्यांचा वास आणि पारिजातकाचा सुवास, यांच्या तरंगत्या मिसळीमुळें सारें वातावरणच मादक सुवासिक झालें होतें. आभाळ मोकळें झालें होतें, त्यामुळें न्हालेल्या चांदण्या मद्यप्याच्या स्मृतीसारख्या पुसटपणें उजळल्या होत्या. वाऱ्याच्या एकाद्या झुळकीनें सभोंवारची झाडें डुलत होतीं. त्यांचें तें डुलणेंहि मद्यप्याच्या अकारण हालचालींसारखें आत्मतृप्त वाटत होतें. मैफलींत दिवा असा मुळींच नव्हता. नाहीं म्हणायला आमच्या निवासस्थानाच्या ओटीवर एक छोटा विद्युत्कंद जळत होता. त्याचा प्रकाश आम्हां सर्वांना पुरेसा होता. माझे तीन्ही मित्र मनसोक्त पीत होते. त्यांच्या सौख्यसभेचें दृश्य डोळ्यांनीं पीत पीत मीहि सुखावलों होतों. सपाता दूर टाकल्यामुळें, माझे उघडे पाय, खालच्या हरळीशी चाळा करीत होते. हरळी थोडी ओलसर होती. तिचा स्पर्श पायांना गुदगुल्या करीत होता.

माझ्या डोळ्यासमोर एक मोठा, दहा हत्तींच्या अंगाएवढा कातळ उभा होता. त्या कातळावर एक वेली चढविली होती. तिचीं पिवळीं फुलें, आतां झिंगल्यानें पांढुरकीं वाटत होतीं. दिवसां पाहिलीं होतीं म्हणूनच त्यांचा रंग रात्रीं भासत होता. भिजून सुकलेला तो कातळहि एकाद्या सुस्त मद्यप्यासारखा वाटत होता. तारा झिंगल्या होत्या. वारा झिंगला होता. झाडें झिंगलीं होतीं. कातळ सुस्तावला होता. दूरवर दिसणारे सिकंदराबाद शहरांतले दिवे देखील तारवटलेल्या डोळ्यांसारखे होते. मला भूक लागली होती; पण माझ्या मित्रांपैकीं कुणीहि कांहीं खाण्याची इच्छा देखील दाखवीत नव्हता.

अण्णांनीं आपल्या मोकळ्या प्याल्यांत परत चार बोटें व्हिस्की टाकली. सोड्याची बाटली अलगद फोडली. आंतला प्रवाह खिदळत बाहेर आला. त्यांनीं त्या बाटलीचा गळा मद्याच्या पेल्याशीं भिडवला, तरीहि सोड्याचें खिदळणें पेल्याबाहेरच सांडलें. अण्णांना आतां खूप चढली होती. बाटली, पेल्याची भेटहि त्यांना सहजपणें घडवितां येईनाशी झाली होती. समोरचा पेला त्यांनीं लटपटत्या हातांनीं उचलला. घटाघटा एका दमांत पिऊन टाकला. तोंडांतल्यातोंडांत एक मिटकी मारली. झोपाळलेल्या माणसासारखे ते बसल्या खुर्चीत मागें रेलले. डोळे गच्च मिटून त्यांनीं आपल्या मस्तकाचा मागील भाग खुर्चीच्या पाठफळीवर टेकला. त्यांचे हात सैलपणें हवेंत मिटूं लागले. डोळे मिटूनच अडखळत्या स्वरांत ते गाऊं लागले.

' मैं मयकदेकी राहसे होकर निकल पड़ा
वरना सफ़र हयातका कितना दराज़ था ।

' छट्ट ' मीं एकदम ओरडलों. ' उर्दू शाहीरांनीं दारूबाजीचं फार कौतुक करून ठेवलंय्. दारू पिण्यावांचून ह्यांनीं दुसरं कांहीं सुख अनुभवलं नसावं. सदा न् कदा मय, मयकदर साकी, सागर, सुराही शराब, मैफिल, दिदं, आणि दुख्तरे अंगूर '

माझ्या बोलण्यानें अण्णांचे डोळे किलकिले झाले. त्यांनीं टेकलेली मान हलकेंच वर उचलली. सरळ बसण्याचा प्रयत्न करीत तोतरत्या शब्दांत पण ठाम आवाजांत ते म्हणाले, ' दादा—'

' जी ' मी म्हणालों. कांहीं अबोल माणसें ' प्यायल्या ' वर बोलकीं होतात आणि जेव्हां बोलकीं होतात, तेव्हां फार चांगलें असें कांहीं तरी त्यांच्या तोंडून बाहेर पडतें, हें मला माहीत होतें.

' मी वयाच्या तेरा वर्षांपासून दारू पितोंय्. '

' कमाल झाली. '

' कमाल झाली ? अण्णाजी, तमे वो मजदूरनी वार्ता कहो, केटली खरी छे ' रंजनकाका झटक्यानें उठत बोलला.

अण्णांनीं वांकून हिरवळीवरची एक बाटली उचलली आणि ते रंजनकाकाच्या मोकळ्या पेल्यांत मद्य ओतूं लागले.

' ना, ना ' रंजनकाका पेला बाजूला घेत म्हणाला, ' हूं मागूं. हमणा तमे वार्ता कहो, सामळो दादा, ' तो मला उद्देशून बोलला. मी ऐकूं लागलों. अण्णा सरळ बसले. सांगूं लागले.

' दादा, '

मध्येंच घोरण्याचा स्वर उमटला. जया जपे खुर्चीतल्या खुर्चीत झोंपला होता. रंजनकाका भेलकांडत उठला. निवासस्थानाच्या, झोंपावयाच्या खोलींतून त्यानें एक उशी आणली आणि ती त्याच्या मानेखालीं दिली. तो थोडासा चाळवला आणि परत झोंपला. मग घोरला नाहीं.

' कहो ' रंजनकाकाहि डोळे मिटून ऐकायला बसला.

अण्णा सांगूं लागले,

' पारतंत्र्याच्या ओल्या काळांतली गोष्ट आहे. तेव्हां आपल्या मुंबई राज्यांत देखील दारूबंदीचा खुळा कायदा झालेला नव्हता. एका पुरुषानं किती बायका कराव्यात याचं गणित सरकार मांडीत नव्हतं. देशाला स्वातंत्र्य नव्हतं पण माणूस पुष्कळ स्वतंत्र होता. आतांपेक्षां पुष्कळ सुखी होता.

' बरं ' अण्णांचीं हीं मतं मला माहीत होतीं. मी तीं अनेकदां ऐकलीं होतीं. मला औत्सुक्य होतें तें ते सांगणार होते त्या कथेबद्दलचें.

' तर तेव्हांची गोष्ट ' ते सांगूं लागले, गिरगांवांत ' रेल्वे बार नांवाचं एक दारूचं दुकान होतं. बीअरची बाटली फक्त चौदा आण्याला मिळायची त्या काळांत. वरोबर पापड, लोणचं, सलाड मोफत. मी त्यावेळीं नुकता मुंबईत आलों होतों. धंद्याचा जम तर

सोडाच, अजून ताकाला तूर लागली नव्हती. कांहींतरी उद्योग करून महिन्याकाठीं पन्नाससाठ रुपये मिळवीत होतो. एकटाच होतो. तो रेल्वेबार'ही एकच मला बिसाव्याची जागा होती. आनंद नांवाची वस्तु मला तिथंच तेवढी दृष्टीस पडत होती. माझ्याहि हाताशीं येऊं शकत होती. एका संध्याकाळीं मी असाच थकून भागून गेलों होतों. 'बार' मध्यें जाऊन एका टेबलाशीं बसलों. माझ्यासारखे पुष्कळजण तिथं होते. सारीं मेजें भरलेलीं होती. मी एका मेजाशीं जाऊन बसलों. स्वतःचा खिसा चांचपून पाहिला आणि वेटरला ऑर्डर दिली 'एक बिअर'

खरं सांगायचं म्हणजे त्या काळीं मी ज्या दिवशीं पीत असे त्या दिवशीं खात नसे. परवडतच नव्हतं तें.

बीरची बाटली आली. मी ती अलगद फोडून पेल्यांत ओतली. अधीरपणें फेसाळता पेला ओंठाला लावला. डोक्यांत शंभर दुखांचं काहूर होतं. एकाएका घोटासरशी एकएक दुःख लंगडं होऊं लागलं. मी आतां इतकं पितो तरीहि माझी शुद्ध जात नाहीं. त्याकाळीं तसं नव्हतं. आपण मद्य प्यायला जातों आहोंत या कल्पनेपासूनच कैफ चढायला आरंभ व्हायचा.

मी ती सारी बीटर्ली संपवली. शरीर जरा हलकं झालं. कांद्यांचा काप आणि लोणचं जिभेवर ठेवल्यावर, आणखी पिण्याची इच्छा झाली. खिशांत तेवढे पैसे नव्हते. नाहीं तर त्या दिवशीं व्हिस्की मागवली असती. स्वतःच्या दारिद्र्याचा संताप सावरीत मी उठणार एवढ्यांत एक वेटर माझ्यासमोर आला.

"साहब!'

'क्या है!'

'भीड़ बहोत है, आपकी इज़ाज़त हो तो एक आदमी यहाँ बैठना चाहता है।

एका मेजाशीं एकाच मद्यप्यानें बसावें असा त्या मद्यालयाचा रूढ संकेत होता. मी वेटरला कांहीं उत्तर देण्यापूर्वींच एक रमची बाटली खाकेंत मारून एक गृहस्थ जवळ आला. त्याचें वय पस्तिशीच्यी आसपास असेल. चेहऱ्यावरून तो मध्यमवर्गीय दिसला नाहीं. श्रीमंत तर खचितच नव्हता तो. अगदीं मजुरासारखा अवतार होता त्याचा. कमरेला एक खाकी पँट, तिच्या शेवटार्चां सुतं निघालेलीं. तीं मळलेलीं. अंगांत तसाच एक शर्ट. त्याचा छातीवरचा खिसा फाटलेला. एका कानांत विडी अडकवलेली. दाढीचे खुंट वाढलेले. डोळे खोल गेलेले. रंग काळा. डोळ्याखालीं आणखी काळा. डोक्यावर टक्कल पडत आलेलं. केस कांहीं काळे. कांहीं पांढरके. तो अनोळखी इसम वेटरच्या मध्यस्थीसाठीं थांबला नाहीं. माझ्या खांद्याला स्पर्श करून अजीजीनें म्हणाला, 'साहेब मी बसूं इथं? आपण घेऊं थोडी थोडी'

वास्तविक मी त्याच्या बरोबर बसून प्यावें असा तो दिसत नव्हता. पण मी तहानेलेला होतो. खिशांत पैसा नव्हता. आणखी पिण्याच्या आशेनें माझी जीभ पटकन् बोलून गेली 'हो, हो, त्याला काय हरकत आहे. बसा कीं' :तो माझ्या पुढ्यांतील खुर्चीवर बसला. बसल्याबरोबर भपकन् घामट असा वास आला. एकदां वाटलें उठावें. पण तोंवर त्यानें बाटली खोलली. माझा उष्टा प्याला अलिकडे ओढला. त्यांत भरगच्च रम ओतली. मला तें कडक मद्य खरोखरच हवें होतें. मी उठलों नाहीं. पेल्याला पेला चिकटवून तो म्हणाला,

'सुखानं रहा साहेब'

'सुखानं रहा' मीहि म्हणालों.

माझा एक पेला रिकामा होतो न होतो तोंवर त्यानें तीन पेले झोंकले. त्याचा चेहरा तांबरला. डोळे भडकले. मग तो उगीचच एकटक माझ्याकडे पाहूं लागला. पाहतां पाहतां त्याचे जाडसर काळे ओठ अलग झाले. एक चमत्कारिक हंसूं त्यांतून बाहेर पडलें. कांहीं गुपित सांगतांना काढतात, तसा खाजगी स्वर काढीत तो त्या धुंदींतच मला म्हणाला,

[पान ४९ वर चालू]





अनुक्रमणिका






विजय तेंडुलकर

तेव्हांही ती वेगळीच होती.

आम्ही लहानपणीं शिवाशिवी खेळलों होतों; एकमेकांच्या पाठींत रट्टे घातले होते, एकमेकांशीं मारामारी केली होती. मी तिचा शेपटा करकचून ओढला होता आणि ती मला कडकडून चावली होती पण ती केव्हांही रडल्याचं मला आठवत नाहीं. आम्हां मुलांच्यांत क्रिकेट, हुतूतू खेळायला ती येई आणि आम्ही तिला मुलगी म्हणून घेत नसूं. अशावेळीं ती पुष्कळ चिडे, शरीरांत मावत नसे एवढा राग तिला येई, दांतओठ खाऊन ती मला दोन्ही हातांनीं मारीदेखील; पण उलट मार खातांना रडत नसे.

त्याला आतां फार दिवस, फार वर्षं झालीं. त्यावेळीं निरागस अजाणतेपणीं केलेलं, घडलेलं तें सारं आतां एका वेगळ्याच प्रकाशांत पाहून होतं.

ती वेगळी होती.

तिच्या मनगटांत पुरुषी जोर होता. तिचे राग, लोभ, सारे पुरुषी होते. तिचे डोळे तेव्हांही निर्भय, धीट, बेडर वाटत. जिवणीचं आणि हनुवटीचं वळण पुरुषी होतं, त्यांत नाजुकपणाच नव्हता. हळवेपणा नव्हता.

बालपणीं तुटलेली आमची ओळख कॉलेजांत पुन्हा जोडून घेतली गेली. आतां ती थोराड वाढली होती आणि माझ्या डोक्यावरचे केंस

" मी सोलापूरचा साहेब. सोपान माझं नांव. गिरणींत काम करत होतो. पोटापुरतं मिळवीत होतों. घरीं बायको, दोन मुलं आणि म्हातारी. संसार सुखात होता. तेव्हां कधीं हात लावत नव्हतो मी या लाल पाण्याला. एक साल सोलापूरांत गांठी तापाची साथ आली. साथ आली आणि मी आजारी पडलों. अंथरुणाला खिळलों. बायको, म्हातारी, दोघीहि माझी सेवा करीत होत्या. माझ्याशिवाय घरांत दुसरा जाणता बापई कुणी नव्हता. माझ्या कांखेत गोळा उठला तशीं, बाया-माणसं घाबरलीं. शेजारींच एक दोस्त रहात होता. सुखानं राहूं दे तो दादाअप्पा. त्याचं नांव मी घेत नाहीं. मी कैफांत बोलत नाहीं साहेब. या अनुभवाच्या गोष्टी आहेत. बायकोनं धाकल्या पोराला त्या दोस्ताकडं पाठवलं. फार मोठ्या काळजाचा माणूस तो. माझा अगदीं लंगोटीयार. धांवत आला. माझ्या अगदीं उशागती बसला. माझं दुखणं त्यानं ओळखलं. मला धीर दिला. रात्रंदिवस माझ्याजवळ राहूं लागला. मला औषधपाणी करूं लागला. शहर फुटलं. लोक रानांत राह्यला गेले. माझ्या बायकोच्या माहेरचीं माणसं आलीं. माझा रोग माझ्या बायकोला लागूं नये म्हणून तीं त्या साऱ्यांना घेऊन गेलीं. एवढी मायेची बायको पण आपल्या प्राणाच्या भीतीनं मला आजारी टाकून निघून गेली. मला विचारून गेली. सांगून गेली. जातांना डोळे भरून आले होते तिचे. मीच आपल्या तोंडानं तिला जायची परवानगी दिली. हा हा हात तिच्या पाठीवर फिरवला. मग ती गेली. बायको माहेरीं गेली. लेकरं आजोळीं गेलीं. मी राह्यलों घरांत मरणाच्या दारांत. बायको पोरं गेली ती गेलीच, पण खरं वाटणार नाहीं मास्तर तुम्हांला एक दिवशीं म्हातारीसुद्धां गेली. माझ्या बहिणीच्या खेड्यावर जाऊन राहिली. त्या सगळ्यांचं जाणं बरोबर होतं. मी गांठी तापाचा रोगी. गांठताप, साथीचा आजार. त्यांचं जाणं बरोबर होतं. माणसाला आपला जीव प्यारा असतो. गेलीं. सगळीं गेलीं. घर मोकळं. मी अंथरुणावर. तेव्हां माझ्याजवळ कोण राहिलं साहेब ? माझा दोस्त. त्यानं आपली बायकापोरं सासुरवाडीला पिटाळली आणि आपण माझ्याजवळ राहिला. आई, बाप, बायको, लेकरं या सगळ्यापेक्षां दोस्तान्यांचा कळवळा कांहीं वेगळा असतो. तो माझा दोस्त माझ्याजवळ राहिला. मरणाच्या दारांत त्यानं माझा हात सोडला नाहीं. कुणी करणार नाहीं. इतकी सेवा केली त्यानं माझी. त्याच्या उपकारांना कांहीं सीमा नाहीं. काम धंदा, घरदार सारं सोडून तो माझ्यापाशीं राहिला. त्याच्या पुण्याईनंच मी त्या आजारांतनं बरा झालों. खडखडीत अगदीं खडखडीत बरा झालों चार महिने गेले साथीचा भर ओसरला. फुटलेलं शहर पुन: वसायला लागलं माझी बायकापोरं माघारी आली. आई आली. सगळ्यांनीं मला मिठ्या मारल्या. म्हातारीनं मुके घेतले. बायकोनं मुके दिले. पोरांनी पापे पाजले. मला ते नाटक नाहीं वाटलं दादा. खरं वाटलं. सगळं खरं वाटलं. माझ्या घरच्या माणसांची माया कांहीं कमी झाली नव्हती. तशीच होती. पण घरच्यांच्या मायेपेक्षां माझ्या दोस्तानं दाखविलेला जिव्हाळा वाढ होता. आभाळा एवढा होता. त्याचे उपकार मी कसे फेडणार ? फार मोठा माणूस. देव, धरतीवरचा देव तो !

इतका वेळ बोलत राहिलेला सोपान मधेच थोडका थांबला परत तसलेंच चमत्कारिक हंसला. आतां त्याला ती कथा पुरी सांगायची होती. श्रोता कोण आहे याचें त्याला भान नव्हते तो तीं कथा कां सांगतो आहे याचीहि आठवण त्याला नव्हती त्यानें मेजावरचा पेला दूर सारला. हाताचे कोंपर मेजावर टेकले. अगदीं हळु आवाजांत तो पुढें सांगू लागला--

' पुढं ऐका दादा--' आणि त्याला हुंदका दाटला. थोडा वेळ परत गप्प होऊन, अत्यंत कष्टानें तो बोलूं लागला. अगदीं हळु







आवाजांत बोलूं लागला. पुढं मी सोलापूर सोडलं. नशिब काढावं म्हणून मुंबईला आलों. इथं चाकरी मिळाली तशी बायकोपोरं पण इथं आणलीं. इथं पैसा मिळायला लागला. संसार टाकठीक लागला, पण माझ्या त्या दोस्तावाचून मला गमेना तो नुसता माझा दोस्त नव्हता. माझा बाप होता. त्यानं मला पुनः जलम दिला होता. तो माझा देव होता. त्यानं मला एक जिंदगी बक्षीस देऊन टाकली होती. मी त्याला कागद लिहिला इकडे ये म्हणून. मास्तर, तो तिथली नोकरी सोडून माझ्यासाठीं इथं आला. इथं त्याला कामलागलं, आम्ही दोघंजण एकाच गिरणींत काम करूं लागलों. तो माझ्या घरींच राहत होता. बायका पोरं अजून आणली नव्हती त्यानं, माझं घर—गिरणगांवातल्या त्या दोन खोल्या—म्हणजे रामाचं राज्य होतं ..पण एक दिवशी मी काय पाहिलं साहेब ? रात्रपाळी आटपून मी घरीं आलों. म्हातारी पोरांना पोराशीं घेऊन गॅलेरीत खाटेवर झोपलीं होती. बिऱ्हाडाचं दार बंद होतं. उघड्या खिडकींतून दिव्याचा उजेड दिसत होता. आंत कुणीतरी बोलत होतं. कां कुणाला ठाउक. मी खिडकीशीं थबकलों. आंत कोण होतं ? माझी शेजेची बाईल आणि तो माझा जिवाचा दोस्त—तो तिच्या अंथरुणांत होता साहेब ! माझं सारं अंग पेटलं. लाथ मारून दार उघडावं आणि त्या दोघांचे प्राण घ्यावेत असं मला वाटलं. पण माझ्या हातून तें झालं नाहीं. मी कुणाला ठार मारूं ? माझ्या दोन चिमण्या पोरांच्या आईला ? मला जीवदान दिलं त्या दोस्ताला ? मला या सवालाचा जबाब तेव्हां सांपडला नाहीं. अजून सांपडला नाहीं......मला स्वतःला मरायचं नाहीं. माझी बायको, माझी लेकरं यांना मला साभाळायचं आहे. त्या दोस्ता-वर हात टाकण्याची हिंमत मला होत नाहीं. कुणी दिलं नव्हतं. कुणी देणार नाहीं; तें त्यानं मला दिलंय. जिथं जिथं भरांसा ठेवला तिथं तिथं धोका वाट्याला आला. मी काय करूं ? परवडत नाहीं तरीहि एकच गोष्ट मी करीत राहतो—दारु पितो दारु पितो. सारं पुसत नाहीं हिनं. पण पुसटतं—फिकं पडतं म्हणून पितो...मी दारुड्या नाहीं. दारुड्या नाहीं. तो रडूं लागला. पण त्याचें रडूं तोंडाबाहेर पडलें नाहीं. नुसते डोळे गळत राहिले. गाल भिजून चिंब होईतों तो रडत राहिला. मलाहि काय बोलावें तें सुचेना. किती वर्षे झालीं त्या गोष्टीला. तो माणूस मला अजून आठवतो. अगदीं जसाच्या तसा आठवतो. ''

एक दीर्घ निःश्वास टाकून अण्णा परत खुर्चीच्या पाटीशीं रेलले. रंजनकाका हलकेंच उठला. आणि हॉटेलच्या मुख्य इमारतीच्या दिशेनं भेलकांडत जाऊं लागला. माझें डोकें सुन्न झालें होतें. ' कुठें जातोस ? ' असेंहि मी रंजनकाकाला विचारलें नाहीं. त्याला आणखी मद्य हवें होतें. झोंपलेल्या वेटर्सना जागें करण्याच्या इराद्यानेंच तो तिकडे चालला होता. अण्णा परत गुणगुणूं लागले—

मैं मयकदेकी राहसे होकर निकल पड़ा
वरना सफ़र हयातका कितना दराज़ था ?

• • •







# आ ज चे

**मत्स्य**

प्रलयकाल ये महापुरानें तांदुळ झाला बंद
मत्स्यावतार घेउनि के-शव पुरवि भुकेचा छंद

**कच्छ**

कूर्मगतीची समाजोन्नती मानु नका हो तुच्छ
पाठीवरती भार झेलितां पुच्छ आंत घे कच्छ

**वराह**

अन्नप्रश्न बुडवितां धराही वराह घे अवतारा
दातीं तृण त्यापरी तोलतो दंताग्रीं अधिकारा

**नारसिंव्ह**

लोकमताचा नारसिंव्ह हा स्तंभातुनि प्रगटला
द्विभाषिकाचें उदरविदारी प्रल्हादा पावला

**वामन**

वामनमूर्ती श्रीपादाची धनवंता उद्धरी
त्रिपादभूमी घ्याया ठवी पाय बळीच्या शिरीं












# दंशावतार

**परशुराम**

‘उत्तरक्रीया’ करावयातें पराक्रमी संतान
भार्गव घेउनि परशू तोडी निज-मातेचा मान

**राम**

‘राम’ नाहीं राहिला धनुसारखी वाके तनू
सीतेस जिंकाया धजे परि पेलवेना तें धनू

**कृष्ण**

वाजवीत बासरी ‘कृष्ण’ हा दंभकदंबावरी
करी दिगंबर भारतभूमी गुप्तपणें ‘श्री’ हरी

**बौद्ध**

लुडबुड मामा, दलाइ लामा बुद्धाचा अवतार
परचक्राचें बोधचिन्ह हें पंचशील पुरणार

**कल्की**

कराल ती करवाल घेउनि लांच वशिला झोडा
कल्कीच्या अवतारासाठीं वाट पाहतो घोडा

—राजा बढे






पण. कल्की केव्हां अवतरणार ?




अनुक्रमणिका

( पान २७ वरून चालू )

" म्हणजे ? अंतूशेटना मुलगा आहे ?"

" आहे ? म्हणजे काय ? चांगला कलेक्टर आहे ! "

" कलेक्टर ? "

" भायखळ्याच्या स्टेशनावर तिकिटें गोळा करतो. "

चेहऱ्यावरची सुरकुती हालूं न देतां अण्णा म्हणाले.

" मग वडलांना मदत करीत नाहीं की काय ? "

" अहो करतो कधीं कधीं—त्यालाहि त्याचा संसार आहे... त्यांतून बी बी शी आयला जायपीचा डब्बा जोडलेला..."

ह्या अड्ड्यांतले हे विशेष शब्द गोळा गेले तर एक स्वतंत्र कोश होईल. बी बी सी आयला जी आय पीचा डब्बा जोडणें म्हणजे आंतर्‌जातीय विवाह हें लक्षांत यायला मला उशीर लागला.

" काय लक्षांत आलं ना ? तेव्हां अंतूशेटच्या स्नानसंध्येची पंचाईत होते–मुलाच्या घरीं थोडीं इतर आन्हिकेंहि चालतात म्हणे. आमच्या अंतूशेटचें जमायचें कसें ? एकदां सगळा अपमान गिळून नातवाचा चेहरा पाहण्यास गेला होता...गणित चुकल्यासारखा परतला... दसरा दिवाळीला अंतू बर्व्याला मिळतें आपलें मनिआर्डरींतून पितृप्रेमाचें पोस्त ! पांच दहा रुपयांचें ! तेवढ्यांत फिरतो मिशीला कोकम लावून तूप म्हणून सांगत ! आणि उगीचच खुर्दा खुळखुळावतो चार दिवस खिशांत हात घालून..."

" अहो तिकिट कलेक्टरला पगार तो काय असणार ? "

" पगार बेताचाच–पण चवल्या पावल्यांचीं आचमनें चालतात म्हणतात...खरं खोटं देव जाणें . आणि चालायचेंच ! घेतले तर घेऊं देत...काय ? अहो आठ आणे खाल्ले की चौकडीचा मुगुट घालून रत्नागिरीच्या डिस्ट्रिक्ट जेलांत घालतात . आणि एक लाख खाल्ले की गांधी टोपी घालून पाठवतात आसेंब्लींत ! लोकनियुक्त प्रतिनिधि ! "

राजकारण हा तर अंतूशेटच्या अड्ड्यांतला लाडका विषय ! प्रत्येक राजकीय पुढाऱ्यावर आणि तत्त्वप्रणालीवर अगदीं मौलिक विचार !

कोंकणांत दुष्काळ पडला होता. तसा तिथें नेहमींच दुष्काळ. पण हा दुष्काळ अंतुशेटच्या भाषेंत सांगायचें म्हणजे ' फ्यामिन् आक्टान्वयें पास, झालेला ! ' दुष्काळी भागांतून नेहरूंचा दौरा चालला होता. गांवांत धामधूम होती. कोणीतरी संध्याकळीं अंतूशेटना विचारलें " काय अंतूशेट ? भाषणास दिसलां नाहीं ! "

" कुणाच्या न्हेरूच्या ? छाट् ! अरे दुष्काळ पडला हितें—तर भाषणें कसलीं देतोस ? तांदूळ दे ! हें म्हणजे भाऱ्याच्या खाडींत बुडणाऱ्या दालद्याला विश्वेश्वराच्या घाटीवर उभें राहून कुराण वाचून दाखवण्यापैकीं आहे. तो तिथें बोंबल्तोय् नी हा हितें.. ह्याचा त्यास उपयोग नाहीं — नि त्याचा ह्यास ! तुम्ही आपले खुळे—आला न्हेरू चालले बघायास ! आणि रत्नांग्रींत दाखवलेंनीत काय त्यास ? बाळगंगाधर टिळक जन्मले ती खोली आणि खाट ? गंगाधरपंत टिळकास काय स्वप्नांत दृष्टान्त झाला होता काय रे—तुझ्या बायकोच्या पोटीं लोकमान्य जन्मास येणार म्हणून ? कुणाची तरी खाट दाखवली नि दिलें ठोकून त्याच्यावर टिळकान पहिलें ट्यां केलें म्हणून ! पुरावा काय ? का टिळकाच्या आयशीचें बाळंतपण केलेली सुईण होती साक्षीस ? टिळकाचे साडे ! शंभर वर्षें झालीं त्याच्या जन्मास. तूं जन्माला आलास ती खोली तुझ्या मातुश्रीस तरी सांगतां येईल काय ? म्हातारीस विचारून ये घरीं जाऊन आणि मग सांग मला टिळकाच्या नि नेहरूच्या गोष्टी ..."

मला नेहमीं प्रश्न पडे, कीं ह्या मंडळींची आदराचीं स्थानें कोणतीं ? गांवांत ' पंडित ' आला कीं त्याला ' पढिक ' म्हणून उडव.

" बाजारांत जाऊन पैशाचें लिंबू आणायास सांग. स्तंभाजवळच्या लायब्ररींत जाईल नि तिथें मागेल लिंबू ! "

कुणाचा मुलगा प्रोफेसर झाला हें ऐकल्यावर अंतुशेट चटकन् म्हणाले, " सर्कशींत काय हो ? पूर्वी एक छत्रेप्रोफेसर होता. " कुणी नवें दुकान काढलें तर ' दिवाळ्याचा अर्ज आत्तांच मागवून ठेव म्हणावें ' हा आशीर्वाद.

जीवनाच्या कुठल्या तत्त्वज्ञानाचा अर्क ही मंडळी प्याली आहेत देव जाणे. त्यांतलीं निम्याहून अधिक माणसें मनिआर्डरीवर जगतात आणि त्यांतले पैसे वांचवून दावे लढवतात. प्रत्येकाची तारीख पडलेली. विशाल सागरतीर आहे, नारळीचीं बनें आहेत...पोफळीच्या बागा आहेत...सारं कांहीं आहे पण त्या उदात्ततेला दारिद्र्य विलक्षण छेद देऊन जातं आणि मग उरतं एक भयाण विनोदाचं अभेद्य कवच !

कशावरून तरी गांधींच्या गोष्टी निघाल्या. अंतुशेटनीं आपलं भाष्य सुरू केलं. " अहो कसला गांधी ? जगभर गेला पण रत्नांग्रीस आला नाहीं-पक्का तो. त्यास नेमके टाऊक इथें त्याच्या पंचाचे कौतुक नाहीं नी दांडीचें नाहीं—आम्ही सगळेच पंचेवाले नि त्याच्याहि पेक्षां उघडे ! सुताबितांत तथ्य नाहीं हो ! आमचा शंभूभट जन्मभर जानव्याचें सूत काढीत आला. ब्रिटिशसरकार सोडा पण रत्नांग्रीचा गिलिगन कलेक्टर देखील घाबरला नाहीं !––तिसरें शस्त्र म्हणजे उपासाचें ! इथें निम्में कोकण उपाशी ! नेहमीं तुपाशीं खाणाऱ्यास उपाशी माणसाचें कौतुक...आम्हास कसलें ?...नाहीं, माणूस असेल मोठा ..पण आमच्या हिशेबीं त्याच्या मोठेपणाची नोंद करायची कुठल्या खात्यावर ? आणि स्वराज्याचा म्हणाल तर संबंध गांधीशीहि नाहीं, टिळकांशीहि नाहीं नि सावरकरांशीहि नाहीं.

" म्हणजे स्वराज्य काय आकाशांतून पडलं ? "

" तें कुठून पडलं तें तुम्ही तपासा ! पण इंग्रज गेला तो कंटाळून. अहो लुटण्यासारखें काय शिल्लक होतें ? धंदा बुडीत खातीं जायला लागला––फुकलेनीत दिवाळें ! कुंभार मडकी घेऊन गेला तुम्ही फुंका उकिरडा ! हें सगळें चक्रनेमिक्रमेण होतें...सत्ता इंग्रजाची नाहीं. न्हेरूची नाहीं आणि जनतेची नाहीं ..सत्ता आहे विश्वेश्वराची !

" मग तुमचा विश्वेश्वर इंग्रजाच्या ताब्यांत कसा गेला ? "

" खुळे की काय तुम्ही ? विश्वेश्वर घट्ट आहे राजिवड्यावर ! अहो एक खेळ करून दाखवला त्यानें..."

" दीडशें वर्षांच्या गुलामीचा कसळा खेळ ? "

" अहो दीडशें वर्षे तुमचीं ? ब्रह्मदेवाच्या रिष्टवाचांतला काटा सेकंदान देखील सरकत नाहीं हजारवर्षें ओलांडल्याशिवाय ! "

कोंकणांतल्या त्या मधल्या आळींतल्या ओसरीवर, भोंवती माडाच्या काळ्या आकृती हलतांना कंदिलाच्या प्रकाशांत तीं–– थकलेलीं सुकलेलीं तोंडें हें तत्त्वज्ञान सांगूं लागलीं कीं काळीज हादरतें..." अहो समाजवादाच्या गप्फा आहेत हो गप्फा ! अहो एक आंब्याचें पानदेखील नसतें हो दुसऱ्यासारखें...ब्रह्मदेवाच्या दरबारीं प्रत्येक भांडें निराळें...सगळ्या माणसांचीं नशिबें सारखीं






होतील कशीं ? घटकाभर धरा तुमचा आला समाजवाद ! तो आमचा रत्नांग्रीचा गांवगांधी शिट्ट्या फुंकूनफुंकून सांगतो तशी आली कोकण रेल्वे नी गेली पांडू गुरवाच्या परसांतून—म्हणून काय थोट्या पांडबाच्या खांद्याला हाताचे खुंट फुटणार काय ?...आणि हात नाहींत म्हणजे मग कसेल त्याची जमीन दिसेल त्याची थैली ह्या तुमच्या राज्यांत थोटा पांडू कसणार काय नि कसा ? तो तसाच रहायचा ! स्वराज्य आलं म्हणून हरि साठ्याचा तिरळा डोळा सरळ नाहीं झाला नि महादेव गडबोल्याचं धोंद आंत नाहीं गेलं !—हें डावें उजवें रहायचंच समाजांत ! अहो रामराज्यांत देखील मारुतीचे शेपूट उपटून रामान् आपल्या पाठीस नाहीं जोडले—हा नरच राहिला नि तो वानरच राहिला..."

अशावेळीं अंतूशेटच्या जिभेवर सरस्वती नाचते.

" बरोबर आहे ! "

" उगीच तोंड देखलें बरोबर आहे म्हणूं नका त्या श्यामराव मुरकुट्यासारखें ! चुकत असलें तर कान उपटा ! तुम्ही माझ्याहून लहान खरे पण शिक्षणान् थोर आहांत..."

अंतूशेटच्या असल्या भाषणांत केवळ तिरका विनोद नसतो—त्यांचें कुठेंतरी कांहींतरीं जळत असतें.

गेल्या चारपांच वर्षांत रत्नागिरीला फारवेळां जातांच आलें नाहीं. आतां तिथें वीज आली. कॉलेज आलें—डांबरी रस्ते आले. मी दोन तीन वर्षांपूर्वी गेलों तेव्हां अंतुशेटना म्हणालों,

" अंतुशेट रत्नागिरी झकपक झाली हो तुमची ! विजेचे दिवे आले. तुमच्या घरीं आली की नाहीं वीज ? "

" छे हो–काळोख आहे तो बरा आहे ! उद्यां झकपक प्रकाश पडला तर बघायचें काय दळिद्रच ना अहो पोपडे ? उडालेल्या भिंती नि गळकी कौलं बघायला वीज हो कशाला ? आमचे दळिद्र काळोखांत दडलेले बरें ! " अंतुशेट मनमुराद हंसले. या खेपेला दातांचा जवळजवळ संपूर्ण अण्णा गोगट्या झालेला दिसला. शिवाय अड्ड्यांतलीं आणखीहि एकदोन मंडळी ' निजधामाला ' गेल्याचें कळलें.

कधीं नाहीं ती एक कारुण्याची नि गोडव्याची झांक अंतुशेटच्या बोलण्यांत मला आढळली. अड्ड्यांतल्या रिकाम्या जागा त्यांच्या मनांत कुठंतरी घर करून जात असाव्यां. " जोगळेकरांचा मुलगा दिल्लीस बदलला हो वरच्या जागेवर..." अंतुशेट आपण होऊन सांगत होते. " म्हाताऱ्याला काशी विश्वेश्वर हरिद्वार हृषिकेश घडवून आणलनीत...मावंदे घातलें जोरदार शंभू जोगळेकरान् ! गंगेच्या पाण्याचा लहानसा गडू शिलबंद करून आठवणीन् घेऊन आला माझ्यासाठीं ! पुढल्या खेपेला याल तेव्हां त्याचें शिल फोडून गडू आमच्या तोंडांत उपडा झालेला दिसेल हो जांवयबापू..." पहिल्या भेटींतलें संबोधन अजून कायम होतें.

त्यानंतर गेल्याच वर्षी पुन्हां रत्नागिरीला जाण्याचा योग आला. अंतुशेटच्या घरचा गंगाजलाचा गडू सुदैवानें सीलबंदच होता.

" वा वा कांग्रेचुलेशन हो जांवयबापू ! कळलें आम्हाला. जाऊन या हो. एक रिक्वेष्ट आहे. आतां इंग्लिश बोललें पाहिजे तुमच्याशीं..."

" कसली रिक्वेस्ट ? "

" तेवढा कोहिनूर हिरा पाहून या. माझी आपली उगीच्च तेवढी इच्छा राहिली हो ! पिंडाला कावळा नाहीं शिवला तर कोहिनूर कोहिनूर म्हणा. शिवेल ! परत आल्यावर सांगा कसा दिसतो तो. लंडन प्यरिस सगळं बघून या. " मला उगीचच त्यांच्या पाया पडावें असें वाटलें. मी रस्त्यांतच त्यांना वाकून नमस्कार केला.

" आयुष्यमान् व्हा ! श्रद्धाळू आहांत म्हणून यश आहे हो तुम्हाला. "

मी निरोप घेतला आणि चार पावलें टाकलीं असतील: लगेच हांक ऐकूं आली...

" ओ जांवयबापू..."

" काय अंतूशेट ? "

" जातांय तें एकटेच की सपत्नीक ? "

" आम्ही दोघेंहि जातोंय्. "

" हें चांगलें केलेंत !...उगीचच एक किडा आला डोक्यांत. म्हटलें परदेशीं विद्या शिकायला निघाला आहांत—देवयानीची कथा आठवली...काय ? आमच्या मुलीलाहि आशीर्वाद सांगा हो ! तुमचं भाग्य तिच्यामुळें आहे. तुम्हाला म्हणून सांगतों. मनांत ठेवा हो !...कुठें बोलूं नका. चाळीस वर्षांपूर्वी आमची ही गेली...दारचा हापूस तेव्हांपासून ह्या घटकेपर्यंत मोहरला नाहीं...शेकड्यानी आंबा घेतलाय् एकेकाळीं त्या आंब्याचा...पण भाग्य कुठल्या वाटेनं जातं बघा. असो...सुखरूप या...इथून प्रयाण केव्हां ? "

" उद्यां सकाळच्या एस्. टी. नें जाणार ! "

" डायरेक्ट मुंबई की काय ? "

" होय ! "

" हें चांगलें केलेत ! एकदां तो प्रवास घडला की त्या चिकाटीवर माणसानी पृथ्वीप्रदक्षिणा करून यावे...परवां वरच्या आळींतला तात्या जोग जाऊन आला...अजून हाडांचा हिशेब जमवतोय–सात-आठ हांक हरवलीं म्हणतो त्या यष्टींत..." अंतूशेट सगळें तोंड उघडून हंसत होते. आतां त्या तोंडांत एकच दांत लुकलुकत होता.

पहांटे पांच वाजतां एस. टी. स्टॅण्डवर अंतुशेटची ' जांवयबापू ' ही खणखणीत हाक ऐकूं आली. मी चकितच झालों. अंतुशेटनी वैद्याच्या पुडी सारखी एक पुडी माझ्या हातीं दिली.

" तुमचा विश्वास नाहीं, ठाऊक आहे मला. पण एवढी पुडी असूं द्या तुमच्या खिशांत. विश्वेश्वराचा अंगारा आहे. विमानांतून जाणार म्हणून कळलें वकिलसाहेबांकडून...एवढी पुडी जड नाहीं खिशाला..."

एस्. टी. सुटली. आणि अंतुशेटनी आमच्या कुटुंबीयांबरोबर, सदरा वरून आपले म्हातारे मिचमिचे डोळे पुसले. तेवढ्या अंधुक प्रकाशांत त्यांचें तें खपाटीला गेलेलें पोट चटकन् माझ्या डोळ्यावर उगीचच आघात करून गेलें.

कोकणांतल्या फणसासारखींच तिथलीं माणसें देखील खूप पिकल्याशिवाय गोडवा येत नाहीं त्यांच्यांत !

• • •

अनुक्रमणिका

व सं त   स ब नी स




तें चकचकीत काळें यंत्र ज्या दिवशीं आमच्या घरांतल्या छोट्या टेबलावर येऊन बसलें त्या दिवशीं घरांत आनंदाचे पाट वाहिले

—असा दिवस पुन्हा दिसणें नाहीं—बस्स ! आनंद आणि टेलीफोन या दोघांचा संबंध त्या दिवशीं आला तेवढाच—!

नवी सृष्टी निर्माण करण्याचा प्रसंग विश्वामित्रासारखा माझ्यावर आला तर बाकीच्या सृष्टीचें कांहींही होवो, पण प्राण गेला तरी दोन वस्तू मी कधींही निर्माण करणार नाहीं. एक म्हणजे चप्पलला मारले जाणारे बारीक खिळे आणि दुसरी टेलिफोन ! त्या खिळ्यांपायीं मी माझें रक्त सांडलें आहे आणि टेलिफोननें माझें रक्त आटविलें आहे. त्यामुळें माझ्या रक्तानें या दोन्ही वस्तूंची धास्ती घेतली आहे. खिळ्यानीं माझ्या तळपायाला इतकीं छिद्रें पाडलीं आहेत कीं त्यामुळें तेथली आग मस्तकापर्यंत पोंचावयास क्षणार्धही लागत नाहीं. अगदीं सज्जन चांभारानीं प्रेमानें मारलेले खिळेसुद्धां रक्तपिपासू ठरले आहेत. चप्पल फाटल्या, त्यांच्या चिंध्या झाल्या; पण खिळ्यांची बोंच मात्र प्रेमभंगाच्या आठवणीसारखी ठणकतच राहिली. चप्पल ही वस्तू फक्त पायापुरतीच मर्यादित राहिली हें माझें केवढें भाग्य ! नाहींतर माझा येशू ख्रिस्त होण्यास वेळ लागला नसता ! बोंचणाऱ्या खिळ्याच्या डोक्यांत हातोडी किंवा दगड तरी घालता येतो पण टेलिफोनच्या बाबतींत तेंही करता येत नाहीं.

टेलिफोन हें एक उपयुक्त साधन आहे असें कां म्हणतात हें मला अजूनही कळलेलें नाहीं. मला विचाराल तर, मी ऊंट पाळीन पण टेलिफोन पाळणार नाहीं. टेलिफोन समाजवादी आहे कीं नाहीं हें मी सांगू शकणार नाहीं; पण तो छळवादी आहे याबद्दल सूज्ञांत तरी दुमत होईल असें वाटत नाहीं ! न वाजणारा आणि न छळणारा टेलिफोन मी अजून कुठेंही पाहिलेला नाहीं.

कांहीं अज्ञानी लोक टेलिफोन हें श्रीमंतीचें व प्रतिष्ठितपणाचें गाजणारें ( किंवा वाजणारें) लक्षण आहे असें मानतात. आधुनिक सुखवस्तु घराला टेलिफोनशिवाय पूर्णत्व येत नाहीं अशी ज्यांची धारणा आहे त्यांच्याबद्दल मला कींव येते. जगांत एकंदरींत अज्ञानाचें प्रमाण अधिक हें अशावेळीं पटतें. कारण मीही एकदा टेलिफोनवादी होतों. पण आतां मी टेलिफोनची वादीसुद्धां घरांत राहूं दिलेली नाहीं. पण ' इथें वाजला फोन एकदा। इथें गाजला फोन एकदा ' ! अशी स्थिति एकदा होती.

वास्तविक टेलिफोनची मला तशी कांहींही जरूरी नव्हती. पण फोन घरीं आल्यानं आपली प्रतिष्ठा वाढेल असा माझा निष्कारण समज झाला. आणि मग कुठलाही प्रश्न प्रतिष्ठेचा झाला कीं माणूस जिद्दी बनतो. मी अनेक खटपटी लटपटी करून आणि ज्याला इंग्रजींत वायर पुलिंग म्हणतात तें करून टेलिफोनच्या तारा मी घरांत आणल्या. अर्थात् आपल्या घरांत टेलिफोन असला पाहिजे असें माझ्यापेक्षां अधिक प्रमाणांत बायकोला वाटलें. कारण अगदीं स्पष्ट होतें. त्यामुळें तिचा

भगिनी मंडळांतला भाव एकदम वाढणार होता. अध्यक्षपद तिच्या आटोक्यांत आलें होतें; फक्त टेलिफोनचाच बांधा होता. टेलिफोनचा खांब दारांत आला कीं त्या खांबावरून टेलिफोनच्या तारा आणि बायकोचें अध्यक्षपद माझ्या घरांत उतरणार होते. कारण प्रधानीणबाईच्या गटांतल्या चार भगिनी वास्तविक माझ्या बायकोच्या गटांतल्याच होत्या. पण केवळ प्रधानीण-बाईंच्या घरून फोन करायला मिळतो, एवढ्यासाठींच त्या त्यांच्या गटाला टांगून राहिल्या होत्या. तेव्हां त्यांना आमच्या घरांतल्या फोनची अडणी दिली कीं त्या लगेच महालक्ष्म्यांसारख्या बायकोच्या गटांत येऊन बसणार होत्या. बायकोचें वजन ( फक्त मंडळांतले ! ) वाढणार होते. तरी पण तिनें जेव्हां मला, " दोनच दागिने हवेत " असें म्हटलें तेव्हां माझी छाती दडपली होती. मी काळजीनें विचारले, " दोन दागिने ? आणि ह्या दिवसांत ? "

" हो. पण त्यांतला एक मिळालाच आहे. दुसरा तेवढा घ्यायचा हं. "

मला कांहींच कळलें नाहीं. मी नुसता देवळांतल्या गायमुखासारखा आ वासून बघत राहिलों.

असं काय करतां ? एक दागिना म्हणजे तुम्ही—"

माझ्या अंगावर रोमांचांचा थवा ! दोन चार मुठी मांस. चेहेऱ्यावर शरदांतली पौर्णिमा. वाढलेल्या दाढींतूनही स्पष्ट दिसणारा अभिमान ! न्हाव्यानें मानेच्या शिरा चोळ-तांना वाटते तसे सुखावह वाटूं लागले. तरी पण दुसऱ्या दागिन्याची भीति होतीच. बायकोच्या नज़रेंत भलतेंच मार्दव होतें. न पटणारें !

" आणि दुसरा ? " मी अनावर उत्सुक-तेनें विचारलें.

" टेलिफोन. "

" टेलिफोन ? दागिना ? "

" जसे तुम्ही तसाच टेलिफोन. "

नकळत टेलिफोनचा काळा कुळकुळीत रंग माझ्या अंगावर ओघळला. माझी चल-बिचल बायकोच्या ध्यानांत आली असावी.

" म्हणजे असं कीं या दोन गोष्टींमुळेंच मला सुख मिळेल. " तिचा खुलासा.

असा फोन घरांत आला. तें चकचकीत काळें यंत्र ज्या दिवशीं आमच्या घरांतल्या छोट्या टेबलावर येऊन बसलें त्या दिवशीं घरांत आनंदाचे पाट वाहिले. बायकोनें भगिनी मंडळाच्या जेवढ्या म्हणून भगिनींना फोनवर बोलावतां येईल तेवढ्यांना दुसऱ्यांच्या फोनवर बोलावून आमच्या घरीं फोन लागला असल्याचें मोठ्या अभिमानानें सांगितलें. त्या दिवशीं नाहीं म्हटलं तरी गांवांतल्या शंभर सव्वाशें घरांतल्या फोनच्या घंट्या आमच्या बायकोमुळं वाजल्या असतील ! अर्थात् त्यांत मीहि थोडा हात धुवून घेतला ही गोष्ट वेगळी. सहज सुलभ असतं तर इंग्लंड अमे-रिकेंतल्या लोकांनाही आमच्या घरीं फोन आल्याचें सांगणार होतों. पण तें तितकें सोपें नव्हतें. त्यामुळें जगांतल्या पुष्कळ लोकांना आमच्या घरच्या टेलिफोनची वार्ता समजणार नाहीं याचें दुःख झालें ! आनंदांत जेवढे भागीदार अधिक तेवढा आनंद वाढतो म्हणतात. म्हणून त्या दिवशीं आम्ही आमच्या ओळखीच्या प्रत्येक टेलिफोनमध्यें थोडा थोडा आनंद टाकला. आणि आमचा आनंद



अनुक्रमणिका

असा कांहीं फोफावला कीं आमच्या आळीं-तल्या सर्व रस्त्यांतून आनंदच भरुन राहिला होता. कारण प्रत्येक घरांत आमच्या इथें टेलिफोन आल्याचें शुभवर्तमान फार वेगानें जाऊन पोचलें होतें. घरटीं दोन चार माणसें येऊन प्रत्यक्ष पाहून गेलीं. प्रत्येकाच्या चेहेऱ्यावर आनंद ओसंडत होता. दुसऱ्याच्या घरांतील चांगली वस्तू पाहून आनंदलेलीं माणसें मी प्रथमच पहात होतों! वास्तविक कोणाच्याही घरांत चांगली वस्तू आलेली दिसतांच त्या वस्तूचा चांगलेपणा शक्य तितका कमी करण्याचा अट्टाहास करणारीं हीं माणसें फोन पाहून खरोखरच हर-खून गेलीं होतीं. माझ्या आनंदांत उदार-पणें सहभागी होणाऱ्या त्या प्रेमळ आत्म्यां-बद्दल मला भलताच जिव्हाळा वाटूं लागला. दुसऱ्याच्या आनंदानें फुलून जाणारीं हीं माणसें म्हणजे देवमाणसेंच! माझा आणि बायकोचा आनंद घरांत मावत नव्हता. त्यांचा गगनां-तही मावत नव्हता. टेलिफोनमध्यें इतकी जादू असेल असें मात्र मला वाटलें नव्हतें. त्या आनंदाच्या उन्मादांत मी गाणें रचून तें म्हटलें सुद्धां. आतां तें सगळें आठवत नाहीं. कांहीं थोड्या ओळी स्मरतात--

फोन लागला घरीं  
सखे ग फोन लागला घरीं ॥

आतां भीती मुळींच नाहीं  
चोर जरी गे शिरला गेहीं  
फोन करावा गे लवलाही  
पोलिस ये सत्वरी ॥ सखे ग० ॥

तुला जरी गे आलें दुखणें  
घाबरणें वा मुळी न अडणें  
वैद्यासाठीं फोन फिरविणें  
होशिल तूं गे बरी ॥ सखे ग० ॥

आग लागली जरी घराला  
अतां नको गे धावायाला  
फोन फक्त तो करावयाला  
राहूं शुद्धीवरी ॥ सखे ग० ॥

त्या दिवशीं सबंध दिवसभर आम्हीं फोनवर तरी बोलत होतों किंवा फोनबद्दल तरी बोलत होतों. असा तो दिवस पुन्हां दिसणें नाहीं. बस्स! आनंद, आणि टेलिफोन या दोघांचा संबंध त्या दिवशीं आला तेवढाच. पुन्हां आनंदाचा स्पर्श म्हणून त्या टेलिफोनला कधीं झाला नाहीं.

आळींतल्या लोकांचीं इतके दिवस तुंबलेलीं कामें माझ्या घरीं फोन आल्याबरोबर महत्वाचीं झालीं! त्या फोनमुळें आळींतल्या सर्व लोकांचे संबंध माझ्याशीं इतक्या घरोब्याचे झाले कीं आम्हीं जेवत असलों, झोपलों असलों तरी ते अगदीं प्रेमाच्या हक्कानें आम्हांला उठवीत असत आणि दार उघडा-यला लावीत असत. आळींतला कुठलाही माणूस, त्याला घरीं यायला उशीर होणार असेल तेव्हां, न चुकतां माझ्या घरीं फोन करून, "मी आज जेवायला येणार नाहीं असं आमच्या घरीं तेवढं कळवून द्या" 'मला दोन तास उशीर होईल एवढा निरोप आमच्या घरीं पोंचवून द्या', 'मी जरा बाहेर जातोय् असं आमच्या घरीं सांगा' असा निरोप देत असे. आणि हें सर्व केवळ माझ्यावरील प्रेमामुळें ते करीत असत. शेजारच्या वत्सलाकाकी तर भटजींना आणि सवाष्णींना आमंत्रण देण्याच्या पवित्र व धार्मिक सत्कर्मासाठींही टेलिफोन वापरीत असत. टेलिफोनमुळें झालेला एक मोठा तोटा टेलिफोन घरांत लागेपर्यंत माझ्या लक्षांतच आला नव्हता. फोन घरांत आल्यावर मला कळून चुकलें कीं आतां आपल्या स्वातंत्र्याला मर्यादा पडल्या. बायको बेधडक ऑफिसमध्यें फोन करून 'सुटलं कीं नाहीं ऑफिस अजून?', 'आज इकडं तिकडं भटकूं नका. तडक घरीं या', 'येतांना दोन आण्याचा लसूण आणायचा आहे हें विसराल म्हणून मुद्दाम फोन केला.' अशी वारंवार वेसण खेचूं लागली. फोनमार्फत माझा पाठलाग करणें तिला अगदीं सोपें झालें. आपण एक अस्वल आहोंत आणि आपल्या गळ्यांत एक भली मोठी दोरी असून ती धरून एक दरवेशी आपल्या घरांत बसला आहे असें मला राहून राहून वाटूं लागलें.

विसुभाऊ डोंगरे तर माझ्या घरीं फोन आल्यापासून आनंदानें बेहोष झाले होते. फोन आला त्याच्याच दुसरे दिवशीं विसुभाऊ आपल्या गोपाळ, गोविंद, गणपति, सिंधु, गंगा, चंद्रभागा आणि भागीरथी आणि या सगळ्यांची जननी याना घेऊन माझ्या घरीं आले.



## वावटळ

— वृंदा लिमये

ओढ तुझी येते  
वारा होउन पिसाट  
ओथंबून उभे  
वर आभाळ विराट  
झपाटल्या दिशा  
उरी त्यांच्या घालमेल  
थरथरा कापे  
मूक बावरली वेळ

धूळ निघनसे  
फिरे उंच गरगरा  
डुचमळणाऱ्या  
पाण्यावरनी भोवरा  
चढे चक्राकार  
अशी वावटळ धुंद  
जाणिवेचे पान  
त्यात भोवळून सुंद

" काय बापूराव ? " आपल्या उत्साही व मिशाळ आवाजांत त्यानी हांक मारली.

" या ना. "

" अहो, तुमच्याकडं फोन आला म्हणून कळलं. "

" हो...आलाय् ना—"

" फार छान झालं...फार छान झालं... अहो आतां त्या पलीकडल्या आळींतल्या शंकर गोगटयाची मिजास नको..."

" त्याची मिजास ? " मी—

" हो ना. त्याच्याकडं फोन आहे ना !— परवां जरा फोन करायला गेलों. तर मला म्हणाला कीं हा कांहीं पोस्टांतला सार्वजनिक टेलिफोन नाहीं. ही काय माणुसकी झाली ? अहो, आजकाल कोण कुणाकडं जातो उगाच ! पण फोनच्या निमित्तानं आमच्यासारखी सोन्यासारखी माणसं त्याच्या घरीं जातात—पण त्याला कांहीं किंमत ? बैस म्हणावं आतां फोनला घट्ट मिठी मारून. म्हणून तुमच्याकडं फोन आला हें फार चांगलं झालं. "

" पण आज सहकुटुंब येणं केलत ? "

" तेच तर सांगतो ना. आमच्या मुलांना फोन नीट पहायचा आहे. मुलांच्या आईनं तर कधींच फोन केला नाहीं. म्हटलं आतां बापूरावकडं फोन आलाय्. चला सगळेजण. मीही म्हटलं, बापूराव म्हणजे परके का आहेत कुणी ? बापूराव आपले, आणि फोनही आपलाच. होऊन जाऊं द्या एकदा पोरांचं समाधान. म्हणून आलो झालं घेऊन सगळ्याना. "

" असं असं. "

" हं...मुलानो, या इकडं असे. हा पाहिलात फोन ? याला म्हणतात रिसीव्हर. इकडून बोलायचं आणि इकडून ऐकायचं. हे इथं जे आकडे लिहिलेत ना, त्याला म्हणायचं डायल. ही फिरते. " विसुभाऊ कारकुनाच्या अंगांत मास्तर संचारला होता.

" आम्हाला फिरवून दाखवा—फिरवून दाखवा." सर्वजण एका आवाजांत ओरडलीं.

" हो...हो...जरा थांबा. हं असे सर्वजण अर्धवर्तुळ करून उभे रहा या फोन भोवती. " पोरं अर्धवर्तुळांत उभी राहिली.

" हं आतां नीट लक्ष द्या...आतां समजा मी कचेरीत गेलों आहे. कुठं गेलो आहे ? "

" कचेरींत. " सर्वजण.

" मी कचेरींत गेलों आहे. आणि समजा तुमच्या आईचा साडीचा पदर स्टोव्हवर पडून पेटला. तर काय कराल तुम्ही ? "

" विझवण्याचा प्रयत्न करू" एक कार्टें...

" निम्मे उत्तर बरोबर. विझवण्याचा प्रयत्न करायचाच; पण लगेच इथं यायचं आणि २३४१ हा नंबर फिरवायचा. हा कुणाचा नंबर आहे ? "

" कुणाचा ? " पोरे ..

" हा आपल्या डॉक्टर ठेकेदारांचा नंबर. हा नंबर असा फिरवायचा." विसुभाऊ पूर्णपणें रंगले होते. त्यानी नंबर फिरवून दाखवला.

" लागला नंबर. बघा हं आतां...हॅलो... हॅलो...कोण ? डॉक्टर ठेकेदार का ? "

" होय. "

" आमच्या आईची साडी स्टोव्हवर पेटली आहे आणि ती भाजली आहे. "

" कोण ? साडी कां आई ? "

" आई हो—तर तुम्ही तावड-तोब आमच्याकडे या. "

" आपण कोण ? "

" मी विसुभाऊ डोंगऱ्यांचा मुलगा आहे. "

" हॅलो...हॅलो...अरे नांव काय तुझं ?... आणि विसुभाऊ कुठं गेलेत ?..." डॉक्टरांचा निर्वाणीच आवाज ऐकताच विसुभाऊंची मास्तरकीची धुंदी उतरली.

" आं ?...अरे...माफ करा हं डॉक्टर... मी विसुभाऊच बोलतो आहे...त्याचं असं झालं कीं... आमच्या बापूरावकडं फोन आलाय्. मुलाना फोन कसा करायचा तें समजावून देत होतो. उदाहरण म्हणून सांगत होतो कीं तुमची आई भाजली तर मुलानी डॉक्टराला म्हणजे तुम्हाला कसा फोन करावा...माफ करा हं...तसं खरं कांहीं झालेलं नाहीं...शिकवण्याच्या नादांत तुम्हाला फोन केला..." विसुभाऊनी शरमून फोन ठेवला. पण मुलाना आपली फजिती कळू नये म्हणून पुन्हा मास्तराचा भाव चेहेऱ्यावर आणून ते म्हणाले, " पाहिलंत...हा असा फोन करायचा. मला कचेरींत कांहीं निरोप कळवायचा असेल तर ३४५६ हा नंबर फिर-वायचा. माझा नंबर कोणता ? "

एक पोर अनवधानानें ओरडले, "शेवटचा."

" गाढवा...आतां सांगितलं ना...३४५६ हं म्हणा बघूं " विसुभाऊ.

" तीन चार पांच सहा." सर्वजण.

" पुन्हां म्हणा. "

" तीन चार पांच सहा." पवेचा म्हटल्या-सारखी पोरं ओरडूं लागली.

" हं...पुरे...तर हा नंबर तुम्हीं फिरवा-यचा आणि विचारायचं डोंगरेसाहेब आहेत कां...कळलं ? ".

मग विसुभाऊनी सर्व पोरांकडून फोनची तालीम करवून घेतली. ओंपल्या बायकोला सुद्धां रेल्वे स्टेशनचा नंबर लावून देऊन मेल किती वाजतां येते असं विचारायला लावले आणि तिलाही फोनचें तंत्र समजावून दिले. सुमारें तास दीडतासानें विसुभाऊ आपल्या पोरांच्या ज्ञानांत आणि माझ्या टेलिफोनच्या बिलांत भर टाकून कुटुंबकबिल्यासह निघून गेले.

छकापन्हुति : ३

पाहिलात कां हा इसम—
कसा संथ, कसा तुंद, चवळतो माझे पानी
जणुं शेटजी वडगादीवरचा
बसला माशा मारीत,
चिवडत पानें खातेवहीची.

तसं पाहिलं तर पोस्टखात्यांत फोन माझ्या नांवावर होता; पण अवघ्या आठ पंधरा दिवसांतच तो गणपतीपेक्षांही अधिक सार्वजनिक झाला. आमच्याकडे फोन आल्या-बद्दल समस्त आळीकरांना आनंद कां झाला याचें कारण स्वच्छ कळलें. माणूस हा संकोची स्वभावाचा असतो तो खाण्याच्या बाबतींत फोनच्या बाबतींत त्याला संकोच करण्याचें कांहींही कारण नसतें हें एक सत्यही मला कळून चुकलें. माझ्या ज्ञानांत भर पडली.

कांहीं दिवस निदान रात्र तरी सुखाची होती. पण आमच्या घरापलीकडे ८–१० घरें सोडून असलेल्या नलूताईंचे इंजीनिअर यजमान पुण्याला गेले. त्यांना तिकडेच कांहीं कंत्राट मिळाल्यामुळें दोन महिने त्याना तिकडेच रहावें लागणार होते. नलूताईंनीं लगेच यजमानाना आमच्या घरीं फोन आल्याचें कळवून टाकलें. आणि, एका मध्य रात्रीं टेलिफोनची घंटा खणाणली. नलूताईंच्या यजमानांचा ट्रंक कॉल ! नलूताईंशी त्याना बोलायचें होतं. शेजारधर्म म्हणून पाळायलाच हवा होता. दिवस असता तर शेजारच्या कारकुनांस निरोप पाठवून तो नलूताईंपर्यंत पोचता करता आला असता. पण मध्यरात्रीं तें शक्य नव्हते. मग धडपडत त्यांच्या घरीं गेलों. हळूच दारावर थाप मारली. कोण आहे म्हटल्या-वर मी बापूराव म्हणून सांगितले. तरी बाई दार उघडेना. नक्कीच तिच्या मनांत संशय आला होता. आपले यजमान घरीं नसतांना हा शेजारी बेधडक मध्यरात्रीं दारावर थाप मारतो याला कांहींतरी वेगळा अर्थ असला पाहिजे. संबंध घरांतले दिवे लागले. मागल्या दारानें बाईंनीं शेजाऱ्यालाही जागे केले. आणि मग पुढचें दार उघडलें. चेहे-ऱ्यावर तुच्छता. ही पीडा आपल्या दारांत कां असा भाव ! कपाळावर न मावतील इतक्या आठ्या. त्या बाईच्या यजमानांचा फोन आला असूनही तसं सांगायला धीर होईना इतका त्या बाईचा चेहेरा आंबट दिसत होता ! झक मारली आणि इथं आलों असं कुणालाही तीव्रतेनं वाटावं असा तो चेहेरा होता. मी मोठ्या नम्रतेनं बाईंना यजमानांचा फोन आल्याचं सांगितलं. तरी डोळ्यांत संशयाचे थेंब दिसतच होते. फोनची बतावणी करून रात्रीं आपल्या घरीं येण्याचा ह्या माणसाचा हा डाव असावा असा सूक्ष्म संशय डोळ्यांत दिसत होता. शेवटीं जणूं काय माझ्यावर मोठी मेहेरबानी करीत असल्याचा आव आणून त्या बाई माझ्या-बरोबर आल्या. पुन्हा फोन लावून यजमानांचा कान ( फोनला लावलेला ) बाईंच्या हाताला लागेपर्यंत तास दीड तास गेला. तोंपर्यंत झोप धरून बसलों होतो. शेवटीं एकदाचा फोन आला. बोलणं झालं. पुन्हा अपरात्र म्हणून बाईंना पोंचवायला जाणे भागच होते.

हा प्रकार सरोस चालू झाला. आठवड्या-तून दोन दिवस नलूताईंच्या यजमानांचा ट्रंककॉल येऊं लागला. रात्रीं निम्म्या पैशांत ट्रंक कॉल होत असल्यामुळें त्या इंजिनिअरला



अनुक्रमणिका

तें सोयीचें होते. नलूताईना थोडें जाग्रण होत होतें; पण नवऱ्यासाठीं जाग्रण करायचें नाहीं तर कोणासाठीं ? पण ह्या नवराबायकोच्या प्रेमळ फोनाफोनींत माझा चक्काचूर झाला होता. माझी झोप मोडत होती. मला त्रास होत होता. पण त्यांत कांहीं विशेष आहे असें नलूताईना तर वाटलेंच नाहीं आणि त्यांच्या यजमानानाही वाटलें नाहीं. मी घरांत फोन घेतला तेव्हां हें माझें कर्तव्यच आहे अशी त्या जोडप्याची खात्री झाली होती. शेवटीं दोन चार टवाळ शेजाऱ्यानीं जेव्हां थोड्या कुत्सितपणानें माझ्या रात्रीं अपरात्रीं त्या इंजिनिअरच्या घरीं जाण्याच्या गोष्टीचा उल्लेख केला तेव्हां माझें धावे दणाणलें ! मग मी हा प्रकार बंद करण्याचा निर्धार केला आणि बाईना व बाईच्या यजमानाना तसें स्पष्ट सांगितलें. अर्थात् त्यांचें जन्माचें शत्रुत्व माझ्या माथीं आलें.

पलीकडल्या आळींतल्या आनंदराव पांढऱ्याचा एक भाचा असाच आठवड्यांतून तीन चार वेळा माझ्या फोनवर येऊन बसायचा. पहिल्यांदा आला तेव्हां त्यानें मोठ्या गंभीरपणानें मला विचारलें, " जरा हॉस्पिटलमध्यें फोन करायचाय. करू कां ? " हॉस्पिटलचें नांव काढल्यावर विरघळणार नाहीं असा फोनवाला या जगाच्या पाठीवर सांपडणेंच अशक्य. कुणावर कसा प्रसंग येतो--आपण बाकी नाहीं तरी निदान फोन देऊन मदत करावी. तेवढीच आजाऱ्याची सेवा केल्याचं पुण्य मिळेल ! त्याच्या चेहऱ्यावर काळजी स्पष्ट दिसत होती. एकादी सीरियस केस हॉस्पिटलमध्यें असणार हें उघड होते. मी त्याला उदारपणें सांगितले, तुम्हांला हॉस्पिटलमध्यें फोन करायचा असेल तेव्हां बेधडक करीत जा. परवानगी विचारूं नका. त्याच्या डोळ्यांत कृतज्ञता तुडुंब भरली होती ! त्यानें आठवड्यांतून ३।४ वेळा फोन करायचा सपाटा चालवला. मधूनमधून कांहीं वाक्यें माझ्या कानावर येत असत,

" पेशंटची स्थिति फार गंभीर आहे. "

" मग ॲडमिट केव्हां करणार ? "

" निदान तुम्ही व्हिजिटला या. "

" मला नाहीं वाटत असली वरवरची औषधं उपयोगी पडतील असं. "

" आतां तुम्ही पेशंटला ॲडमिट केलं नाहीं तर कांहीं आशा दिसत नाहीं. " यांत गैर कांहींच नव्हते. पण दोन महिने झाले तरी याच्या पेशंटला हॉस्पिटलमध्यें कुणी ॲडमिटच करीना. म्हणून मी चौकशी केली. तेव्हां मला त्याचं हें हॉस्पिटल प्रकरण समजलें. त्या पांढऱ्यांचा हा काळा भाचा हॉस्पिटलमधील एका नर्सशीं सूत जमवीत होता. आणि हॉस्पिटलच्या भाषेंत प्रेम बोलत होता ! त्याच्या सर्व वाक्यांचा अर्थ नंतर माझ्या लक्षांत आला ! मला हें कळल्याचें त्याला जेव्हां समजलें तेव्हांपासून त्यानें माझें घर टाकलें.

तशाच त्या बेबीच्या आई. नेहमीं तरातरा यायच्या. बघणाऱ्याला वाटावं कीं ह्या बाईच्या घराला नक्कीच आग लागली असावी. तुरुतुरु यायच्या अन् भरकन् फोन करायच्या—

" मस्ताना टॉकीज का ? आज पिक्चर कुठलं आहे ? " मी कपाळाला हात लावीत असें.

" अहो बेबीच्या आई, वर्तमानपत्रांत जाहिराती असतात सगळ्या चित्रपटांच्या." मी.

" अहो वर्तमानपत्रांत पुष्कळ असतं आणि सिनेमाच्या थेट्रावर कां कमी जाहिराती असतात ? पण सकाळच्या प्रहरीं वर्तमानपत्र घेऊन बसायला वेळ कुणाला आहे इथं ? फोन केला कीं काम होतं. "

मी निरुत्तर होऊन बसत असें. हा प्रकार नेहमींचा होऊन बसला. शेवटीं मी त्यांना एकदां फोन केल्याचे पैसे मागितले. आणि त्या यायच्या बंद झाल्या. पण, " त्या बापूरावची दानत खलास झाली आहे. साधा फोन केला तर लोकांच्यासारखा फोनच्या पैशासाठीं हात पसरतो ! दोन आण्याचा प्रश्न नाहीं. दोन रुपयेसुद्धां देईन त्याला.पण कांहीं माणुसकी आहे कीं नाहीं ! चांगलं दोनदा मेल्याचं मेहुण जेवायला घातलं तरी पैसे मागायला लाज वाटत नाहीं त्याला. तसं म्हटलं तर दोन्ही वेळा चांगली चार चार आणे दोघांनाही दक्षिणा दिलीय् म्हणावं. घ्या त्यांतनंच कापून फोनचे पैसे. " असें घरोघरीं सांगूं लागल्या.

आणि तो सापळे ! कुठला कोण गोमटे. त्याचा एकदा फोन आला, " तुमच्या शेजारच्या सापळ्याना तेवढा निरोप सांगा कीं आज कांहीं मी भेटूं शकणार नाहीं. " याच्या आजच्या भेटण्या न भेटण्यावर सापळ्याचं नफानुकसान अवलंबून असेल तर आपण कां आळस करावा, असें म्हणत मी त्या सापळ्याच्या घरीं जाऊन त्याला निरोप कळवला. तरी बेटा मलाच गोमटे समजून माझ्याच अंगावर आला.

" भेटणार नाहीं म्हणजे काय ? तो नाहीं तर त्याचा बाप भेटेल ! मी कांहीं एक ऐकणार नाहीं म्हणावं...आतां कोर्टांत खेचीन मी... "










मी स्तंभित होऊन त्याच्याकडे पहात राहिलों. मी याला निरोप सांगायला आलों. माझीं कामंधामं सोडून याच्या घरीं आलों. त्याबद्दल आभाराचा शब्द तर नाहींच! उलट हा लेकाचा मला हुकूम सोडतोय्; हा काय मला आपला दिवाणजी समजतो ? कां हा माझा बाप आहे हुकूम द्यायला ? तरी मी थंडपणाने त्याला म्हणालों, " हे बघा श्रीयुत सापळे. तो तुमचा गोमटे माझा सासरा नाहीं किंवा जावईही नाहीं, आणि तुम्हीही माझे सासरे नाहींत. त्याला तुम्ही कोर्टात खेचा नाहीतर मसणांत खेचा; नाहींतर दोघेही जा. मला कांहींही कर्तव्य नाही. मी गाढव-पणां करून फोन घेतला आणि महामूर्खपणा करून तुम्हाला निरोप सांगायला आलो. माझा मूर्खपणा झाला. क्षमा करा. " असं म्हणून मी ताडकन् निघून आलों.

कुणाला आणि कसं अडवायचं हेंच कळेना. आळीतल्या बहुतेक सर्वांनीं आपला फोन नंबर म्हणून बिनदिक्कत माझा फोन नंबर लोकांना दिला होता ! दर महिन्याला फोनचे बिल आलं कीं माझ्या डोळ्यांतलीं बुब्बुळे दिसेनाशीं होत असत !

फोनच्या पायीं आत्महत्त्या करावीशी जरी वाटली नाहीं तरी फोनवर मला मोठा धोंडा घालण्याचा विचार मात्र बऱ्याच वेळा प्रबळ होत असे. एकदा एक फोन आला. त्यानें चुकीच्या नंबरावर केला होता. चार वेळा त्याला मी तसें सांगितलें. तरी पुन्हा त्याचाच फोन.

" कोण पाहिजे ? "

" शंभू कागदे. "

" शंभू कागदे नाहीं कुणी इथं. "

" मला माहीत आहे. तिथंच आहे तो. "

" अहो नाहीं. ह्या सबंध आळींत शंभू कागदे या नांवाचा इसम नाहीं. "

" नाहीं कसा ? असलाच पाहिजे. त्यानेच मला सांगितलें. "

" अहो, मी खरं सांगतोय तुम्हाला, शंभू कागदे जवळपास कोणीही नाहीं. "

" तुम्ही मला सांगूं नका. तो तिथेच आहे"

" तो तुमच्यो नात्यांतला आहे काय ? "

" नाहीं. ओळखीचा आहे. "

" असेल. पण तो इथं नाहीं. "

" तुम्हाला माहीत नाहीं. तो आहे. "

त्याच्या हट्टवादीपणाची मला चीड आली. याला चांगला धडा शिकवावा असा मीं मनांत विचार केला.

" मग थांबा. मी चौकशी करतों. "

" धन्यवाद. असं कांहींतरी करा ना—"

मी थोडावेळ स्वस्थ बसलों आणि मग पुन्हां फोन उचलला.

" कोण शंभू कागदे ना ? "

" हो हो...तोच तोच. "

" तो मेला. "

" काय म्हणतां ? " त्याच्या आवाजांतला अचंबा मला जाणवत होता.

" होय मेला. थोड्या वेळापूर्वींच मेला !"

" खरंच मेला ? "

" हो अगदीं खरा मेला ! "

" अरेरे ! फार वाईट झालं. "

" अर्थातच. वाईट तर झालंच. "



अनुक्रमणिका

" तसं नाहीं...माझ्या दृष्टीनं तर फारच वाईट झालं हो. "

" पण तो तुमच्या नात्यांतला नव्हता ! "

" नव्हता. पण फारच वाईट झालं. "

" कां ? "

" दोन रुपये उसने नेले होते माझ्या-कडून. ते कांहीं आतां परत यायचे नाहींत !"

असा मी जिकीरीला आलों होतों ! नाहीं म्हणायला नरहरी तात्या तवडे होते आधाराला. फोनचा त्यांना अतिशय संताप येत असे. आयुष्यांत आपण एकदाही फोन ऐकला नाहीं किंवा फोनवर कधीं बोललों नाहीं असें अभिमानानें सांगायचे. मी फोन घेतला त्याच दिवशीं ते म्हणाले होते, " मला वाटलं होतं कीं तूं तरी थोडा शहाणा असशील. हें उपद्रवी यंत्र घरांत आणलेस हें कांहीं बरें नाहीं झालें. काय करायचाय् फोन अन् बीन ? माझा तर ह्या असल्या यंत्रावर विश्वासच नाहीं. खरा फोन एकच. वरचा. तोच खरा ट्रंक कॉल ! एकदा वरचा ट्रंक कॉल आला कीं निघाला प्रत्येकजण. तेवढा एकच फोन आपण ऐकणार आहोंत. काय ?"

माझ्या घरांत ज्या दिवशीं फोन लागला त्यानंतर आनंदाचा एक दिवस उगवल्यासारखा वाटला तो फोन बिघडला त्या दिवशीं. मी आनंदानं उडी मारली. उगाच उंदरासारखा घरांत धावलो. दाराची चौकट डोक्याला लागून टेंगूळ आलं. पण फोन बिघडल्याच्या आनंदांत अणुमात्र विघाड झाला नाहीं ! त्या दिवशीं सकाळीं मोजून पंधरा माणसांना मी हर्षनिर्भर होऊन फोन बिघडल्याचें सांगून परत पाठवले. पण आमच्या जगांत असत्य डोळे झाकून मान्य केलें जातें. सत्य मान्य होत नाहीं. फोन बिघडू शकतो यावर अनेकांचा विश्वास नव्हता. आणि उरलेल्यांचा मी सांगत होतो त्यावर नव्हता. प्रत्येकाच्या चेहेऱ्यावर माझ्या प्रामाणिकपणाबद्दल शंका ! दोघा चौघानी फोनशी लगट करून खात्री करून घेतली. इतर दोघा चौघानी, ' अहो फोन बिघडला तर टेलिफोन कचेरीला कळवायचं सोडून तुम्ही नुसतेच सांगताय् काय ? ' असा सात्विक हितोपदेशही केला. पण मी माझा फोन बिघडल्याचा आनंद हातचा घालवायला तयार नव्हतो. पण चांगल्या गोष्टी फार काळ टिकत नाहींत हेंच खरें. कुणीतरी दयावंतानें परस्पर टेलिफोन कचेरीला कळवून टाकलं आणि लोकमताच्या दडपणानें टेलिफोन दुरुस्त झाला !

एकाद्या फोडासारखा टेलिफोन दुःखदायक असला तरी त्या फोडाभोंवती हळुवारपणें फिरणारें एक विनोदाचं बोट आहे. कित्येकदा टेलिफोन हें विनोदाचेंच एक साधन आहे कीं काय अशीही शंका येते. टेलीफोनचा शोध लावणारा माणूस निश्चितपणें विनोदप्रिय असला पाहिजे !

चुकीचे नंबर लागणें हें तर मानवी जीवनाचें समर्पक असें प्रतीकच आहे ! अनेक लोकांना आपण फिरविलेला नंबर बरोबर आहे की चुकीचा आहे याची खातरजमा करून न घेताच फोनवर एकदम बोलायची सवय असते. या माणसानीं तर फार मोठे विनोद केले आहेत. फोनवर बोलणारा पुरुष हा आपलाच नवरा आहे असें निःशंकपणें गृहीत धरून दोनचार आर्य स्त्रियांनीं माझी कानउघाडणी केली आहे ! कुठल्या तरी दोन पोरानीं त्यांचें पितृत्व माझ्यावर लादून मला पुस्तकें आणण्याचे आदेश दिले आहेत ! कोण्या एका श्रीधर-पंतानें ' माझ्या मुलीला मागणी घालायची तुमची लायकी आहे काय ? ' असा दमदार सवाल टाकला आहे. एका कृष्णरावानें तर माझ्याकडे कांद्यापोह्यांची आर्डर नोंदवून मला सुदामा बनविलें आहे. वेड्यांच्या इस्पितळाशी बोलूं इच्छिणाऱ्या शहाण्या माणसांनीं मला वेड्यासारखे प्रश्न विचारले आहेत. एका शेटजीनें गॅसचा फार त्रास होतो अशी माझ्याकडे तक्रार केली तेव्हां मी त्याला गॅस कंपनीचा नंबर दिला; पण त्याला दवाखाना हवा असणार असे माझ्या मागाहून लक्षांत आले.

फोन करण्यासाठी रिसीव्हर उचलून कानाला लावावा तों कोणातरी राजा–राणीचे लफडे फोनमधून प्रवास करीत असल्याचं ऐकूं येते. तो तिला विनवीत असतो. भेटायला ये म्हणून सांगत असतो. ती केविलवाण्या आवाजांत त्याला ' नाहीं रे जमायचं राजा ' म्हणून सांगत असते. कंटाळवाण्या चित्रपटासारख हें प्रकरण लौकर संपतच नाहीं. मग आपल्याला वाटतं कीं मधेंच एकदम ओरडून त्या मानिनीला सांगावं कीं, " बाई ग, तूं त्याला भेटायचं कबूल कर. हो म्हण. म्हणजे फोनची लाइन तरी मोकळी होईल. ' कधीं कधीं असें होतें कीं कुठलाही नंबर फिरवला तरी फोनवर रामू हलवाईच येतो ! हा भुतासारखा प्रत्येक फोनमध्यें जाऊन बसतो कीं काय असें वाटूं लागते.

पण आतां हें सर्व संपलें आहे. मी बिल वेळेवर न दिल्यामुळें माझा टेलिफोन शेवटीं काढून नेण्यांत आला. या बाबतींत आळीतील समस्त लोकांचें मत असे—

" बिल द्यायची ताकद नाहीं अन् टेलिफोनचा रुबाब करतोय लेकाचा ! " माझेंही तसेंच मत आहे. लोकमत माझ्या बाजूला आहे हें उघड आहे.

हें उघड असलें तरी एक गुपित आहे आणि तें अजूनपर्यंत कोणालाही माहीत नाहीं. या फोनच्या ससेमिरा चुकविण्यासाठीं मी प्रार्थना करीत असे. ही प्रार्थना माझा मित्र मनू माने याच्याकडून मी मुद्दाम रचवून घेतली होती. त्या प्रार्थनेलाच फळ आलें हें लोकांना माहीत नाहीं. दुसऱ्या एकाद्या फोनवाल्याला याचा उपयोग होईल. गुण हमखास येतो. मात्र प्रार्थना एकाग्र चित्तानें म्हणावी लागते.

नको नको आता फोन । नाहीं त्यांत समाधान<br>
पुकारते बंड मन । आणि चिडलेला कान ॥<br>
फुटो आतां रिसिव्हर । तुटो तुटो ही वायर<br>
दया करा माझ्यावर । घाव घालावा सत्वर ॥<br>
देवा तुला माझी आण । समजावा ट्रंक फोन<br>
पुन्हा व्हावे हो वामन । फोन शीर्षी द्या चरण ॥

• • •



अनुक्रमणिका

# ऊन्ह सावली कोरडी

रो ज नेमकं याचवेळीं ऊन त्या समोरच्या कठड्यावर येऊन बसतं. त्याच्या हातांत कधीं पिवळ्या रंगाचं आईसफ्रूट असतं, कधीं हिरव्या रंगाचं, कधीं तांबड्या रंगाचं. मी इथं स्टुलावर एकटाच बसलेला असतों अन् उन्हाची गंमत पहात रहातों. आईसफ्रूट संपलं कीं तें आईस-फ्रूटची काडीच चोखीत बसतं. भर दुपारच्या या उन्हांत तासन्तास बसूनहि त्याला कांहींच कसं होत नाहीं कोण जाणे. मग त्याचं माझ्याकडे लक्ष जातं. उजव्या डोळ्याची भुंवई वर उडवीत तें मला विचारतं, ‘ काय दामूअण्णा ? काय वेड काय म्हणतं आहे तुमचं ? ’ हा प्रश्न त्यानं मला विचारला कीं माझ्या तळपायाची आग मस्तकाला जाते. घरांतलीं माणसं एक म्हणतात, तीं म्हणतात म्हणून या रस्त्यावरच्या उन्हानंहि मला वेड लागलं आहे असं म्हणावं कीं काय ? मी जवळच्याच कोळशाच्या पिंपांतला एक मोठासा कोळसा काढतों नि त्याच्या अंगावर मारतों. तेवढ्यांत आई बाहेर येते नि विचारते, “ काय रे चाललं आहे दामू ? ” मी म्हणतों, “ कोळसा मारतों आहें मी त्या उन्हाला ! ” आई ‘ बरं-बरं ’ म्हणते नि मुकाट्यानं आंत जाते. मी एक कोळसा मारतों. दोन मारतों. तीन मारतों. तें ऊन मात्र खदखदां हंसत असतं नि आपल्या चड्डीच्या खिशांतून लिमलेटच्या गोळीसारखा पिवळा धम्मक सरडा काढून त्याचे मुके घेत घेत तें म्हणतं, “ वेडा रे वेडा ! मला कोळसे मारून ते लागणार आहेत थोडेच ! मला का शरीर आहे, का हाडं आहेत, का चामडं आहे ? ” म्हणजे या उन्हाचंच डोकं फिरलेलं दिसतं आहे ! चक्क चड्डी घालून

*—अन् मग तीं मोठीं राणीं गळा काढून रडूं लागते. तीं मला फसवायला आलेलीं असते. माझ्यापासून म्हणे तिला मूल हवं आहे !—हं...*







ना कठड्यावर येऊन बसला आहे, माझ्याशीं बोलतं आहे, त्या सरड्याचे मुके घेतं आहे, (तो सरडा त्याची बायको आहे कीं काय ?) आईस्क्रूट खातं आहे, नि म्हणे मला का शरीर आहे ? हँ...शरीराशिवाय का चड्डी नेसतां येते ? शरीराशिवाय का आपल्या बायकोचे मुके घेतां येतात ? आईला सांगायला गेलं कीं ती मलाच टांगायला येते. मी तिला विचारतों, " आई, तूं गेली होतीस का ग उन्हाच्या लग्नाला ? " ती ऐकल्या न ऐकल्यासारखं करते नि म्हणते, " बाहेर त्या स्टुलावर जाऊन बस पाहूं मुकाट्यानं. असं एकसारखं बडबडत राहूं नये माणसानं." मला माहीत आहे ती असं कां म्हणते तें ! तिची अशी समजूत झाली आहे कीं, मला वेड लागत चाललं आहे. त्या उन्हानंच तिचे कान भरवून दिले असले पाहिजेत. नाहींतर आमची आई असं वेड्यासारखं बोलायची नाहीं. तेवढ्यांत एक झुरळ तिथून जात असतं. त्या उन्हाच्या हातांतला सरडा उन्हाच्या मुक्यांनीं ओले झालेले आपले ओंठ पुशीत त्याला विचारतो, " काड्याची पेटी आहे का ? " झुरळं क्षणभर थांबतं नि खिशांतून काड्याची पेटी काढून त्या सरड्याला देतं. सरडा आपल्या मनीबॅगेतून एक पनामा सिगारेट काढतो ( म्हणजे उन्हाची ही बायको सिगारेटहि ओढते तर ! आहे बुवा...आपणसुद्धां सिगारेट ओढणारीण बायको करणार. जरा मजा असते. ) नि झुरळानं दिलेल्या काड्याच्या पेटींतली एक काडी काढून ऐटींत सिगारेट पेटवतो.

## स दा नं द रे गे

अन् मग येतात तिसऱ्या मजल्यावर नळाजवळच्या खोलींत रहाणारे वायंगणकर मास्तर. ते येतात तेव्हां मी नेहमींसारखा आपला स्टुलावरच बसलेला असतों. जिना चढतां चढतां ते मला विचारतात, " काय दामोदरपंत ? काय चाललं आहे ? " वायंगणकर मास्तर मला फार आवडतात. ते कधींहि दामोदरपंत या नांवाखेरीज दुसऱ्या नांवानं मला हांक मारीत नाहींत. मी त्यांना जवळ बोलावतों अन् म्हणतों, " कान इकडे करा. " ते खालीं वांकतात अन् एक कान माझ्या अगदीं तोंडाजवळ आणून हळूच विचारतात, " काय ? " मी म्हणतों, " तें पहा. " ते पुन्हां विचारतात, " कुठं काय ? " मी म्हणतों, " तें ऊन पहा. " ते म्हणतात, " वा, फार छान आहे. फारच छान. असं ऊन पाहिलं नव्हतं आपण आजपर्यंत !"

" तें कीं नाहीं मघाशीं आईसफ्रूट खात होतं. "

" असं का ? अरे वा...ऊन आईसफ्रूट खात होतं म्हणतां ? "

" हो...हो...ऊन आईसफ्रूट खात होतं. कां ? त्यानं आईसफ्रूट खाऊं नये म्हणतां ? "

" तसं नव्हे हो, दामोदरपंत. उन्हानं आईसफ्रूट जरूर खावं. अहो, उन्हानं खाऊं नये तर काय बर्फानं खावं ? "

" मग ? "

" आपलं सहज विचारलं झालं. आम्हीं कधीं उन्हानं आईसफ्रूट खातांना पाहिलं नव्हतं आजवर. म्हणून आपलं..."

" अन् तो त्याच्या हातांतला सरडा पाहिलात का ? "

" कुणाच्या ? त्या उन्हाच्या हातांतला होय ? वा...वा...फारच सुंदर...असा सरडा कुठंकुठंसुद्धां पाह्यला मिळायचा नाहीं. "

" तो सिगारेट ओढतो आहे..."

" हं...छान. पण त्याला म्हणावं, फार ओढूं नकोस. नाहींतर बसशील खोकत. "

" अन् बरं का..." बोलतां बोलतां मी त्यांना आणखी खालीं वाकायला सांगतों.

" काय ? "

" तो सरड्या त्या उन्हाशीं लग्न करणार आहे. "

" अरे, काय, म्हणतां काय दामोदरपंत ? सरडा त्या उन्हाशीं लग्न करणार आहे ? "

" हो...कुणाजवळ बोलूं नका ! अगदीं गुप्त ठेवा. "

" छॅ...छॅ...असं कसं मी भलत्याजवळ बोलेन. पण काय हो, दामोदरपंत ? तुम्हांला कशी कळली ही बातमी ? "

" तें तुम्हांला काय करायचं आहे ? वाटेल तशी कळली..."

" तसं नव्हे हो...असे रागावतां काय एकदम ! "

" तुमचा विश्वास बसत नाहीं या बातमीवर ? मी खोटं बोलतों असं वाटतं तुम्हांला ? मला वेड लागलं आहे. असं तुम्हांलाहि वाटतं ना ! "

" खुळा रे खुळा..."

वायंगणकर मास्तर मला खुळा म्हणतात, पण वेडा म्हणत नाहींत. मी उन्हाशीं बोलत बसतों हें त्यांना आवडतं. एकदां मी त्यांना म्हटलं होतं, " मास्तर तुमची शेंडी कशी खारीच्या शेपटीसारखी आहे नाहीं ? " तेव्हां ते स्वतःवरच खूप होऊन इतक्या मोठ्यानं हंसले होते ! माझ्या पाठीवर थाप मारीत ते म्हणाले होते, " दामोदरपंत, हें विपरीत असं मध्येंच घडलं नसतं तर तुम्हीं खात्रीनं एक चांगल्या-पैकीं कवि झालां असतां. " हें विपरीत...हें विपरीत...म्हणजे काय ?—

मग मास्तर जायला निघतात. निघतांना प्रेमभरानं ते माझ्या पाठीवरून हात फिरवितात. त्यांच्या डोळ्यांतून ओला मासा माझ्या-कडे पहात असतो. मी त्याला म्हणतों, " हॅलो ! " पण मास्तरांच्या डोळ्यांतला तो ओला मासा कांहींच बोलत नाहीं. मी पुन्हां त्याला ' हॅलो ' करतां तेव्हां माझ्याकडे वळून तो म्हणतो, " मला बोलतां येत नाहीं रे. माझे सगळे शब्द त्या समुद्राच्या राजानं काढून घेतले आहेत. माझी वाचा गेली आहे, अन् म्हणून तर मी इथं हा असा एका माणसाच्या डोळ्यांतून तुझ्याकडे हताशपणें पहातों आहे..."

मी त्याला विचारतों, " तुला बोलतां येत नाहीं, मग हें कसं तूं बोललास ? " ( कसा अचूक प्रश्न केला होता ! )

अन् मग तो कांहीं केल्या बोलतच नाहीं. मला वाटतं, माझ्याशीं तो बोलला तेवढंच बोलण्यापुरते शब्द त्याच्यापाशीं शिल्लक होते.

मास्तर म्हणतात, " दामोदरपंत, बसा. मी जातों. अजून जेवण व्हायचं आहे माझं. अन् तुमच्या त्या उन्हाला आम्हांला लग्नाचं आमंत्रण द्यायला विसरूं नको म्हणून सांगा बरं का ! "

ते जिन्याच्या एकदोन पायऱ्या चढतात अन् माझ्या डोक्यांत









एक कबुतरांचा कळपच्या कळप येऊन दाणे टिपूं लागतो. तो नाक्यावरचा वाणी माझ्याच डोक्यांतू या कबुतरांना दाणे कशाला घालतो कुणास ठाऊक !

एक कबुतर दुसऱ्या कबुतराला विचारतं, " उन्हाचं नि सरड्याचं लग्न आहे म्हणे लौकर. "

" अय्या...पण भाद्रपदांत कुठलीं आलीं आहेत लग्नं ? "

" अग, रजिस्टर असेल. आजकाल कशाला कांहीं मेळ उरला आहे का ? वाटलं कीं उटला नि रजिस्टराच्या हपिसांत जाऊन लग्न करून आला. "

पहिल्या कबुतराचं पिल्लूं हें सगळं ऐकत असतं. आज त्याच्या शाळेला सुटी आहे म्हणून तें घरींच आहे. तें आपल्या आईला विचारतं, " पण काय ग आई ? ऊन नपुंसकलिंगी अन् सरडा पुल्लिंगी ना...? मग त्यांचं लग्न कसं होईल ? "

त्याचा तो प्रश्न ऐकून पहिलं कबुतर बावरून जातं अन् दुसरं 'अय्याऽऽऽ' म्हणून वळचणींत पिसं फुलारून घुमणाऱ्या एका गलोल कबुतराच्या पुढ्यांत जाऊन बसतं.

कुणीच...कुणीच त्या पिलाला त्याच्या प्रश्नाचं उत्तर देत नाहीं.

मास्तर तुकतेंन्द जिना चढूं लागलेले असतात, त्यांना मी तो कबुतराच्या पिल्लाचा प्रश्न टाकतों.

मास्तर थोडा वेळ विचार करीत उभे रहातात नि म्हणतात, " त्याचं असं आहे, दामोदरपंत...ऊन हें नपुंसकलिंगी आहे अन् सरडा हा पुल्लिंगी आहे हें खरं. पण तें व्याकरणांत. प्रत्यक्षांत तसं अर्थातच नसावं... "

मला मास्तरांचं म्हणणं अर्थातच पटतं. त्या दिवसापासनं मी उन्हाला तो ऊन म्हणतों नि सरड्याला ती सरडा. मी असं म्हटलं कीं, आई तोंडाला पदर लावून हसूं लागते. मला तिचा फार राग येतो. तिचाच काय, घरांतल्या सगळ्या लोकांचा येतो., अगदीं भांड्यांचासुद्धां. तीं फळीवरचीं दादाचीं पुस्तकं मला जाळून टाकावींशीं वाटतात.

मग थोड्या वेळानं दूधवाला दूध घेऊन येतो. मी अजून तसाच स्टुलावर बसलेला असतों. हें स्टूल म्हणजे माझा घोडा आहे. जागेवरून न हाल्तांच तो नेहमीं चालत असतो. टप्...टप्...टप्...

दुधाचें भांडें वाजतांच माझ्या सदऱ्याच्या खिशांतून नऊ मांजरें बाहेर पडतात नि त्या दूधवाल्याचं सगळं दूध संपवून टाकतात. दूधवाला तसाच नळावर पळतो नि पाण्यानं भांडं भरून आणतो.

" कितना ? "

" अर्धा शेर. "

मग तो अर्धा शेर पाणी आईनं आणलेल्या भांड्यांत टाकतो. मला हें सगळं माहित असतं. पण मीच कांहीं बोलत नाहीं. मी आईला कांहीं सांगणार नाहीं. घेऊं दे तिला पाणी. कशी फजिती झाली एका माणसाची...हूँ...आतां कुणाला वेड लागलं आहे ? तुला कीं मला ?

तेवढ्यांत सामंतांची सुषमा गॅलरींत येते नि तिथंच थपकल घालून बसते. तिच्या हातांत बांगड्यांच्या रंगीत कांचा असतात. बांगड्यांच्या कांचा मला फार आवडतात. मी आईला नेहमीं म्हणत असतों, बांगड्यांच्या कांचाची भाजी कर म्हणून. पण ती माझं कांहीं ऐकतच नाहीं. मॅडकॅपच आहे ती.

सुषमेच्या तोंडांत आवळा असतो अन् माझी खात्री आहे, आणखीहि एकदोन आवळे तिनं आपल्या पोलक्यांत लपवून ठेवले असावेत. पांच वर्षांची चिमुरडी पोर आहे, पण भारी वात्रट आहे.

सदान्कदा पहावं तेव्हां ती आवळे नि चिंचा खात असते. मी तिला कितीदां जवळ बोलावतों. पण ती कांहीं येत नाहीं. मला तिचे केस फार आवडतात. मागें जिन्याखालीं एक परी मला भेटली होती तिच्या केंसासारखे तिचे केंस आहेत. सुषमेला एकदां मी फसवून पकडणार आहे अन् तिच्या केंसांत तोंड लपवून दोन वर्षं रडत रहाणार आहे. असा मी रडत राहिलों म्हणजे तो समुद्राचा राजा बुडून जाईल नि मास्तरांच्या डोळ्यांतील तो ओला मासा बोलूं लागेल. समुद्राच्या राजानं गिळलेले त्याचे शब्द त्याला परत मिळतील.

सुषमा ज्या अर्थी नेहमीं चिंचा-आवळे खाते त्या अर्थी ती गरोदर असावी. मला एकदां तिच्या पोटाला हात लावून पहायचा आहे. एक छान छान, भुऱ्या केसांचं बाळ तिच्या पोटांत बसलेलं असणार नि मला बघतांच ते म्हणेल, " मा...मा...मा...मा... " मी त्या बाळाला घेऊन उन्हाच्या लग्नाला जाईन. तिथं खूप आईस्क्रीम खायला मिळेल त्याला. सुषमेच्या मुलाचं नांव मी ठेवलं आहे दामू. दाम्या. दामोदरपंत. वेडा, खुळा. मॅडकॅप्...

आज अण्णा घरीं आले म्हणजे मी त्यांना विचारणार आहें. चक्

विचारणार आहे. उन्हाचं लग्न झालं. सुपमेला मुलगा झाला. आतां माझं लग्न केव्हां करणार ? कांहीं अक्कल आहे कीं नाहीं तुम्हाला ? का मी आपला जन्मभर बाहेरच्या स्टुलावरच बसून राहूं ? त्यांनीं ऐकलं नाहींच तर मी एक दिवस घरांतून पळून जाईन नि त्या समोरच्या झाडावर जाऊन बसेन. कांहीं केल्या खालींच येणार नाहीं.

एव्हांना ऊन सरड्याला घेऊन कठड्यावरून खालीं उतरलेलं असतं. मला माहीत आहे, आतां तीं दोघं हातांत हात घालून समुद्रावर जातील. एकमेकांची उष्टी भेळ खातील अन् अंधार झाला कीं स्मशानाच्या भींतीला टेकून बसून शृंगार करतील. उन्हाचं लग्न होईल त्या दिवशीं सरडा गरोदर असेल नि त्यांचा मधुचंद्र स्मशानांतील पिंपळावर बसून घुबडासारखा ओरडत असेल. मला आईस्क्रीम नाहीं मिळालं...मला आईस्क्रीम नाहीं मिळालं...

पण मी त्याला कांहींच देणार नाहीं. लग्नांतलं सगळं आईस्क्रीम मी सुलभेच्या मुलासाठीं राखून ठेवणार आहे. त्या शेगटाच्या झाडावर सगळं आईस्क्रीम राहील.

मी स्टुलावर निवांतपणें बसलों असलों म्हणजे माझ्या दुष्ट आईला तें पहावत नाहीं. ती आंतूनच ओरडते, 'दामू, चहा नाहीं का घ्यायचा ?''

यांचा आपला सदान्कदा चहा. कधीं अक्षतांच्या वड्या करतील किंवा लग्नांतील नारळांचा पाक करतील तर शपथ. यांचीं लग्नं व्हायचीं चहाच्या मळ्यांत. यांच्या लग्नाला भटजी असायचा चहा पिऊन पिऊन धुंद झालेला. यांच्या लग्नांत अक्षता पडायच्या चहाच्या पावडरीच्या !

पण करतां काय ? दामू वेडा पडला ना ? कांहीं बोलायला गेला तर त्यालाच टांगायला उठतात.

मी आपला मुकाट्यानं उठतों नि आंत चहा प्यायला निघून जातों.

कमळीनं आणलेलं एक गोष्टीचं पुस्तक खाटेवर पडलेलं असतं. तें मी उचलतों नि चहा पितां पितां वाचूं लागतों. तेवढ्यांत आंतून एक बाई बाहेर पडते नि मुसमुसु रडत माझ्या मांडीवर येऊन बसते. मीं तिला विचारतों, " कोण ग तूं ? "

ती म्हणते, " मी राजाची राणी. "

" असं का ? "

" हो. हा पहा माझा मुकुट. "

" आवडतो कीं नावडती. "

" आवडती. "

" मग माझ्या मांडीवर येऊन रडत कशाला बसलीस ? "

" रडूं नको तर करूं काय ? "

" हंस. नाहींतर चूप बैस. रडतेस कशाला ? "

" दामू, तूं अगदींच कसा रे हा ? "

" हा म्हणजे कसा ? "







" वेडा..."

" मी वेडा नाहीं."

" वेडा नाहींस तर खुळा आहेस."

" खुळाहि नाहीं."

" मग मॅडकॅप आहेस."

" पण तूं रडतेस कशाला तें तर सांगशील ?"

" राजा मला मूल होऊं देत नाहीं."

" कां ?"

" तो म्हणतो, आपण प्लॅनिंग करायला हवं. आपण एका लोकसत्ताधिष्ठित राज्याचे प्रतिनिधी आहोत. आपणांस मुलं होतां नयेत."

" तुझ्या राजाचं डोचकंच फिरलेलं दिसतंय. मुलं होतां नयेत हें ठीक आहे. पण एखादं मूल व्हायला काय हरकत आहे ?"

" तो म्हणतो, नावडत्या राणीला माझ्यापासून अकरा मुलं झालीं आहेत. आतां अधिक नको."

" मला तर दुसराच संशय येतो..."

" काय ?"

" नावडतीचीं तीं मुलं दुसऱ्या कुणाचीं तरी असलीं पाहिजेत."

" मग तूहि कां करीत नाहींस तसं ?"

डायोजेनिस ग्रीक पुरुषवर
पिंपामध्यें मांडी तो घर
तो मेल्यावर—राहिल कुणि तर
पिपांत मेले ओल्या उंदिर

*शां. शं. रेगे*

" तू आहेस तयार ?"

" नाहीं रे बुवा. या भलत्या भानगडींत आपण पडणार नाहीं. माझ्यापासून तुला मुलं झालीं कीं तू मला बेधडक कैदेंत टाकशील नाहींतर माझा शिरच्छेद तरी करून टाकशील."

अन् मग ती राणी मोठमोठ्यानं गळा काढून रडूं लागते. ती मला फसवायला आलेली असते. माझ्यापासून म्हणे तिला मूल हवं आहे ! हं...

ती रडते रडते नि मुकाट्यानं पुस्तकांत जाऊन बसते. सुषमेला मुलगा झाला म्हणजे मात्र मी एकदां त्याला घेऊन राणीकडे जाणार आहे. तिला सांगणार आहे, माझ्यापासून तुला मूल व्हायला हवं आहे न्, मग याला खूप खूप खूप खूप खेळणीं घेऊन दे पाहूं. खेळणीं हातांत पडलीं कीं तिथून छूः व्हायचं. पुस्तकांतली राणी ती.






करून करून ती काय करणार आहे ? फार तर एक दिवस येऊन रडत बसेल माझ्या मांडीवर. बसूं दे.

मग ती पुस्तकांत जाऊन बसते. तिच्या रडण्यानं पुस्तक ओलं होऊन जातं. आमची वेडपट आई माझ्यावर उगीचच खेंकसते, " दाम्या लेका, त्या कमळीचं पुस्तक खराब केलंस ना चहा सांडून ? नीट नाहीं का पितां येत ? "

मी पुन्हां गॅलरींत येतों नि स्टुलावर बसतों. या जगांत माझं असं हें स्टूलच् काय तें उरलं आहे.

थोड्या वेळानं जिन्यावरच्या अंधारांतून एक बाई येते नि मला खूण करून आपल्याजवळ बोलावते. मी जवळ जाऊन पहातों तों क्षीरसागरांची नीराक्का. लग्न झालं नि वर्षा सहा महिन्यांतच ती विधवा होऊन परत आली.

मी तिच्याजवळ जातों न जातों तोंच ती माझ्या गळ्याभोंवतीं हात टाकून लाडेंलाडें बोलूं लागते.

" दामू ..माय डार्लिंग..." इंग्रजी पहिलींत असल्यापासूनच ती फाडफाड इंग्रजी बोलत असे.

बोलतां बोलतां ती माझे मुके घेत होती. मला ते हवे होते. नकोहि होते. हवे होते. नकोहि होते. हवे होते.

नीराक्काच्या स्पर्शानं...नुसत्या स्पर्शानं माझ्या अंगाला आग लागते. जिन्यावरच मी तिची चोळी सोडतों नि तिच्या आंत दडून बसलेले दोन थंडगार चंद्र माझ्या देहावर दुधाच्या साईचं पांघरूण टाकतात.

नीराक्का हळूच माझ्या कानाला लागून म्हणते, " माझ्या पोटाला हात लावून पहा. "

आतां आम्हीं दोघं त्या पांघरुणाखालीं असतों. नीराक्काचं पोट पिकत आलेल्या पपनसासारखं टचटचीत लागतं.

" कान लावून पहा. "

मी तिच्या पोटाला कान लावतों. सुषमेच्या पोटांतलं मूल नीराक्काच्या पोटांत आलेलं असतं. अन् राजाची आवडती राणी तें घेऊन पळूं लागलेली असते. मी तसाच त्या राणीचा पाठलाग करतों नि ती राजवाड्यांत शिरत असतांनाच तिच्या हातांतलं तें गोजिरवाणं मूल घेऊन उन्हाच्या लग्नाला जातों. तिथं आम्हांला गोल्डस्पॉट मिळतो. कोकाकोला मिळतो. आईस्क्रीम मिळतं. पानसुपारी मिळते. नारळ मिळतो. अत्तरगुलाब मिळतो.

नीराक्का मला विचारीत असते, " दामू, तूं माझ्याशीं लग्न करशील ? या मुलाला आपलं मानशील ? "

मी म्हणतों, " अवश्य... "

नीराक्का पुन्हां मला आलिंगन देते नि मी त्या दुधाच्या साईच्या पांघरुणांत वितळून जातों.

...मी पुन्हां स्टुलावर येऊन बसतों तेव्हां ऊन सरड्याला घेऊन समुद्रावर गेलेलं असतं, अन् स्मशानांतल्या पिंपळावर घुबडासारखा ओरडणारा तो चंद्र नीराक्काच्या पोटांतील गर्भावर एक अक्राळविक्राळ सांवली कोरीत असतो...

● ● ●



# चित्र

— ग्रेस

चन्द्रकिरणांच्या स्पर्शानें पानें हलूं लागलीत
तरी हरवूं नकोस,
तशात धुकेंहि पडलें असेल सुकुमार
वंशवनांतील मुरलीसारखें.
स्तनांच्या ओंजळींत गच्च मिटून घे
दुःखाला बिलगलेल्या मायेचा अभिसार
अशावेळीं एखादा पक्षी अकारण
उडून जातो शांतीला तडे देत......







अनुक्रमणिका

अनुक्रमणिका





र्षभर होणारे अनेक उत्सव हे भारतीय जीवनाचे एक प्रमुख अंग आहे… आणि या सर्व उत्सव प्रसंगी दीप-प्रकाश व संगीत आनंद व उल्हास याचे वातावरण निर्माण करतात.

# फिलिप्स

वातावरणांत आनंद व उल्हास निर्माण करण्यासाठी

फिलिप्स इंडिया लिमिटेड






P 3656



अनुक्रमणिका










# संक्षिप्त गेशा

प्रभाकर पाध्ये

जपानला मी दोनदां गेलों, पण एकाहि मुक्कामांत गेशांच्या कार्यक्रमाचा अनुभव घेतला नाहीं. या माझ्या म्हणण्यावर तुमचा विश्वास बसणार नाहीं हें मला माहित आहे, पण ही साधी वस्तुस्थिति आहे. अर्थात् ही विचित्रपणाची कमाल आहे. कारण गेशांना जपानबाहेर अक्षरशः तोड नाहीं. जपानची गेशा म्हणजे खरोखर इहलोकींची अप्सरा. ही देवांचें मनोविनोदन न करतां मानवांचें ( पुरुषांचें ) मनोविनोदन करते, एवढाच फरक. पण तिच्या संगतींत पुरुष स्वतःला देवच मानतात—आणि यांत त्यांचा फारसा दोष नाहीं. गेशांचा तो गुणच आहे.

तुमची करमणूक करणें हेंच गेशाचें मुख्य कार्य. तिचें कौशल्य अनेक प्रकारांनीं व्यक्त होतें. ती तुम्हाला गोष्टी सांगते, तुमच्याशीं विनोद करते, तऱ्हतऱ्हेचे खेळ खेळते, तुम्हाला खाऊं पिऊं घालते, नाचून दाखविते, गाऊन दाखविते आणि सामीसेनच्या स्वरांनीं सारें वातावरण करुणरम्य करून सोडते. विशेष म्हणजे हें सारें करतांना तुमच्या मनांत रोमांचाचे मळे फुलविते, अंतःकरणांत काव्याचे बगिचे बहरते आणि सभोंवतालच्या गद्य वातावरणांत आनंदाचें अमृत ओतते. हें ती अशा कांहीं जादुगिरीनें करते कीं तुम्हाला वाटतें तुमची एक जिवाभावाची मैत्रीणच तुम्हाला भेटली ! किंवा एक नवीन रसरंग व्यक्ति तुमच्या जीवनांत शिरली ! खरोखर गेशाचें व्यक्तित्व म्हणजे निसर्गाची एक खेळकर लकेर ! तिचा कटाक्ष म्हणजे निळ्याभोर आकाशाची एक कडा. आणि तिचा बोल म्हणजे दयाळ पक्षाच्या गायनाचा एक तुकडा ! आपल्या चित्ररम्य किमोनोची बाही फडफडावीत, आपल्या लालचुटुक झोरीची कडा उडवीत, आणि आपल्या शुभ्रसतेज हास्याची शोभा उधळीत ती आली कीं वाटतें, ही एकादी रंगदेवताच अवतरली—रंगभूमीवर नव्हे तर आपल्या दिवाणखान्यांत, आपल्या आसपास !

गेशांचें असें गहिरें वर्णन मी वाचलेलें असतें. गेशा; चेरी आणि फुजी ही जपानची वैशिष्ट्यशाली त्रिपुटी. चेरीच्या हंगामांत मी गेलोंच नाहीं. फुजीच्या शिखरावरचा ढगाचा पडदा कधीं दूर झालाच नाहीं. पण गेशांच्या पार्टींत सामील व्हायला निसर्गाची अशी कोणती अडचण नव्हती. तरी तशी संधिच मी शोधली नाहीं. कारण मला माहित होतें कीं, गेशांची खरीखुरी गंमत अनुभवायची असेल तर जपानी भाषा यायला हवी. दुभाष्यामार्फत अनेक गोष्टी जमतात.

*मी पार ओशाळतों—तिनें चमत्कारिक मिठी मारली म्हणून ! तिनें कित्येक गिऱ्हाइकांना अशा मिठ्या मारल्या असतील आणि त्या मिठ्यांना हवा तो अर्थ असेल. या जाणिवेनें मी अस्वस्थ होतों.......*

जपानांत अशा अनेक गोष्टी जमवून घेतच होतों. पण दुभाष्याला अंतःकरणाची देवघेव जमत नाहीं—आणि कांहीं ठराविक काळ कां होईना, आणि ठराविक पातळीवरुन कां होईना, पण एक प्रकारची अंतःकरणाची देवघेवच गेशा करीत असते. मला जपानी भाषा येत नव्हती, म्हणून मी गेशाशीं गप्पागोष्टी करूं शकत नव्हतों, विनोद करूं शकत नव्हतों, खेळ खेळूं शकत नव्हतों. अर्थात् नृत्य पाहूं शकत होतों, गाणें ऐकूं शकत होतों, सामीसेनच्या स्वरांनीं कान भरून घेऊं शकत होतों—पण मनोमनीचें नातें निर्माण झाल्याखेरीज त्यांत रस निर्माण होऊं शकत नव्हता, जिव्हाळा निर्माण होऊं शकत नव्हता. गेशाच्या कार्यक्रमांत नृत्याचें महत्त्व नृत्य म्हणून नसतें आणि गायनाचें संगीत म्हणून नसतें !

पण मी गेशा-पार्टीला जाण्यासाठीं जीव न पाखडण्याचें खरेंखुरें कारण निराळेंच होतें—आणि तें म्हणजे टोकियोच्या एका आरामगृहांत गेशाची एक संक्षिप्त आवृत्ति मला भेटली होती आणि तिनें दिला तेवढा अनुभव मला पुरे होता.

टोकियोच्या सुमिदा नदीच्या कांठीं अशीं अनेक उपहारगृहें किंवा आरामगृहें आहेत कीं नुसत्या चहापानासाठीं तुम्ही गेलांत तरी अंतःकरणांत रसिकतेची वसंतपंचमी साजरी करून बाहेर पडाल. आधीं मुळीं या आरामगृहांचें अभिजात जपानी वास्तुशिल्पच तुमचें चित्त वेधून घेतें—आणि टोकियोमधल्या लाकडी खोक्यासारख्या घरांच्या भुस्कट वास्तुशिल्पानें शिणलेली तुमची दृष्टि ताजीतवानी होते. तुम्हाला नकळतच ती या इमारतींच्या वक्र लयदार छपरांवरून फिरूं लागते. पण हें झालें नुसतें बाह्य आकर्षण. आवाराचें द्वार ओलांडल्याबरोबर तुमचें पाऊल पडतें तें एका शांतप्रसन्न बागेंत. तेथून तुम्ही इमारतींत प्रवेश केला न् केलात् तोंच तुम्ही एका किमोनोकन्येच्या ताब्यांत जातां. तेथें ती तुमचा जो कबजा घेते तो ती तुम्हाला परत प्रवेशद्वारापाशीं आणून तिनें ( तुम्हाला नकळत पण तुमच्याच पैशानें ) बोलावलेल्या टॅक्सींत सोडीपर्यंत. तोंपर्यंत ती तुमच्याभोंवतीं एकाद्या फुलपांखरासारखी नाचत राहाते. तुमच्या सिग्रेटच्या धुराच्या वलयासारखी तुमच्या वातावरणांत विलीन होते. तुमच्या पेयाच्या सोनेरी धारेची झळाळी तुमच्याभोंवतीं निर्माण करते. आणि तुमच्या चित्तांत आनंदाच्या अमृतलहरी आणून सोडते. तुमचें या आरामगृहांतलें वास्तव्य तिच्या आतिथ्यानें भरलेलें असतें. तिच्या बोलांनीं तें बोलकें बनतें. तिच्या हालचालींनीं वेडावून जातें आणि तिच्या तालावर नाचत असतें. येथल्या पेयाला तिच्या स्पर्शाची रुचि असते. येथल्या गप्पांना तिच्या बोलांनीं कलाटणी मिळते. आणि येथल्या करमणुकीला तिच्या कल्पनांनीं स्फुरण चढतें. तुमच्या येथल्या अस्तित्वाची ती राणी असते—तिच्यामुळेंच तुम्ही येथें येतां, येथें रमतां, येथें रेंगाळतां आणि येथल्या प्रत्येक क्षणागणिक तुम्ही पैसा मोजीत असतां हें अतिशय सुखासमाधानानें विसरतां !

त्या दिवशीं संध्याकाळीं माझे दोन मित्र अशा एकाद्या आरामगृहांत जाण्याची कल्पना काढतात आणि मी पूर्वीचा कांहींहि अनुभव नसून देखील भारावून जातों.

त्या आरामगृहाच्या आवाराचें फाटक जरासें उघडतें आणि शांत-तुष्ट प्रसन्नतेचेंच दर्शन झाल्यासारखें वाटतें. आम्ही आंत जातों नि टोकियोचें कर्कश धुळकट जग बाहेर राहातें. आमचा प्रवेश एका बगिच्यांत होतो. बगिचा कसला तो ? एक तळें ! तळ्याचें पाणी इकडे तिकडे पसरलेलें असतें, वाहात असतें, अनेक रीतींनीं आणि आकारांनी आपलें अस्तित्व जाणवीत असतें. त्या पाण्याची सोय पाहूनच बागेंतलीं झाडेंझुडपें वाढलेलीं असतात. बागेंत समोरच एका ( कृत्रिम ) खडकाच्या खबदाडींतून पाण्याचा झोत पडतांना दिसतो. हा शेजारच्या सुमिदा नदींतूनच आणलेला असेल, पण नदीच्या पाण्यापेक्षां याचें दर्शन किती निराळें ! जणुं सारी स्वच्छता, निर्मळपणा, आणि स्वच्छंद घेऊन तो आतांच आकाशांतून उतरला आहे ! आणि पृथ्वीवरील पराक्रमाच्या कल्पनेनें सळाळून गेला आहे ! या झोताचेंच पाणी पसरतें आणि तळें निर्माण करतें. या तळ्याच्या मधोमध एक झाड आहे. त्याच्या पिसाट फांद्या तळ्यावर पसरल्या आहेत. त्याचा बुंधा त्याच्या प्राचीनपणाची आणि त्याच्या बेफाम वाढीची ग्वाही देत आहे. त्याच्या खोडाला इतक्या गांठी, इतकीं पोकें आणि इतकीं खबदाडें असतात कीं जपानचीं बेटें समुद्रांतून वर येण्याच्या वेळीं उसळलेल्या प्रलयांत गटांगळ्या खाणारा एकादा प्राणी येथें येऊन अडकला आणि पृथ्वीवर अस्तित्व मिळविण्यासाठीं या झाडाच्या रूपानें वाढला असें वाटावें !

त्या तळ्याच्या पाण्यांत चित्रविचित्र आकारांचे आणि मातीच्या व शेवाळाच्या रंगांचे दगड निरनिराळे काटकोन साधून टाकलेले असतात आणि त्यांच्यावरून उड्या मारीत आम्ही वेलींनीं वेढलेल्या एका दरवाजांत जातों आणि आरामगृहांत प्रवेश करतों. दरवाज्याच्या आंत ओसरींतच पादत्राणांच्या रांगा दिसतात आणि जपानी घरांत शिरण्याच्या प्राथमिक उपचाराची आठवण होते. पायांतलीं पादत्राणें काढण्यासाठीं बुटाच्या लेसांना हात लावतों न लावतों तोंच तीन किमोनो कन्या झोरीच्या चवड्यावर तुरुतुरु येतात, आणि आमचे बूट काढूं लागतात. माझे बूट दुसऱ्या कोणी काढावे हें मला आवडत नाहीं. माझ्या लेस पकडूं पाहणारा हात मी दूर करतों, आणि एका नाजूक स्पर्शाची जाणीव माझ्या हातावर उमटते. बूट पायांतून निघाल्याबरोबर कलात्मक वेलबुट्टीच्या सुंदर सपाता आमच्या पायांत चढतात. हा विधि सुरू असतांना आमची नजर इकडे तिकडे भिरभिरते आणि गॅलरींत प्रत्येक खोलीच्यासमोर आतिथ्याच्या आणि प्रसाधनाच्या किमोनोधारी प्रतिमा दृष्टीस पडतात. त्यांच्या डोक्यावर केशकलापाचे रचनाबद्ध मुकुट नसतात, त्यांचे कर्तनकलेचे आधुनिक संस्कार मिरविणारे केस रुळत, भुरभुरत असतात—आणि या गेशा नव्हत




याची जाणीव होते. क्षणार्धांत त्या साऱ्यांच्या काळ्याभोर नजरा आमच्याकडे वळतात आणि क्षणभर पापण्या फडफडावून पुनः जमिनीचा वेध घेत स्थिरावतात ! जपानी सौंदर्याच्या या सरमिसळ रांगेची अधिक दखल घेण्यास फुरसत नसते--आमच्यासमोर सपाता सरसावणाऱ्या मुलींतली एक 'डोझो' 'डोझो' करीत आम्हाला एका खोलींत घेऊन जाते.

आम्ही खोलींत शिरतों नि पाहतों तों खोली अगदीं मोकळी, निर्लेप. तेथें फर्निचरचें नांव नाहीं. स्वच्छ ततामी तकाकते आणि खोलीचा रिकामेपणा अधिकच जाणवतो. जपानी घराच्या खोल्या अशाच असतात असें मी ऐकलें होतें, पण असल्या उपहारगृहांत फर्निचरची व्यवस्था असेल असें वाटलें होतें. मी थोडा आश्चर्यानें पाहातों तोंच त्या दुसऱ्या दोन मुली घाईघाईनें येतात नि भिंतींत लपलेलीं कपाटें उघडून त्यांतून तीन चौरंग आणि सहा गिरद्या बाहेर काढतात. लगेच ते चौरंग मांडतात आणि दरेक चौरंगाभोंवतीं दोन दोन गिरद्या टाकतात. त्यांचें चौरंग मांडणें, गिरद्या टाकणें चालू असतें तां आम्हाला घेऊन येणारी मुलगी फुकुझावांना कांहीं तरी विचारते. त्याबरोबर एकदम हंशा पिकतो. आम्हाला घेऊन येणारी मुलगी तर त्या हंशांत फारच जोरानें सामील होते. कां नकळे, मला वाटतें, ते मलाच हंसत आहेत; चौरंगाभोंवतीं मला गुडघे टेकून अगर मांडी घालून बसतां येईल कीं नाहीं याची त्यांना शंका वाटत आहे; पाश्चात्य पाहुण्यांची असें बसतांना जी धांदल उडते ती त्यांच्या डोळ्यांसमोर उभी राहिली आहे; आणि मी त्यांच्यांतलाच, असा त्यांची समजूत झाली आहे. त्यांची गैरसमजूत होत आहे, त्यांना भारतीयांची माहिती नाहीं, हें मला समजत असतें. त्यांचा भ्रमनिरास करून त्यांना लगेच चकित करतां येईल हेंहि मला माहित असतें. पण हा हंशा माझ्यामुळें पिकला हीच गोष्ट मला लागते. आणि मी तसाच हिरमुसल्या चेहऱ्यानें उभा राहातों. त्यांतली एक मुलगी एका गिरदीकडे बोट दाखविते नि मला म्हणते, 'दोझो'. तरी मी उभाच राहातों. फुकुसावा आणि यामाकिटा गिरद्यांवर बसून चौरंगावरच्या ओल्या टॉवेलने आपले चेहरे स्वच्छ साफसूफ करूं लागलेले असतात तरी मी उभाच. आतां पिकलेल्या हंशांत, मला 'दोझो' म्हणणाऱ्या मुलीनें वेताचाच भाग घेतलेला होता हें जाणवलेलें असूनहि मी उभाच. तेव्हां ही मुलगी हळूच माझ्या हाताला स्पर्श करते नि म्हणते 'दोझो'. आतां तिच्या आवाजांत अशी कांहीं नाजुक किणकिण जाणवते, आणि तिच्या त्या स्पर्शांत असा कांहीं आपलेपणा भासतो कीं माझा हिरमुसलेपणा कोठच्या कोठें पळतो. मी मनमोकळें हंसतों नि गिरदीवर बसतों--आणि मला मांडी घालून झकास बसतां येतें हें दाखविण्यासाठीं ऐटीनें मांडी मोडतों आणि बदलतों. तिच्या तें ध्यानांत येतें आणि ती हंसते--वेताचें हंसते--इतकें वेताचें कीं सुरंगीच्या कळीची एक पाकळी उमलली असें वाटतें. हंसते नि सिग्रेटच्या पेटींतील एक सिग्रेट काढून मला द्यायला लागते. मी ओल्या टॉवेलनें तोंड पुसतां पुसतां, नको म्हणतों. त्याबरोबर तिच्या चेहऱ्यावर आश्चर्य उमटतें आणि त्यांत एक निराशेची रेषा तरळते. मी सिग्रेट ओढत नाहीं ही माझ्यांत कांहीं तरी उणीवच आहे असें तिला वाटत आहे, असें मला वाटतें, आणि आंत कांहीं तरी खुपतें. माझे मित्र सिग्रेट शिलगावून धूर सोडीत असतात आणि एक प्रकारच्या बेफिकीर नजरेनें धुराच्या वलयांचा वेध घेत असतात आणि मी मात्र इकडे चौरंगावरची काड्याची पेटी निरखीत असतों. पेटीच्या लेबलावर एका मोहरलेल्या फांदीचें नाजुक नक्षीदार चित्र असतें, आणि मला एकदम कोरिनच्या 'प्लमब्लॉसम' या विख्यात चित्राचें स्मरण होतें. त्याबद्दल तिला कांहीं तरी विचारावेंसें वाटतें, पण भाषेच्या अडचणीमुळें विचारतां येत नाहीं. मित्रांच्या साहाय्यानें विचारतां आलें असतें, पण आतां तिच्याशीं बोलतांना मित्रांची मध्यस्थी नको असें वाटतें. तिच्याशीं आतां नुसतें निःशब्द संभाषण, असें मी ठरवितों आणि तिच्याकडे पाहून नुसताच हंसतों. इतक्यांत जाणवतें कीं तिचें नांव आपल्याला माहित नाहीं, आणि मुलीचें नांव माहित नसणें म्हणजे कोणत्या फुलाचा हा गंध हें ध्यानांत न येणें. माझा निःशब्द संभाषणाचा बेत मोडतो नि मी तिला इंग्रजींत विचारतों, तुझें नांव काय. तिला तें कांहींच कळत नाहीं नि ती गोंधळून हंसते, व फुकुझावांकडे पाहाते. फुकुझावा माझा प्रश्न तिला जपानींत सांगतात आणि तिच्या जपानी उत्तराचें भाषांतर मला सांगतात--'प्लम ब्लॉसम.' मी पेटीवरच्या चित्रावर बोट ठेवतों आणि खुणेनेंच विचारतों, 'खरोखर ?' ती गोड हंसते नि खुणेनेंच सांगते, होय. मला आश्चर्य वाटतें. खरेंच, हिचें नांव प्लमब्लॉसम ? कीं ही माझी नुसती गंमत ?' पण लगेच वाटतें, करीना कां ती गंमत ? गंमत असली तरी किती गोड आहे ?--हें नांव किती छान आहे ?--कांहीं कां असेना





अनुक्रमणिका

तिचें खरें नांव ?--या वेळेपुरतें तिचें नांव प्लमब्लॉसमच ! मीं तिला हळूंच हांक मारतों, 'प्लमब्लॉसम' नांवाबरोबर तिचा चेहरा उमलतो--अगदीं कोरीनच्या त्या मोहरलेल्या फांदीवरच्या एका फुलासारखा ! गुलाबी चेहरा, काळेशार डोळे, फडफडत्या पापण्या, लालचुटुक ओठ आणि पांढरें शुभ्र हास्य--वाटतें, कोरीनच्या चित्राचा जीवंतपणा या असल्या चेहऱ्यांत आपलें प्रतिबिंब उमटविण्याच्या शक्तींत आहे !

इतक्यांत आम्हांला खोलींत घेऊन येणारी मुलगी--तिच्या किमोनोवर बांबूच्या कोवळ्या पानांचीं चित्रें असतात; मी तिचें नांव ठेवतों चिवार--! ती मुलगी येते. तिच्या हातांत साकेच्या तीन बाटल्या नि तीन पेले असतात. ती एकेका चौरंगावर एकेक बाटली नि एकेक पेला ठेवते. फुकुझावा तिला कांहीं तरी सांगतात नि ती साकेची बाटली-पेला घेऊन जाते नि लगेच बीअरची बाटली व ग्लास घेऊन येते. फुकुझावांना साकेपानाचा नाजुक नखरा पसंत नसतो. पेय करें तोंडभर प्यावें नि पोटभर प्यावें अशी त्यांची थिअरी असते आणि त्यांचें शरीरहि या थिअरीला पोषक असें स्थूल बुटकें असतें. पण यामाकाटांची साकेभक्ति अरसल असते. रसिक असते. साकेचा एकेक थेंब जिभेवर विरघळवीत, त्याच्या कणांनीं शरीरांतलें चैतन्य हळुहळू फुलवीत, नजरेवर सोनेरी स्वप्नांची फुलपांखरें नाचवीत आणि अखेरीस मस्तकांत उसळलेल्या लाटांवर कल्पनांच्या लहान लहान होड्या डोलवीत बाटलींतला शेवटचा थेंब पेल्यांत ओतण्यांत साकेपानाच्या कलेचा विकास आहे-- आणि या कलेच्या आस्वादांत शेजारच्या मुलीला सामील करून घेण्यांत साकेपानाचें सार्थक आहे हें ते जाणतात. मुलीनें भरलेला छोटा पेला ते दोनहि हातांनीं हलका फुलका उचलतात, क्षणभर तसाच तो हातांनीं धरून आपली आर्त नजर त्या मुलीच्या कोवळ्या नजरेवर रोखतात मग नजरेवर एक हंसू खेळवितात आणि पेला ओठाला लावतात, साकेचा एक थेंब चाखतात आणि तो पेला तसाच मुलीपुढें धरतात. ती खुदकन् हंसते, गोड हंसते, आणि हलक्या हातानें तो पेला त्यांच्याकडे लोटते. लोटते नि त्यांना कांहीं तरी म्हणते. तेव्हां ते आपली सारी नजर त्या पेल्यावर लावतात, दोनचार क्षण तसेंच पाहात राहतात. आणि मग पेला तोंडाला लावून एका घोटांत रिकामा करतात. रिकामा करतात नि तसाच पुनः भरतात--आणि तिला देतात. आतां ती तो स्वीकारते, नाजुक हातानें तोंडाकडे नेते आणि अतिशय आकर्षक पद्धतीनें पिऊन टाकते. पिते, भरते नि परत त्यांना देते--आणि त्यांचें कणाकणानें पिणें पुनः सुरू होतें.

इतका वेळ मी नुसता पाहातच असतों. प्लमब्लॉसमनें पेला भरलेला असतो. मी तो दोनहि हातांनीं धरलेला असतो. पण तो तोंडाकडे मात्र नेत नाहीं. तो पेला माझें चित्त खेंचीत असतो. त्याचा एकेक थेंब तोंडांत विरघळला म्हणजे देहांतलें चैतन्य कसें शहारतें, कसें मोहरतें याची कल्पना तो चेतवीत असतो. पण मादक द्रव्यें माझें चैतन्य मोहरवीत नाहींत, हरपवितात हा अनुभव मला साशंक करतो. हा पेला घेतला तर त्याचे परिणाम काय होतील याची शंका मनांत रेघोट्या ओढते, आणि मी तो पेला तसाच थिजल्यासारखा हातांत धरून राहातों. साकेभक्त यामाकाटांना हें पाहवत नाहीं. ते मला पिण्याचा आग्रह करतात आणि मी चेहरा आंबट करून हंसतों. तेव्हां ते प्लमब्लॉसमला कांहीं तरी सांगतात आणि ती माझ्या हातांतला पेला अलगद काढून घेऊन माझ्या तोंडाकडे नेऊं लागते. मी चपळाई करून तो पकडतों आणि तोंडाला लावून रिकामा करतों. पुढें काय करायचें मला माहित असतें. आतांच यामाकाटांकडून तें शिकलेलें असतें. मी तो पेला भरतों आणि प्लमब्लॉसमपुढें करतों. पण ती तो घेत नाहीं. कांहीं तरी बोलते. मला अर्थात् तें समजत नाहीं. मी यामाकाटांकडे पाहातों. तेव्हां ते म्हणतात, तिचें असें म्हणणें आहे कीं आपण हा पेला घेतला तर तो भरून उलट तुला द्यावा लागेल, पण त्याला तर तुझी तयारी दिसत नाहीं, म्हणून ती गोंधळली आहे. त्यावर मी म्हणतों, खरेंच मला आणखी एक पेला घेणें मुळींच शक्य नाहीं. त्यावर ती म्हणते ( आणि ती म्हणते तें यामाकाटा मला सांगतात ), "आपण पुनः घेणार नसाल तर आपल्या हातची साके पिण्याच्या भाग्यास मला मुकावें लागेल." ती असें म्हणते नि माझ्याकडे गंभीर नजरेनें पाहाते. त्यांत एक निराशेची छटा भासते. पारिजातकाच्या पाकळीवरचा हा ओरखडा मला सहन होत नाहीं. मी लगेच तो भरलेला पेला तिच्यापुढें धरतों - आणि माझी नजर काय म्हणायचें तें म्हणते. लगेच ती हंसते, मोकळें हंसते नि पेला रिकामा करते. लगेच पेला पुनः भरतो









नि नाजुक हातांनीं माझ्यापुढें येतो. मी तो घेतों आणि तोंडाला लावतों. पितांपितां माझी नजर अभावितपणें भिटते—मिटलेल्या नजरेवर कसले भाव नाचतात नकळे, पण तीं मिस्किल हंसते आणि मी तिच्या हंसण्याची परतफेड करतों.

जरा वेळानें खाण्याचे पदार्थ येऊं लागतात. ते येत आहेत तोंच चिनार स्पिरिटचा स्टोव्ह घेऊन येते आणि तो पेटवते. इतक्यांत दुसरी एक मुलगी एक परडी घेऊन येते. परडींत मांस, नाना प्रकारच्या भाज्या आणि साकेची बाटली असते. लगेच एक परात स्टोव्हवर चढते आणि परातींत परडींतले जिन्नस शिजूं लागतात. मी यामाकाटांना हें काय म्हणून विचारतों. यामाकाटा सांगतात, ही सुकियाकी, जपानच्या पाकशास्त्राची राणी, जपानी जिव्हेची अधिष्ठात्री. जिव्हेला कशी लागेल नकळे, पण ती शिजत असतांनाचें दर्शनच मला मजेदार वाटतें. तापलेल्या परातींत शिजतांनाचा ओल्या भाज्यांचा चुरचूर आवाज, आगीच्या धगीनें त्यांचे क्षणाक्षणाला बदलणारे रंग, आणि त्यांत साके ओतल्याबरोबर उसळणारा घमघमाट—माझ्या संवेदनांची चेतना माझी मलाच जाणवूं लागते. माझें लक्ष सुकियाकींत गुंतलेलें असतें तोंच सारे चौरंग खाद्यपदार्थांच्या बशांनीं व पेल्यांनीं भरून जातात. या पदार्थांचे आणि त्यांच्या बशांचे व पेल्यांचे रंग माझी दृष्टि वेधून टाकतात आणि मी त्या पदार्थांकडे भारल्यासारखा बघत राहातों. हे खायचे पदार्थ आहेत, आपल्या जिव्हेला त्यांचें आवाहन आहे, आपल्या रुचिसामर्थ्याची त्यांच्यांत आराधना आहे ही गोष्ट मी विसरून जातों. प्रत्येक बशी, प्रत्येक पेला म्हणजे सौंदर्याचा नमुना असतो. प्रत्येक पेल्याचा रंग, आकार—पेल्यागणिक [illegible]वा, आणि पेल्यागणिक वेड लावणारा ! प्रत्येक पेला म्हणजे जणुं काय एकेक प्रयोगच ! या एकेक प्रयोगानें माझें चित्त भारून जातें—इतक्यांत फुकुझावा सांगतात कीं यांपैकीं प्रत्येक बशीला, प्रत्येक पेल्याला इतिहास आहे, परंपरा आहे, आणि हें उपहारगृह या परंपरेला जीवापाड जपत असतें. पैशाची रास ओतली तरी या वस्तु विकायला तें तयार होणार नाहीं. मला एकदम तें तत्त्वांतलें झाड आठवतें—वाटतें, तें झाड, या बशा, हे पेले, यांच्यांमध्यें एक जिव्हाळ्याचें नातें आहे आणि या नात्याचा या उपाहारगृहाला अभिमान आहे.

सुकियाकी तयार होते—आणि आमच्या बशांत वाढली जाऊं लागते. तिची चव आमच्या जिभेवर वितळते आहे आणि तिचा स्वाद आमच्या वृत्तींत मिसळतो आहे तोंच प्लमब्लॉसम माझ्या चौरंगावरची साकेची बाटली घेते नि स्टोव्हवरच्या सुकियाकींत ओतते—एकदम चुर्र आवाज येतो आणि घमघमाट पसरतो. प्लमब्लॉसम त्या साकेनें भरलेला तेवढाच भाग काढते, आणि माझ्या बशींत टाकते—आणि एकदम खट्याळ हंसते. त्याबरोबर सारेजण हंसतात. आणि मग यामाकिटा म्हणतात कीं तुमच्या चौरंगावरची साके तुमच्या पोटांत गेलीच पाहिजे असा तुमच्या मैत्रिणीचा कटाक्ष आहे ! तिच्या नजरेच्या कटाक्षाइतकाच हा कटाक्ष मला सुंदर वाटतो. माझ्या साकेची चव शोधीत मी सुकियाकी खाऊं लागतों.

खाणें संपलें—आतां काय ? खरें म्हणजे प्लमब्लॉसमशीं गप्पा

मारायला हव्यात. ती हंसली म्हणजे तिचे काळेशार डोळे मासोळी-सारखे उड्या मारतात हें तिला सांगायला हवें. ती चेष्टा करूं लागली म्हणजे तिचे लालचुटुक ओठ अगदीं मंद थरतात त्याचें वर्णन तिजपाशीं करायला हवें. आणि ती गंभीर झाली म्हणजे तिला एकदम हंसूं लोटणार असें वाटतें तें तिला कळवायला हवें. पण मी यांतलें कांहींच करूं शकत नाहीं. माझे दोनहि मित्र आपापल्या मुलींशीं गप्पा मारण्यांत रमून गेलेले असतात. मला त्यांचा हेवा वाटतो. मी तिच्याकडे नुसता पाहातां नि हंसतां. पण असें किती पाहणार नि किती हंसणार? मी आपला खिडकींतून बाहेर नजर टाकतां. बाहेर सुमिदा नदीचे पात्र दुथडी भरून चाललेलें असतें. वाहत्या पाण्यावर सायंकाळच्या छाया नाचत असतात. पाण्यावरचे तरंग मध्येंच प्रकाशतात, मध्येंच काळवंडतात—अगदीं प्लमब्लॉस-मच्या डोळ्यांसारखे. तिला हें सांगायला हवें. पण कसें सांगणार? मला जपानी येत नाहीं आणि मित्रांच्या मध्यस्थीनें सांगावें असें वाटत नाहीं. मी आपला पुनः बाहेर पाहूं लागतां.

तों सामीसेनचा सूर ऐकूं येतो. मी चमकून पाहातां. तां खोलीच्या कोपऱ्यांत एक किमोनो सुंदरी हातांत पंखा घेऊन उत्सुक मुद्रेनें उभी असते आणि एक साधारण वयस्क बाई सामीसेनच्या तारा छेडीत असते. म्हणजे आतां नृत्याचा कार्यक्रम—छान!

नृत्य सुरू होतें. नृत्य म्हणजे नृत्य नव्हेच! नाचणाऱ्या मुलीचे पाय गुडघ्यांत लवतात आणि तिची टाचांनें वेष्टिलेलीं पावलें लयदार मुरडतात. यापलीकडे नृत्य असें दिसतच नाहीं. पण तिच्या हातांत घडीचा रंगीन पंखा असतो. तो उघडतो. मिटतो. फिरतो. निरनिराळे आकार धारण करतो. कोन काटकोन करतो. आडवाउभा होतो—आणि त्याच्या गतीबरोबर, फिरकीबरोबर, वक्र वळणाबरोबर नर्तिकेची नजर फिरते, नाचते, ओथंबते. आपल्या भारतीय नृत्यांत मुद्रांना अर्थ असतो तसाच या पंख्याच्या हालचालींना असतो हें लगेच ध्यानांत येतें. पण हा अर्थ मला समजणार कसा? मला तो सांगणार कोण? मित्रांनीं सांगितला असता—पण मला तो प्लमब्लॉसमकडून हवा असतो, आणि ती तर सांगूं शकत नाहीं. कांहीं वेळ मी नृत्य तसेंच निर्बोध नजरेनें पाहातां. पण मग राहवत नाहीं, आणि तिला विचारतां. इंग्रजींतच विचारतां, पण तिला कळतें. ती लगेच उठते. तुरतुर पावलें टाकीत जाते आणि कागदपेन्सिल घेऊन तशीच चवड्यावर उडत पावलें टाकीत येते. नर्तिका नाचत असते. तिचे पंख्याचे हात सुरू असतात. ती पंखा पूर्ण उघडते आणि पाठीमागें नेऊन हळुहळू वर आणते. त्याबरोबर प्लमब्लॉसमची पेन्सिल कागदावर रेखाटूं लागते—आणि उगवत्या चंद्राची आकृति उमटते. नर्तिका दोन रंगीत पंखे घेऊन पक्ष्याच्या पंखासारखे हलविते आणि प्लमब्लॉसमच्या कागदावर उडणाऱ्या पक्षाचें चित्र निघतें. नर्तिकेचा पंखा डोक्यावर जातो आणि हवेंत तरंगल्यासारखा हळुवार फिरतो. त्याबरोबर आकाशांत संचरणाऱ्या ढगाची आकृति तयार होते. प्लमब्लॉसमच्या चित्रकलेंतला वेग आश्चर्यकारक असतो. इतक्यांत स्वच्छशुभ्र पंखा हलक्याफुलक्या हालचालीनें वरून खालीं येतो. त्याबरोबर प्लमब्लॉसम पेन्सिल टाकते, हातांतल्या कागदाचे बारीक बारीक तुकडे करते आणि ते वर धरून अलगद सोडून देते—आणि

छकापन्हुति : ४ :



हा पहा पशूंचा राजा--गिरनारचा सिंह
हिंडतो आहे गुरगुरत--मध्येंच पाहतो आंत, मध्येंच बाहेर
जणूं काय नट रंगभूमिवरचा, एकाकी--
तिसऱ्या अंकांतील स्वगत ओरडीत
हॅम्लेटमधले--मरावें कीं मारावें हा एकच प्रश्न!

मला समजतें कीं हा हिमवर्षाव! पण आतां---? नर्तिकेच्या आडव्या हालत्या हातावर दोन पंखे झुळून राहिले आहेत. हें हलणाऱ्या फांदीवर पक्षाचें डोलणें एवढें कळण्याइतकी माझी प्रगति झाली आहे. पण प्लमब्लॉसम याचें चित्र कसें काढणार याचेंच आतां मला कुतूहल आहे. ती घोटाळते. हंसते. पण तिचा चेहरा गोरानोरा होतो. मी लगेच चौरंगावरची पेटी उचलतो, तिच्या हातांतली पेन्सिल घेऊन, पेटीवरच्या मोहरलेल्या फांदीवर पक्ष्याचें चित्र काढतां आणि पेटी हातांत घेऊन ती खालीवर हालवतो. तिला तें पटतें. ती कौतुकानें हंसते. पण लगेच तिचा चेहरा गंभीर होतो. हिरमुसला होतो. आपल्याला या नृत्याचें रेखाटन जमलें नाहीं याची ही खंत आहे हें मी ओळखतां. मी पेन्सिल तिला देण्याच्या मिषानें तिचा हात हळूंच दाबतो. तिला त्याचा आश्वासक अर्थ समजतो. तिची कळी खुलते.

नृत्य संपतें. सामीसेनचे सूर थांबतात. नर्तिका निघून जाते. पाठोपाठ सामीसेन जाते. आतां माझे मित्रहि निघण्याची तयारी करतात. इतक्यांत फुकुझावांना फोटो काढण्याची लहर येते. ते क्यामेरा सरसावतात. फ्लॅशबल्ब बसवतात आणि अँगल् घेण्याच्या उद्योगास लागतात. फोटोची ही कल्पना सर्वांनाच पसंत पडते. सर्वांचे चेहरे खुलतात. मुली झटकन् किमोनोंच्या सुरकुत्या साफ करतात. फुकुझावांचा क्यामेरा भराभर चालतो. फ्लॅशलाइटचे बल्ब लगोलग पेटतात नि बदलतात. सर्वांचे सर्व तऱ्हेचे फोटो निघतात. एकत्र निघतात, वेगवेगळे निघतात. गंभीर निघतात, हंसत खेळत निघतात. इतक्यांत फुकुझावांना एक कल्पना सुचते आणि ते प्लमब्लॉसमला कायसेसें म्हणतात. त्याबरोबर यामाकाटा हंसतात,


अनुक्रमणिका

त्यांची मुलगीहि हंसते. पण प्लमब्लॉसम विलक्षण लाजते, संकोचते, मानेनें नाहीं म्हणते, आणि ततामीवर नजर रोखून थिजल्यासारखी बसते.

मला कांहींच कळत नाहीं. हें काय चाललं आहे ? हे हंसतात कां ? ही संकोचते कां ? मी यामाकाटांकडे पाहातां. ते म्हणतात, फुकुझावा तुझ्या मैत्रिणीला तुला अगदीं खेटून बसायला सांगताहेत—त्यांना तसा फोटो घ्यायचा आहे, पण तिला तें मान्य नाहीं, ती नकार देत आहे.

माझ्या मनांत आनंद आणि निराशा यांच्या छटा एकदम एकमेकांवर उमटतात. तिला शेजारी घेऊन फोटो काढण्याची कल्पना किती गोड ! दोन तासांत प्लमब्लॉसमनें मला आपलेंसें करून घेतलेलें असतें. आम्हां दोघांत एक जिव्हाळ्याचें नातें निर्माण झालेलें असतें. तिच्या माझ्या स्नेहाच्या तरल अदृश्य धाग्याला फोटोचें मूर्तरूप देण्याची कल्पना मला फार आवडते. हें नातें निर्माण झालें खरें, पण आतां दहापांच मिनिटांतच तें निमेल, प्लमब्लॉसम मला पुनः भेटेल असा मुळींच संभव नाहीं—फुकुझावा या क्षणजिवी संबंधाला चिरस्थायी स्वरूप देण्याची ही युक्ति काढतात म्हणून मला फार आनंद होतो. पण होतो तोंच त्याच्यावर विरजण पडतें. प्लमब्लॉसमला फुकुझावांची कल्पना मान्य नाहीं—माझ्या अंतःकरणांतला एक धागा कटकन् तुटतो.

हा असा फोटो काढण्याची कल्पना प्लमब्लॉसमला पसंत नाहीं. कां पसंत नाहीं ? कारण स्पष्ट आहे. मला तिच्याबद्दल वाटतें तसें तिला माझ्याबद्दल वाटत नाहीं. तिच्या ठिकाणीं तो जिव्हाळा निर्माण झालेला नाहीं. स्नेहाचें तें स्पंदन तिला जाणवलेलें नाहीं. मला एकदम धक्का बसतो. मी स्वतःशींच चूर होतों. विचार करूं लागतों. आपला असा तोल कसा सुटला ? तिच्या वागण्याचा अर्थ आपल्याला कळूं नये म्हणजे काय ? आपल्याला ही अशी एकच भेटली—पण तिला माझ्यासारखे रोज छपन्न भेटत असतील. असे रोज छपन्न येतात नि छपन्न जणांचें आदरातिथ्य ती रोज करते. त्या सर्वांशीं तिने असे स्नेहाचे नाजुक धागे जोडावे काय ? उपाहारगृहांत चहाच्या कपासाठीं अगर साकेच्या पेल्यासाठीं अगर ती भरून देणाऱ्या मुलीच्या स्नेहाळ हस्तस्पर्शासाठीं येणाऱ्या दरेक गिऱ्हाइकागणिक ती स्नेहाचे धागे स्वतःच्या अंतःकरणाभोंवतीं असे गुंडाळूं लागली तर लवकरच तिचें अंतःकरण श्रावणांत सुतें गुंडाळलेल्या पिंपळाच्या खोडासारखें होईल कीं—!

माझें मीच समाधान करूं लागतों. प्लमब्लॉसमला माझ्या स्नेहाची पर्वा नसली तरी ती माझा तिटकारा करीत नाहीं; माझ्या निकट फोटो काढून घेण्याची तिची तयारी नाहीं म्हणजे ती माझा तिरस्कार करते असें नाहीं, असें पटतें नि जरा बरें वाटतें. मन शांत होतें. पण लगेच तें पलटी खातें. विचारतें—पण मग ती अशी कां वागली ? इतका जिव्हाळा तिनें कां दर्शविला ? तिच्या हास्यांत इतका स्नेह कां ओसंडला ? तिच्या स्पर्शांत तिनें इतकी आपुलकी कां ओतली ? —म्हणजे, हा केवळ एक उपचार ! केवळ एक धंदेवाईक क्लृप्ति ? माझें मन एकदम धुमसूं लागतें. या दोन तासांतलें तिचें सारें वर्तन अंतरंगांत वर्दळूं लागतें. साकेच्या पेल्याला तिच्या ओठांचा नाजुक स्पर्श !—पण असे शंभर पेले रोज तिच्या ओठांनीं असे कळकटत असतील ! दररोज शंभर हातांना तिचा असा जिव्हाळ्याचा स्पर्श होत असेल ! गिऱ्हाइकाच्या हातांतल्या काडेपेटीवरील चित्रागणिक तिचें नांव बदलत असेल !

मन आतां निष्ठुर बनतें. दुष्ट बनतें. स्वतःच्या दुखावलेल्या अहंकारावर फुंकर घालण्यासाठीं विपरीतहि बनतें. म्हणतें, असें जर आहे तर मग असें फोटोला बसायला काय हरकत आहे ? शंभर ओठांनीं विटाळलेला साकेचा पेला चालतो तर शंभर शरीरांना चिकटून बसायला काय हरकत आहे ? हा विचार मनांत येतो नि मन थोडें चरकतेंच—तूं काय शंभर गिऱ्हाइकांतलाच एक ?

आतां मन अगदीं कोंडतें. एक प्रकारच्या बधीर दुःखानें भरून जातें. कांहीं बोलावेंसें वाटत नाहीं. कोणीच कांहीं बोलत नाहीं. साऱ्यांनाच विचित्र वाटतें. सारें वातावरण चमत्कारिक बनतें. ताणतें. एका उपहारगृहाच्या क्षुल्लक मुलीनें आपल्या साध्या विनंतीला नकार द्यावा म्हणजे काय, या रोषाची छटा फुकुझावांच्या चेहऱ्यावर उमटते. उलट, गिऱ्हाइकाच्या तसें म्हटलें तर अगदीं साध्या अशा विनंतीला आपण मान देऊं शकत नाहीं म्हणून वाटणारी खिन्नता, आपल्या कर्तव्यांत कांहीं कसूर तर होत नाहीं ना अशी वाटणारी शंका, आणि आपल्या व्यक्ति त्वाचा एक विलक्षण अभिमान, या साऱ्यांच्या मिश्र छटा प्लमब्लॉसमच्या चेहऱ्यावर उमटतात. खोलींतलें वातावरण एक प्रकारच्या चमत्कारिक कुंदपणानें भरून जातें.

[ पान ८८ वर पहा ]

अनुक्रमणिका

आमच्या वडिलांसारखे वडील त्रिभुवनांत मिळणार नाहींत हें जरी खरें असलें, तरी त्यांचा एक गुण इतका टोकाला गेला आहे, कीं तो आतां जवळ जवळ दुर्गुणच झाला आहे. दया ! ज्याच्या त्याच्याविषयीं दया आणि माया ! या एका गुणापायीं सगळें वाया गेल्यासारखें वाटतें. त्यांचें त्यांनाच मिळत नाहीं. मी आतां मोटा झालो. घर, शेती पाहूं लागलो. आमचें रहाणें जरी शहरांत असलें आणि आम्हांला जरी नोकऱ्या चाकऱ्या असल्या तरी आज काल भागते कुठं ? आणि अशा काय बाजीरावी नोकऱ्या लागून गेल्या आहेत तर सदासर्वदा आबादीआबद असावी ? त्यामुळें खेड्यांत जें घर आणि शेती आहे तिकडे माझें मन वळलें.

खरें म्हणजे आमची वाडवडिलांपासून शेतीभाती. उसाचा मळा पिकवला तर सोन्याचे पीक येईल अशी जमीन. वाडवडिलांपासूनचे भलें मोटं घर. वाडाच म्हणानात. अंगण, सोपा, माजघर, स्वैपाक-घर, मागला सोपा, माडी, गच्ची, सारें कांहीं या घराला होतं. जरा सारवून सुरवून निर्मळ केलें, भिंतींना पिवळ्या मातीचा रंग दिला कीं नवें बांधल्यासारखें दिसायचें.

पण आमच्या घरांत रहाण्याचें भाग्य कांहीं आम्हांला कधीं लाभलें नाहीं. आमचे वडील शिकलेले. म्हणून त्यांनीं नोकरी धरली शहरांत. आणि आमच्या काकांना शेती आणि घर मिळालें. म्हणजे सगळें होतें दोघांच्या नांवावर. पण काकांना शेतीकडे घातलें. अर्थात् घर आपो-आपच त्यांना मिळालें. माझ्या वडिलांचें जसें लग्नकार्य झालें तसेंच काकांचेंहि झालें. माझ्या वडिलांना जशी मुलें झालीं तशीं काकांनाहि झालीं. पण आम्हीं तीनच भावंडें. आमचीं चुलत भावंडें मात्र अकरा होतीं. आमचे वडील आमचा प्रपंच मोठा दुर्कीनें चालवीत होते. त्यांनी कधीं आम्हांला कमी पडूं दिले नाहीं. नोकरी करून शिवाय ते कुठें चहासाबण वीक, कुठें फर्निचर करून वीक असें बारीकसारीक कांहींतरी उद्योग करायचे. उद्योगी होते. हरहुन्नरी होते. कोणतेंहि काम त्यांना चटकन येत असे. कोणतेंहि काम करायची त्यांना लाज वाटत नसे. त्यामुळें पैसा चांगला मिळवित होते.

पण आमच्या काकांचे अगदीं उलट होते. उद्योग कसा तो त्यांना माहितच नव्हता. आधीं उठायचे उशीरां. मग सावकाश अंग खाजवतील, तंबाकू मळतील, तासभर चहा पीत बसतील. केव्हां तरी दांत घासायचे आणि केव्हां तरी आंघोळ करायची ! चापून झोप काढायची. दाबून गप्पा छाटायच्या आणि यांतून वेळ मिळेल तेव्हां शेती आणि जमीन ! ती सुद्धां करायची म्हणजे काय, तर उंटावरून शेळ्या हाकायच्या ! ओठावरचे जांभूळ आंत सार म्हणणारे आमचे काका ! स्वतः कधीं शेतावर गेले नाहींत. प्रथम त्यांनीं हाताखालीं माणसें ठेवून जमीन केली. अर्थात् शेतांत कांहीं उगवलें नाहीं. पुढल्या वर्षी कुळांना

नानांचा जमाखर्च इतरांपेक्षां वेगळाच—'
सांगतां येत नाहीं आणि समजावून देतां येत
नाहीं असा !—
सांगायला गेलं तर आंतवट्टा उघडा पडतो. पण
जमा असते वेगळीच —

सौ. वसुंधरा पटवर्धन

देऊन केली तर म्हणे मळ्याची चोरी झाली. त्यानंतर एकदां स्वतः केली. म्हणजे काय, कीं कांहीं केलं नाहीं. कागदपत्रांचा हा भारा काकांच्या जवळ होता. पण कशाचा कागद आणि त्यात काय लिहिलें आहे हें कधीं त्यांनी वाचून पाहिलें नाहीं. त्याची नेहमीं खेंकटीं व्हायची. आणि ती तशीच भिजत पडायची. त्यांचा तात अगदीं गळ्याला लागला कीं काकांची धावाधाव सुरूं व्हायची. माझ्या वडिलांना मग पत्रावर पत्रे. तारावर तारा. आपण स्वतःसुद्धां येऊन हजर व्हायचे. कर्जाचें तर विचारूंच नका. मला वाटते, कर्ज करण्यांत आमच्या काकांच्याइतका जबरदस्त माणूस संबंध दुनियेंत नसेल. प्रत्येक दुकानावर त्यांचें खातें होतें. आणि प्रत्येक दुकानावर त्यांचें कर्ज होतें. एवढी शेती असून काका सगळें बाहेरून विकत आणीत. आम्हांला तर त्यांनी कधीं मूठभर जोंधळा पाठवला नाहीं, कीं कधीं उसाचें कांडें धाडलें नाही. ते कर्ज करायचे. आणि आमचे वडील तें फेडायचे. काकांचा जन्म होता कर्ज करण्याचा आणि आमच्या वडिलांचा होता तें फेडण्याचा ! त्यांतून काकांची अकरा मुलें. त्यांची दुखणीबाणी. त्यांचा कपडालत्ता. सगळे आमचे वडील पुरवायचे. तरी "पुरत नाहीं" म्हणून कार्डं यायचेंच. कितीवेळां आमच्या काकांनी जमीन गहाण टाकली आणि माझ्या वडिलांनी सोडवून आणली त्याला पत्ताच नाहीं. एकदां तर काकांना दिवाळें काढायची वेळ आली. तेव्हां जामीन राहून आमच्या वडिलांनी त्यांना सोडवलें. उपद्व्याप करावेत हें काकांचें काम आणि ते निस्तरावेत हें वडिलांचें काम ! माझी आई नेहमीं म्हणायची कीं "रहातात आमच्याजवळ म्हणून आमचे म्हणायचें. बाकी संसार करतात आपल्या भावाचा."

आणि माझी काकू अगदीं काकांना शोभेशीच होती. ती त्यांच्याहिपेक्षां थुंड होती. तिने स्वतः कधीं आंघोळ केली आहे असें वाटलें नाहीं. मुलाबाळांच्या आंघोळी झाल्या तरी वहावा, न झाल्या तरी वहावा अशी स्थितप्रज्ञ होती. जेमतेम स्वैपाक करायची. आणि जेवली कीं आडवी व्हायची. घरांत जागजागीं केरांचे पुंजके साठलेले असायचे. मग अंगणाला केरसुणी कुठून लागणार ? लेकांत गहून शिवार रानांत राहिल्याचें सुख हीं मंडळी उपभोगत होती.

असा सगळा काकांच्या संसाराचा आनंद होता. पण आमचे काका मात्र खरेंच आनंदांत होते. जीवाची लगबग आणि अंतः-करणाची कालवाकालव, या वस्तु त्या नवरा-बायकोंना मुळीं माहीतच नव्हत्या. त्यांना एक टाऊक होतें, कीं काय वाटेल तें झालें, तरी आपला भाऊ कांहीं आपल्याला सोडणार नाहीं. आपली सगळी घाण तो जरूर निस्तरेल. त्यामुळें नवराबायकोंचा निवांत गारवा होता.

पण आतां मला समजूं लागलें होतें. आमची आईहि मला म्हणायची, "केशव, अरे हें चाललंय तरी काय ? तुझ्या काकांचं असं किती दिवस निस्तरायचं ? वह्या काढ आणि हिशोब कर पाहूं कीं आजपर्यंत काका, काकू आणि त्यांचीं मुलं यांच्यापायीं किती पैसा गेला ?"

मलाहि वाटलें, कीं आईचें म्हणणें खरें आहे. मी वह्या तपासल्या. मला असें आढळून आलें, कीं आपल्या डोक्यावरून पाणी गेलें आहे. आजपर्यंत आमच्या निढळाच्या घामाचा पैसा नुसता पाण्यासारखा ओतला गेला होता. तो पैसा जर आमच्यासाठीं खर्च झाला असता तर मी आतांपर्यंत विलायतेला जाऊन आलों असतों. आमच्या वडिलांना काय म्हणावें तेंच मला कळेना. मी म्हणालों, "आई, बाबांनीं एवढा पैसा त्यांना दिला तरी कसा ?"

"बाबारे, ही तुझ्या वडिलांची दया ! हें भावाचं प्रेम ! मला तर कधीं कधीं वाटतं, कीं तुझ्या वडिलांना सगळं कांहीं समजतं पण एवढ्या बाबतींत ते अज्ञानी आहेत. भाऊ आणि त्याचा संसार म्हटला कीं त्यांचं भान हरपतं. आपल्याला देतांना हिशोब करतील. शिल्लक टाकली पाहिजे म्हणतील. सतरा बयादी सांगतील. पण टाकलेली शिल्लक कोणाच्या पायीं ओततील म्हणतोस ? तर भावाच्या ! धाकटा भाऊ. त्यांतून नकटा. कर्तृत्वाच्या नांवानं शून्य ! पण त्यांना जसा कांहीं तो वडील भाऊ वाटतो. त्याचा शब्द मोडत नाहींत. त्याला एका शब्दानं बोलत नाहींत, कीं असं कां म्हणूनसुद्धां विचारीत नाहींत ?"

"कां ?"

"तें तूं त्यांना विचार. मला विचारूं नकोस. माझा कपाळशूळ उठतो."

मी लगेच वडिलांकडे गेलो. वडील हिशोबाच्या वह्या घेऊन बसले होते. त्यांच्यासमोर नेहमीं हिशोबाच्या वह्या असतात. कसली एवढी आकडेमोड करतात कोण जाणें ! आकडेमोड करून करून आमच्या काकांपायीं आमच्या वडिलांची मानमोड व्हायची वेळ आली. शिवाय हिशोब लागत नव्हता तो वेगळाच. किती मिळविले आणि किती खर्च झाले ते या वह्यांवरून जरी कळत असले तरी होता सगळा खर्चच ! जमा कांहींच नव्हती. मग ह्या वह्यांचा उपयोग काय ? आपल्याजवळ कांहीं शिल्लक नाहीं हें काय त्या वह्यांशिवाय कळत नाहीं ? मी बाबांना म्हणालो, "बाबा, कशाला एवढा हिशोब करतां ?"

" कां रे बाबा ? ' बाबा वर न पहातांच चार सक चोवीस करीत आणि आंकडा मांडीत म्हणाले.

" मी म्हणतो, या वह्यांचा उपयोग काय ? "

" उपयोग ? " अजूनसुद्धां बाबांचें लक्ष माझ्याकडे पुरतें गेलें नव्हतें.

" मी म्हणतो, या वह्या तुम्ही नदींत फेकून द्या."

" कां रे बाबा ? " पुन्हां तेंच उत्तर. म्हणजे तोच प्रश्न.

" मला असं वाटतं म्हणून."

" काय वाटतं ? " बाबांनीं शेवटचा आंकडा लिहून वही मिटत म्हटलें. आतां कुठें आरशीच्या खालून त्यांनी वर माझ्याकडे पाहिलें. हातानें जागा दाखवीत बाबा म्हणाले, " बैस. बैस. असा आर्धी नीट समोर बैस. आणि मग विचार काय तें."

नाईलाजानें मी बसलो. वास्तविक उभ्यानेंच फाडफाड बोलावें आणि तरातरा निघून जावें अशा अवसानांत मीं आलों होतो. पण आमचे बाबा इतक्या शांतपणानें मला "बैस" म्हणाले कीं मी निम्मा थंड झालो. आणि मुकाट्यानें बसलो. तरी पण आंत पेटलेलं होते. "हं ! काय म्हणतोस ? " दौतीचं झाकण लावीत बाबा म्हणाले. बाबांची सगळी हयात शहरांत गेली. पण त्यांनी कधीं पेन आणलं नाहीं. ते आपले टाकानें लिहीत. मोडींत. सुंदर, वळणदार अक्षरांत. टिपकागदसुद्धां ते अलिकडे वापरूं लागले होते. नाहीं तर ते आपले वाळू टाकीत. मला त्यांचा हा साधेपणा आणि काटकसर दोन्ही जाणवली. आणि उसळीसरशी मी म्हणालो " ह्या ज्या हिशोबाच्या वह्या आहेत ना बाबा, त्या सगळ्या चुलींत घालून टाका एक दिवस. "

" कां रे केशा ? " बाबा हंसून म्हणाले.

" उपयोग काय त्यांचा ? " माझा सूर चढला होता.

" अरे वेड्या, हिशोब असायला हवा जवळ. आपण कुठें आहोंत तें कळतं. "

" मग कुठें आहोंत सध्यां ? "

" तें वाचून पहा म्हणजे कळेल. "

" वाचल्या मी वह्या. "

" मग काय कळलं ? " बाबा अजूनहि शांतच होते.

" काय कळायचं ? वर्षन् वर्षं आपण आहोंत तिथंच आहोंत. पुष्कळ पीठ दळलं. पण आंधळं दळतं आणि कुत्रं खाऊन जातं. पाणी भरून उपयोग काय बाबा ? पिंपाला सगळीकडून गळती लागली आहे तर भरायचंच कशाला ? "

" अरे बाबा, तें पिंप आपलं आहे म्हणून. "

" पण मी म्हणतो, दुसऱ्या पिंपांत कां भरूं नये ? "

" दुसरं आपलं नाहीं म्हणून. "

" म्हणजे जें गळकं तें आपलं. आणि धडकं तें आपलं नाहीं. "

" असं नाहीं केशव; " बाबा थोडे गंभीर होऊन म्हणाले, " जें गळतं तें आपलं असं नाहीं. जें आपलं आहे तें जरी गळकं असलं, तरी तें आपलंच. आपलंच म्हणून भरायचं. "

---

( पान ८४ वरून चालू )

आणि मग यामाकाटांचें तोंड उघडतें, त्यांतून शब्द बाहेर पडतात आणि हें विचित्र वातावरण मोडतें. यामाकाटा मला सांगत असतात. असें गिऱ्हाइकाशीं खेटून बसून फोटोला बसणें हें या मुलींच्या वागणुकींत बसत नाहीं. या मुलींनीं गिऱ्हाइकांशीं कसें वागायचें अन् कसें वागायचें नाहीं याबद्दल कांहीं संकेत आहेत. या संकेतांत जें जें बसतें तें तें या मुली अगदीं जिव्हाळ्यानें पार पाडतील. तें पार पाडतांना त्यांत आपलें सारें अंतरंग ओततील. सर्वस्व वेंचतील. पण कांहीं झालें तरी या संकेतांच्या पलीकडे जाणार नाहींत. या तुझ्या मुलीला फुकुझावांच्या इच्छेला नकार देतांना अतिशय यातना होत आहेत. पण तिचा इलाज नाहीं. तुझा अपमान करण्याची लवमात्र बुद्धि त्यांत नाहीं.

यामाकाटांच्या खुलाशानें माझा जीव भांड्यांत पडतो. तिच्या वर्तनाची उमज पडते. प्लमब्लॉसमनें जें स्नेहाचें वातावरण निर्माण केलें होतें तें खरें होतें हें ध्यानांत येतें आणि विलक्षण आनंद वाटतो. तें संकेतांतल्या चवकटींतलें असेल, पण याला खोटेपणाचा स्पर्श नसतो ही जाणीव मन समाधानानें भरून टाकतें. आणि मी, ही फोटोची कल्पना सोडून द्या असें फुकुझावांना सांगण्याचा विचार करतों. मी त्यांना तसें सांगणार इतक्यांत ' चिवार ' खोलींत प्रवेश करते, आणि खोलींतलें तंग वातावरण तिच्या लगेच ध्यानांत येतें. ती काय झालें म्हणून विचारते, आणि फुकुझावांनीं वस्तुस्थिति सांगितल्याबरोबर ती मोठ्यानें हंसते नि म्हणते, " हात्तिच्या, ती बसत नसेल तर मी बसते " तिच्या या जपानी उद्गारांचा अर्थ माझ्या ध्यानांत येतो न येतो तोंच ती माझ्या शेजारीं येऊन बसते, मला घट्ट मिठी मारते आणि म्हणते, ' हं काढा—हवे तितके फोटो काढा. ' तिच्या आविर्भावानें मी गार होतों. पण फुकुझावा लगेच क्यामेरा सरसावतात.

मी पार ओशाळतों—तिनें अशी चमत्कारिक मिठी मारली म्हणून आणि अधिक म्हणजे ही मिठी खोटी होती म्हणून. या मिठींत जिव्हाळा नसतो, स्नेह नसतो, आपलेपणा नसतो. नुसताच शिष्टपणा असतो. संकेतांना आपण जुमानीत नाहीं असें दाखविण्याचा दिमाख असतो. हा दिमाखच मला बोंचतो. ही संकेतांना जुमानीत नाहीं—म्हणजे कांहींहि करण्याची हिंची तयारी आहे. तिनें कित्येक गिऱ्हाइकांना अशा मिठ्या मारल्या असतील आणि त्या मिठ्यांना हवा तो अर्थ असेल. या जाणिवेनें मी अस्वस्थ होतों. फुकुझावांचें फोटो घेणें संपण्यापूर्वीच मी उठतों. आणखी एक स्नॅप घेण्याचा त्यांचा इरादा असेल, पण तेहि क्यामेरा आवरतात.

आम्ही निघतों. आमच्या तीनहि मुली आम्हाला पोंचवायला येतात. पण प्लमब्लॉसम मागें मागें असते. एकदोनदां मी टॅक्सीचा दरवाजा उघडतों तेव्हां चिवार आणि ती दुसरी मुलगी, दोघी आम्हाला मोटमोठ्यानें निरोप देतात--' आरिगातो, आरिगातो, आरिगातो गोझाय् मास्ता ' पण प्लमब्लॉसमचा आवाज फारसा फुटत नाहीं. ती अजून मागेंमागेंच असते--पण आमची टॅक्सी निघते तेव्हां माझ्याकडे ज्या नजरेनें पाहाते--

ती नजर मला अद्याप दिसते आहे !

• • •

" त्याला डाग कां नाहीं लागला ? "

" लागला. पण कांहीं कांहीं पिंपं अशी असतात पोरा, कीं त्यांना डाग कांहीं लागत नाहीं. गळक्या पिंपांत पाणी भरायचा आपला योग आहे असं समजायचं आणि भरायचं. "

" पण कशाला ? "

" अरे ? तूं तर अगदीं थेट आपल्या आईसारखंच बोलायला लागलास. तिची समजूत घालतां घालतां जन्म गेला माझा. पण तिची कांहीं समजूत पटली नाहीं. तूंहि तसाच. तिच्याच वळणावर तुझी समजूत कुठं घालूं आतां ? "

" नुसती समजूत घातलीत. पण केलंत आपल्याच मनासारखं. "

" तसंच करायचं असतं. "

" त्यानं साधलं काय ? " मीं विचारलें.

" तें माझं मला माहीत. सांगतां येत नाहीं असा एक जमाखर्च असतो केशव ! सांगतां नाहीं येत. सांगायला गेलों तर आंतबट्टा उघडा पडतो. पण जमा असते वेगळीच. पटली तर आपल्यालाच पटते. समजावून देतां येत नाहींत अशा ज्या कांहीं गोष्टी असतात त्यापैकीं हा जमाखर्च आहे. "

मी थोडा वेळ गप्प बसलो. माझ्या मनांत एक विचार आला होता. बोलूं कीं नको असें वाटत होतें. बोलण्यासाटीं ओठ हलत होते. पण शब्द उमटला नाहीं. बाबांनी तें ओळखलें. ते हसले. म्हणाले, " माझ्या लहानपणची मला आठवण आली. मीहि माझ्या वडिलांच्याजवळ असाच बसायचा. असाच बोलायचा. तेव्हांहि माझ्या वडिलांच्या मतांत आणि माझ्या मतांत असंच अंतर पडायचं. पण तें तेव्हां मला कळत नव्हतं. मला वाटायचं कीं वडिल चुकतात. "

" मलासुद्धां असंच वाटतंय बाबा. रागाऊं नका. तुमच्यासारखे वडील कुठं मिळायचे नाहींत. तरीसुद्धां काकांच्याबाबत मला वाटतं कीं तुमचं धोरण चुकलंच ! "

" धोरण नव्हतंच मुळीं तें. "

" धोरण नसेल. पण व्यवहार चुकला. "

" मी काय म्हणतोय तें कळत नाहीं तुला केशव. धोरण आणि व्यवहार कांहीं वेगळा नाहीं. व्यवहार असला कीं धोरण आपोआपच येतं. पण मीं जें कांहीं केलं तो व्यवहार नव्हता. धोरण नव्हतं. "

" भोळेपणा होता. " मी जरा अधिकारानें पण मला वाटलें तें खरेंखुरें बोललो.

" तसं म्हण. माझं कांहीं म्हणणं नाहीं. "

" पण माझं म्हणणं असं आहे बाबा, कीं आतां तें सगळं मी पहाणार. "

" म्हणजे काय करणार ? "

" आपल्या वाटणीचं जें कांहीं उत्पन्न असेल तें मी मागणार. "

बाबा क्षणभर गप्प झाले. मग म्हणाले, " बरं. माग. "

आणि ते उठलेच. मीहि उठलो. थोडा तुटकपणा झाला कीं काय असें मला वाटलें. पण आईची आठवण झाली. तिला जरा बरें वाटेल असें मला वाटलें. आणि मी धांवतच आईकडे गेलों. मी जेव्हां तिला सगळें सांगितलें तेव्हां तिनें डोक्याला बांधलेले फडके सोडून टाकले. ती म्हणाली, " बरं झालं. तूं तरी आतां भोळेपणा करूं नकोस. मायापाशांत गुरफटूं नकोस. "

लगेच मी पत्र लिहायला बसलों. पुष्कळ विचार केला आणि काकांना लिहून टाकलें कीं " आत्तांपर्यंत झालें तें झालें. आजपर्यंत आमच्या वडिलांनी तुमचे पुष्कळ निस्तारले. पण इथून पुढें आतां सगळें मी पहाणार आहे. या वर्षीं जें उत्पन्न येईल त्यांतलें अर्धें इकडे पाठवून द्यावें. धान्य तरी. नाहीं तर पैसा ! "

आठ दिवस गेले. पंधरा दिवस गेले. महिना गेला. तरी काकांचे उत्तर आलें नाहीं. आई म्हणाली, " ते तसलेच आहेत. एक पत्र लिहायला त्यांना बारा वर्षे लागतात. तंबाकू कोण मळेल ? "

मीं दुसरें पत्र लिहिलें.

त्यालाहि अर्थातच उत्तर आलें नाहीं.

आठ दिवसांनीं मी तिसरें लिहिलें. चार दिवसांनी चौथें लिहिलें. आणि मग मात्र पत्र न लिहितां मी स्वतःच गेलो.

गेलों तर काका पडवींत तंबाखू खात होते. गुळण्या टाकत होते. कोण येईल जाईल त्याच्याशीं बोलत होते. मला पहातांच त्यांना एकदम आनंद झाला. " ये ये " म्हणत ते बसल्या बसल्याच हलले.



तंबाखू सगळीच थुंकून टाकत ते म्हणाले, " अग ए, ऐकलंस का ? कोण आलेय पाहिलंस कां ? "

आमच्या काकू थंडपणानें बाहेर आल्या. त्यांनी उभें लावून घेतलें होतें. मला कसें तरीच झालें. आमची आई असें कधींच करायची नाहीं. तरी पण रीत म्हणून मी काका काकूंना वाकून नमस्कार केला. " शतायुषी भव ! भाग्यवान् व्हा. कीर्तीमान व्हा " असा भरगच्च आशिर्वाद काकांनी दिला. मी जरा घुश्यातच होतो. मी म्हणालो, " काका, माझी पत्रं मिळाली कीं नाहीं ? "

" हो, मिळाली कीं, किती आली ग पत्रं याची ? " काकांनी काकूला विचारलें.

" आली मला वाटतं बरीच. " काकू उत्तरल्या. माझ्यापुढं त्यांनी चहा ठेवला.

" मग उत्तर नाहीं पाठवलंत ? "

" उत्तर काय पाठवायचं ? "

" मी एवढं लिहिलं होतं तर उत्तर नको पाठवायला ? " काकांच्या अकर्तृत्वामुळें व बाबांच्या कर्तृत्वामुळें मला आपोआपच मोठेपणा प्राप्त झाला होता.

" अरे पण लिहायचं काय तुला ? सगळं तुमचंच आहे. घेऊन जा. त्यांत विचारायचं काय आणि सांगायचं काय ? "

" काय घेऊन जाऊं ? "

" काय लागेल तें घेऊन जा. आतां मागल्या वर्षीच्या उत्पन्नाचं तर कांहीं विचारूंच नकोस. पहिलंच कर्ज फिटायचं आहे माझं. पण आतां यंदा असं जोरदार पीक येईल कीं नाहीं ? नुसता पहात रहा. पहात रहा आणि घेऊन जा. मुला, सगळा मळा तुझाच आहे बरं. तुझा बाप आणि मी कांहीं दोन नाहीं. आजपर्यंत तो असाच वागत आला. आणि मी सुद्धां. होय कीं नाहीं ग ? "

" मम " म्हणावें तसें काकू " होय " म्हणाल्या. मी अधिक कांहीं बोललों नाहीं. काय बोलणार ? विचार केला कीं जेव्हां मळा पिकेल तेव्हां पाहून घेऊं.

दुपारीं काकूनें जेवायला वाढलें. घसघशीत वाढलें. जें कांहीं भाकरी पिठलें होतें तें सढळ हातानें वाढलें. संध्याकाळीं काकानें मला मळा दाखवला. जो कधींच बाहेर पडून हिंडायचा नाहीं, विशेषतः जो शेतीकडे सहसा पहायचाच नाहीं तोच काका मुद्दाम माझ्यासाठीं हिंडला. फिरला. ही जमीन आपली म्हणून त्यानें दाखवली.

मीहि जरा हरखून गेलो. किती केलें तरी माझा काका होता. परत निघताना मी काकांच्या अकरा पोरांच्या हातावर अकरा पावल्या ठेवल्या. म्हटलें असूं दे खाऊ आपल्या भावंडांना. काकानेहि बजावले, " येत जा. रहात जा. उत्पन्न न्यायलाच केवळ येऊं नकोस. नुसतासुद्धां येत जा. "

मी " बरं " म्हणालो. गाडींत बसलों. निघताना मला जरा हेंच झालें.

" घरीं आल्यावर आईला सांगितलें. " काम फत्ते ! पुढच्या वर्षी अर्धा वाटा आपला. जोंधळा आणूं नकोस विकत. "

" कशावरून ? " आईनेंहि उत्साहानें विचारलें.

" मी सांगतो त्यावरून ! काका काकू अशी वागली आहेत म्हणतेस प्रेमानं. "

" प्रेमानं ? " आईचा चेहरा पडला. सूर खोल गेला. मग एकदम उसळून ती म्हणाली, " हाच तो शब्द. यानंच घात झाला आपला. तो शब्द तूं उच्चारूं नकोस केशव ! तें प्रेम खरं नाहीं. "

मी एकदम गंभीर झालो. कांहीं बोललोंच नाहीं. मळा पिकेपर्यंत वाट पहायची असें ठरवलें. माझ्या चुलत भावंडांना खाऊ दिला हें मीं आईला सांगितलेंच नाहीं.

पण बाबांना जेव्हां हकीकत सांगताना सांगून गेलो कीं अकरा पावल्या दिल्या, तेव्हां ते हसले. बोलले नाहींत, माझी आई तिथें आहे कीं काय हें त्यांनी पाहून घेतलें. आणि म्हणाले,

" मला वाटलं होतं तूं आपल्या आईच्या वळणावर आहेस. पण आत्तां वाटतंय कीं तू माझंसुद्धां वळण घेतलं आहेस. "

" कसलं वळण बाबा ? "

" हेंच. ! ! ज्याचं त्याला तें नाहीं वळत. ठीक आहे. ठीक आहे " करीत बाबा बाहेर जायला निघाले.

इतक्यांत जरी मला काकांकडे जायचं नव्हतें तरी मी मधून मधून पत्र पाठवीत होतो. हेतु हा कीं आपला संबंध असावा. एकाएकीं उत्पन्नाच्या वेळीं उठून येतो असें वाटूं नये. जें गोडीनें होते ते कडूपणानें कशाला ?

आईला अर्थात् हें पसंत नव्हतें.—पण मग मी आईला सांगायचंच सोडून दिले.

मग जेव्हां जायची वेळ आली तेव्हां मी स्वतःच घरीं गेलों. पण पहातों तों काय ? काकांनी यंदा कांहींच केलें नव्हतें. स्वतःहि केलें नाहीं. कीं कुळाकडूनहि करून घेतलें नाहीं. मी म्हणालो, " हें काय काका ? शेत अगदीं रिकामंच आहे ? "

" रिकामंच असणार मुला. " काका उत्तरले. मला त्यांच्या या " मुला " शब्दाचा राग आला. विटकराच्या टोल्यानें शेकत शेकत ते म्हणाले. " गेले कांहीं दिवस पाट धरलीय. कांहीं सुचूं देत नाहीं. जरा हलूं देत नाहीं. मी कसला जातो शेतमळ्यावर ? "

" मग कुळांना द्यायची जमीन. "

" दिली असती रे. पण तुझा बाप म्हणतो, कुळांना देऊनसुद्धां कांहीं उपयोग नाहीं. कुळं बुडवतात तुला. "

" म्हणून तुम्ही आम्हांला बुडवलंत ? "

टोला उलटापालटा करीत काका म्हणाले, " मी कुठून बुडवूं तुम्हांला ? मला ताकद कुठें आहे तेवढी ? एखाद्याला उचलून नदींत बुडवायचा म्हणजे त्याला तशीच ताकद लागते. मीच इथें आकंठ रुतून बसलो आहे गाळांत. गाळांतून वर आलों तर नदींत बुडतों. नदींतून वर आलों तर गाळांत रुततो अशी माझी अवस्था आली आहे. मी कसा रे बुडवणार तुम्हांला केशवा ? "

" तुमची ताकद फार मोठी आहे काका. " मी फणफणत म्हणालो, " अंगांत ताकद नसतानासुद्धां तुम्हीं आम्हांला बुडवलंत.

## *संगत~*

*— शान्ता ज. शेळके*



[ सुनीत : शार्दूलविक्रीडित ]

होतें शैशव मुग्ध विश्व अवघें तेव्हां गमे अद्‌भुत
पानांतून फुलांतुनी उमलुनी येती कहाण्या नव्या
रंगांचे ढग, पांखरें, तृणदलें सारेंच वाटे नवें
तेव्हां तूंच करीं धरून मजला सौंदर्य तें दाविलें.

येतां यौवन खोल गूढ उठली प्राणांतुनी वेदना
ध्येयाचीं क्षितिजावरीं नवनवीं स्वप्नें तदा पाहिलीं
प्रीतीची कळ गोड दुस्सह किती तीहीं सुखें साहिली
एकान्तांतिल मूक अश्रु पुसुनी तूं धीर जेव्हां दिला.

आतां चंचलता न ती, न उरली ती ओढ वेडी मनीं
ध्येयाचेंहि विरून इंद्रधनु ये अंधारलेली निशा
दृष्टीला भिडवून दृष्टि पुढतीं आहे उभें वास्तव
तूं माते समजावितां करितसे त्याचाहि स्वीकार मी

आहे जन्मभरी अशी मज तुझी ही लाभली संगत
तूं आहेस परंतु कोण ? असशी माझेंच वा संचित ?












अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

जन्मभर बुडवलंत. बाबांचा सगळा जन्म तुमचा संसार वर काढून ओढण्यांत गेला. किती ओढलं तरी तुम्हीं आडांतच. तुमच्याबरोबर आम्हीं. आमच्या बाबांनी नाहीं विचार केला. पण तुम्हीं तरी विचार करायचा होतात काका, कीं आपल्या भावालाहि तीन मुलं आहेत ?"

"मुलांचं काय घेऊन बसलास बाळा ?" विटकर बाजूला ठेवून जेमतेम कुशीवर वळत ते म्हणाले, "तुझा बाबा मोठा भाग्यवान्. तीन मुलांतच संसाराचा पसारा आवरलात. पण माझीं अकरा आहेत. मोजून अकरा ! जिथें अकरांचं होतं तिथं तिघांचं नाहीं होणार ?"

"अकरांचं तरी कोणी केलं ? बाबानीच ना ?"

"होय रे मुला, तुझ्या बाबानीच बरं. पण माझा कोणीच नाहीं कां तो ? तुझा बाबा होण्यापूर्वी तो माझा भाऊ होता. अजून आहे. पुढेंहि राहील."

"याच भरंवशावर तुम्ही जमीन ओस टाकलीत ?"

काका थोडा वेळ गप्प राहिले. मग म्हणाले, "भरंवसा लागतोच कोणाचा तरी."

"पण तुमचा नाहीं आम्हांला वाटत." मी म्हणालो.

"तो योग असतो एकेकाचा. अग, याला चहा दे बरं."

"मला नको आहे चहा."

"रागाऊं नकोस. रागाऊं नकोस मुला. हें असं चालायचंच. भांडावं पण तोडूं नये. एकमेकांना शिव्या द्याव्यात; पण भाऊबंदकी करूं नये."

"तुम्हीच भाऊबंदकी केलीत. आपल्या भावाचं सगळं घेतलंत. त्याला कांहीं दिलं नाहींत. सगळं उत्पन्न तुम्ही खाल्लंत काका. भाऊबंदकी तुम्हीच केलीत."

"याला नाहीं भाऊबंदकी म्हणत केशव. याला म्हणतात प्राक्तन. पण प्राक्तन कांहीं असलं तरी खाणंपिणं सोडायचं नाहीं. चहा दिला तर घ्यावा. जेवायला वाढलं तर जेवावं. जेवण सोडलं तर त्याला म्हणतात भाऊबंदकी. माझ्या पंक्तीला तूं जेवलं पाहिजेस."

"मला भूक नाहीं" मी कुरकुरत म्हणालों.

"आधीं चहा पी. मग जेवणाच्या गोष्टी बोल. मी, तुझा काका सांगतोय केशव. तो चहा पी आधीं. उचल कप. मग वाटलं तर तो कप फेकून मार काकाला. पण समोर आलेला चहा डावलूं नकोस."

मी कप उचलला आणि कसातरी संपवला. ही काय बळजबरी ?

"आतां बोल. दे शिव्या." काका म्हणाले.

"शिव्या द्यायला आलों नाहीं मी. आमच्या आईनं शिव्या द्यायला शिकवलं नाहीं आम्हांला."

"शिव्या द्यायलासुद्धां शिकवावं लागतं कां रे ? आमची हीं अकराच्या अकरा पोरं शिव्या देण्यांत मोठी तरबेज आहेत."

"इश्श ! उगीच काय कांहीं तरीच बोलायचं ? धाकटा मुलगा आहे केवढा ! अजून मुईंतून वर आला नाहीं. आणि तो म्हणे शिव्या देण्यांत पटाईत !" काकू एकदम वाचा फुटल्याप्रमाणें म्हणाल्या.

"अग होईल. शिव्या शिव्या म्हणजे तूं काय समजलीस ? काय मोठी वकीलीची परीक्षा आहे ? पण मुद्दा हा आहे केशव, कीं शिव्या देऊन भाऊबंदकी नाहीं होत. शिव्या देऊन उलट प्रेम वाढतं. ज्याच्यावर प्रेम असतं, त्यालाच आपण शिव्या देतो. ज्याच्यावर प्रेम नसतं, त्याच्यासाठीं एवढा शीण कोण घेतो ? तर तूं दे शिव्या. काय समजलास ? शिव्या दे. पण चहापाणी आणि जेवणखाण इथेंच माझ्या पंगतीला झालं पाहिजे. मग काय तुला भांडायचं असेल तें भांड."

" भांडायचं कशाबद्दल काका ? " मी उपरोधानं विचारलं.

पण तो उपरोध काकांनीं मुळींच मनावर घेतला नाहीं. ते म्हणाले, " तें आपलं तुझं तूं बघ."

" काय बघणार कपाळ ? " मी रागावलों, " इथं बघायला ठेवलंय काय तुम्ही ? "

" तो योगायोग ! "

" तो योगायोग ! पण ते योगायोग आतां विसरा काका. बाबांना तुमचे हे योगायोग चालले. पण मला नाहीं चालायचे. तुमच्या पायीं आमचा किती तोटा झाला, त्याचा एकदां जमाखर्च करून बघा."

" तें सगळं तुझ्या बाबाकडे दिलं आहे. आपल्याकडे कांहीं नाहीं. जेव्हां पहावं तेव्हां तो आपला हिशोब लिहीत असतो. कशाचे एवढे हिशोब लिहितो देव जाणें ! "

" देव कशाला ? मी जाणतों. आत्तांपर्यंत तुमच्यावर आमचा एवढा पैसा खर्च झाला आहे काका, कीं तेवढ्या पैशांत आम्हीं सगळीं एकदां विलायतेला जाऊन आलो असतो. तुम्ही इथून आम्हांला कधीं पळाभर जोंधळा नाहीं पाठवला, कीं हातभर उसाचं कांडं ! "

" तें आम्हीं सुद्धां नाहीं खाल्लं. " काकू म्हणाली.

" मग तुम्ही केलंत तरी काय काका ? एवढा जन्म घालवलांत तरी कसा ? " मी हातावर मूठ आपटीत म्हणालों.

" तुम्हां अलीकडच्या मुलांचं चुकतं असं मी म्हणतो तें कांहीं खोटं नाहीं. " काका थंडपणानेंच म्हणाले " अरे बाबा, जन्म घालवणारा मी कोण ? आणि घालवायचं म्हणजे काय करायचं ? तो जातच असतो. जो जन्माला येतो, त्याचा जन्म आपोआपच, कसा ना कसा जातच असतो. "

काकांचें पुराण चाललेंच होतें. मी ऐकत होतो आणि विचार करीत होतो कीं हें कांहीं खरें नाहीं. हें असे खेटे घालून काम होणार नाहीं. धान्याचा एक दाणा मिळणार नाहीं कीं एक छदाम दिसणार नाहीं. काका नुसते बोलत रहाणार. मी म्हणालो, " तें जाऊं दे. तुमचं उत्पन्न येऊं दे नाहीं तर जाऊं दे. तुम्ही जमीन करा किंवा नका करूं. उत्पन्नाचा अर्धा वाटा मला पाहिजे. "

" मी कुठें नाहीं म्हणतोय ? घेऊन जा. अर्धे उत्पन्न तुमचं आहे हें कांहीं तूं मला सांगायला नकोस. तें आमच्या बापजाद्यांपासूनच चालत आलं आहे. "

" मग द्या आमचा वाटा. "

" द्यायला माझी ना नाहीं हें मीं तुला सांगितलंच. पण देऊं काय मुला ? इथें तुला कांहीं दिसतंय कां ? ही दोन ज्वारीची पोतीं आहेत. तीं आम्हांलाच पुरणार नाहींत. वाटलं तर त्यांतलं एक घेऊन जा. "

" एका पोत्यानं काय होणार ? "

" तेंच म्हणतो मी. माझं ऐक केशव. हें सगळं आहे तुमचंच. पण यंदा कांहीं पीक आलं नाहीं. आतां मी तुला सांगतो. शिमग्याला कपाशीचं उत्पन्न येईल. मिरचीचं येईल. गवताचं येईल. त्याचे नाहीं म्हटलं तरी सात आठशे रुपये येतात. निम्मे तुझे. निम्मे माझे. काय ? "

मी विचारांत पडलों. हें तरी खरें कशावरून ? मला होय-म्हणवेना. नाहीं म्हणवेना. पण काकाच म्हणाले, " बरोबर आहे तुझं. पण यावेळीं पहा. कधीं नाहीं तरी यावेळीं मी जातीनं करणार आहे. पहा तर खरं. नाहीं तरी तूं करणार काय ? "

मी कांहींतरी करणार होतो. पण बोललो नाहीं. म्हटलें एक वेळ संधी देऊन पहावी. कारण जें करायचें माझ्या मनांत होतें तें अगदींच साधें नव्हतें. तरीपण काकांना दम भरला. " हें पहा काका, ही शेवटची वेळ. यापुढें जें कांहीं करायचं तें इतकं सौम्य असणार नाहीं. विचार करून ठेवा. "

काका हंसले. अगदीं निर्भयपणें हंसले. अगदीं गळ्याशीं आलें तरी या माणसाला कांहींच कसें वाटत नाहीं ?

मी काकांच्या पंक्तीला जेवलो. जेवताना काकांचा आग्रह चालू होता. काकूनें केली होती गाजराची भाजी आणि भाकरी. बरोबर एक गुळाचा खडा. पण तें ती भरपूर वाढत होती. आणि काका जसे कांहीं मी आत्तांच गांवाहून आलो अशा तऱ्हेनें बोलत होते. मुलें विचारी " नाना आला नाना आला " करीत होतीं. व माझ्या जवळपास घुटमळत होती. मी जायला निघालो तेव्हां ती सगळीं दाराशीं गोळा झाली. काका म्हणाले, " हा तुमचा वडील भाऊ पाया पडा त्याच्या."












पटापट वाकून विचारी पाया पडली. मोठ्यानें माझी पिशवी उचलून हातांत दिली. आणि धाकटें मला बिलगून बसलें. "कुठें चालला नाना ?" त्यानें विचारलें.

मला गहिंवर आला. "आतां पुन्हां केव्हां याल ?" दुसऱ्यानें शेंबूड पुसत विचारलें.

"याल तेव्हां आमच्यासाठीं खाऊ आणा." तिसऱ्यानें सांगितलें.

"आणीन. आणीन." मी म्हटलें. व मागल्याप्रमाणेंच प्रत्येकाच्या हातावर चार चार आणे ठेवले.

काका म्हणाले, "अरे कशाला ही खिरापत करतोस ? आपलं गोड बोललं तरी पुष्कळ झालं."

मी घरीं आलो. कांहीं सांगितलं नाहीं. बाबांनी बहुधा ओळखलें होतें. त्यांनीं मला फारसें विचारलेंच नाहीं. आईनें विचारून विचारून बेजार केलें. तेव्हां जरा मी डाफरून म्हणालो, "या वेळीं जमलं नाहीं तरी पुढल्या वेळी पैसे घेऊन येईन. नाहींतर खटला करीन त्यांच्यावर."

खटल्याचें नांव ऐकतांच बाबा एकदम दचकले. पण आईचा चेहरा उमलून आला. ती म्हणाली, "इतकीं वर्षे हेंच मी त्यांना सांगत होते कीं कोर्टांत गेल्याशिवाय काम होणार नाहीं. पण लक्ष कोण देतो ?"

"मी देईन लक्ष. पण जरा दमानं घे. सारखं तेंच तेंच बोलून माझं डोकं उठवूं नकोस."

शिमग्याला मी काकांच्याकडे गेलो. मुलांनी एकदम गराडा घातला आणि पिशवींतला खाऊ हस्तगत केला. तो नऊ नंबरचा पोरगा मोठा गोड होता. त्याचा चेहरा, त्याचें हसणें, त्याचें बोलणें सगळें छान होतें. सारखें वाटायचें कीं या पोरवड्यांत हें पोर नाहीं शोभत.

त्यांच्यांतून मोकळा झालों तों काकू दारांत येऊन म्हणाली, "जेवण तयार आहे. पानं मांडली आहेत."

मी म्हणालो, "हें पहा काका, आज जो मी आलो आहे तो जेवायला नाहीं. उत्पन्न घ्यायला. मिरची झाली कां कापशी झाली हें मी तुम्हांला विचारीत नाहीं. माझा वाटा माझ्या स्वाधीन करा. मग बोलूं. मग जेवूं."

"तुझा वाटा ना, घे कीं." असें म्हणून काकानें माझ्यापुढें पंधरा रुपये ठेवले.

"तुम्ही काय चेष्टा करता काय माझी ?" मी हिरवा पिवळा होऊन म्हणालो.

"त्याचं असं झालं केशव. मुळांतच हिशोब चुकला. शेतीभातीचं हें असंच असतं. आपण जर म्हणायला लागलो कीं पांचशे येतील तर येतात दोनशेच. तसंच झालं. दोनशेसुद्धां पुरते आले नाहींत. पण मग खर्च उभे झाले. सारा भरला. बांधाच्या पलीकडल्या जमीनीचं जें भांडण चाललं आहे त्याचा खर्च झाला. कर्जाचा हप्ता दिला. घरांत थोडं धान्य घेतलं आणि तुझ्या काकूचं लुगडं अगदींच फाटलं होतं तें

घेतलं. उरले फक्त पंधरा रुपये. ते सगळे तुलाच देऊन टाकले. त्या उरलेल्या पैशांत माझा हिस्सा मी ठेवलाच नाहीं."

काकांचें एकंदर कांहींच सरळ नव्हते. मी म्हटलं, "मला तुमच्या या बयादी नकोतच मुळीं. मी तुमच्यावर फिर्याद करणार. सगळ्या इस्टेटीचा अर्धा वाटा मला कायदेशीरच हवा."

"मग हें काय बेकायदेशीर आहे काय ? कागदोंपत्रीं लिहिलेलंच आहे कीं तसं. मग आणखी काय हवं तुला ?"

"तें कोर्टात सांगेन." असें म्हणून झटक्यानें उठलो. आणि जायला निघालो. पायांत वहाणा घातल्या.

"अरे कांहीं रीत भात आहे कीं नाहीं तुला ?" माझें बखोटें धरून काका म्हणाले, "चल आंत. जरा मुलांशीं बोल. काकूशी बोल. माझ्याबरोबर चार घास खा. आणि जा कुठें जायचंय तुला तें."

मी आंत गेलो. नाईलाजानेंच पानावर बसलो. हें काय काकांचें अजब वागणे ! इकडे खुशाल फसवायचें आणि इकडे जेवायला वाढायचें.

कसें तरी जेवलो आणि घरीं आलो. कोर्टात मी काकांच्या विरुद्ध फिर्याद लावली कीं आमच्या जमिनीचा आणि घराचा अर्धा वाटा आमचा आम्हांला तोडून हवा.

कोर्टात गेल्यानें माझ्या मनाचें वायूमान जसें कांहीं बदलूनच गेलें. बाबांना हें आवडलें नाहीं. पण मी मोठा झाल्यामुळें ते मला तोंडावर कांहीं म्हणाले नाहींत. त्यांच्या चेहऱ्यावर मात्र नापसंती आणि व्यग्रता दिसायची.

पण आमच्या आईसाहेब खुशींत होत्या. पोरगा अगदींच कांहीं बापासारखा निघाला नाहीं याचें तिला समाधान वाटत होते. शेतीचे उत्पन्न आले कीं तें आपल्या ताब्यांत घ्यायचें, आणि त्याचें सोनें घेऊन ते माझ्या लग्नांत सुनेच्या अंगावर घालायचें. इतके बेत तिनें आंखले होते.

आणि खुद्द मला कसें वाटायचें तें सांगतां नाहीं येत. व्यवहारी बुद्धीनें मला वाटे, कीं, मी जें करीत आहे तें बरोबर आहे. पण नात्यागोत्याची आठवण झाली कीं वाटे, गड्या, हें बरोबर नाहीं. तरीपण कोर्टकचेरी शेवटाला न्यायची ठरवली होती. गेल्या वीस पुंचवीस वर्षांत काकांनी आम्हांला कांहीहि दिलें नव्हतें. आमच्या वांटणीचेसुद्धां एकट्यानेंच खाल्लें होतें. वर दक्षिणा म्हणून बाबांनी हजार पांचशे, हजार पांचशे सतत दिले होते. याला कांहीं शेवट आहे कीं नाहीं ? म्हणून मी कायदेशीररीत्या अशी मागणी केली होती, कीं गेल्या तीन वर्षांतील उत्पन्नाचा वाटा आणि जमीन व घराची अर्धी वाटणी आमच्या नांवावर करून मिळावी !

हें सगळें जरी खरें होतें तरी कोर्टात जायच्या वेळीं मला आमच्या गांवीं जावेंच लागे. काकांच्या घरीं उतरावेंच लागे. पण मला त्याचा भारी संकोच वाटे. अपराध्यासारखें वाटे ज्याच्यावर आपण फिर्याद लावली त्याच्याच घरीं उतरायचें ? त्याच्याच घरीं जेवायचें ?

पण काकांनीं मला एकदां सांगून टाकलें, "हें बघ केशव, फिर्यादी-अर्यादी कोर्टात. इथं तूं माझा पुतण्या आणि मी तुझा काका. आलास म्हणजे इथेंच उतरायचं. इथेंच जेवायचं. दुसरीकडे उतरलास तर मला खपायचं नाहीं. फिर्याद केलीस तरी भाऊबंदकी करूं नकोस. भांडण कोर्टात. इथें प्रेम. माया. नातंगोतं. काय समजलास ?"

मला कांहीं समजेनासेंच झालें. पण या बाबतींत काकांचा शब्द मीं मोडला नाहीं. मी त्यांच्याच घरीं उतरायचा. त्यांच्याच घरीं जेवायचा. काका म्हणत, "तुझंच घर आहे." आणि कोर्टात भांडायला जायचे ते सुद्धां एकदमच. तालुक्याच्या गांवांत कोर्ट होते. त्या गांवाला जायचे म्हणजे नदी पार करावी लागे. एकाच नावेंत बसून आम्ही ती नदी पार करीत असूं. कोर्टात गेलो कीं काका एका दिशेनें जायचे. मी एका दिशेनें. कोर्ट आलें कीं काका म्हणायचे, "आतां तूं माझा कोणी नाहींस."

आणि कोणी नसल्यासारखाच तो कोर्टात बोलायचा. काय वाटेल तें सांगायचा. खोटें सुद्धां बोलायचा. बाहेर आल्यावर माझा हात धरून म्हणायचा, 'कोर्टात असंच करावं लागतं. ती काय खरं बोलायची जागा आहे ?"

त्याला कोर्ट आणि घर यांत फरक करून इतकें कसें वागतां येत होतें कोण जाणें ! कोर्टात तो वेगळेच कपाट उघडे. बाहेर पडल्यावर निराळेंच कपाट उघडायचा.

छक्कापन्हुति : ५ :



**ही पहा, स्वस्थ पडलेली मगर**
**डोळे मिटून बाहेरच्या जगाचा वेध घेत**
**संथ पाण्यांत विसावलेली—**
**जणुं वस्वस करीत भांडणासाठीं दिवसभर**
**लक्ष्य शोधीत हिंडणारी चाळींतली डाळगज काकू**
**विश्रांतीसाठीं तणावलेली—भयंकर जबड्याची.**



अनुक्रमणिका

पण काकांनीं किती जरी कपाटें उघडलीं तरी कोर्टाचा निकाल झाला आमच्यासारखा. म्हणजे अर्धी जमीन, अर्धे घर, आणि गेल्या तीन वर्षांचें उत्पन्न म्हणून तीन हजार रुपये त्यानें आम्हांला द्यायचें ठरलें.

निकाल माझ्यासारखा झाला म्हणून मला अर्थात् आनंद झाला. शिवाय त्यांत काकांना कुठेंच अन्याय नव्हता. घरीं गेल्यावर काकांना मी म्हणालों, " निकालाप्रमाणें काका, आतां देऊन टाका. "

" अरे वेड्या, " काका थंडपणानें म्हणाले, " देऊन टाका म्हणजे काय ? जमीन उचलून तुझ्या खांद्यावर ठेवायचं ? "

मी म्हणालो, " तसे कागदपत्र करा. आमचे तीन हजार रोख देऊन टाका. "

" देतो देतो. असा घाईला येऊं नकोस. पण मी म्हणतो, हें आहे कुणाचं ? तुमचंच ना ? वेगळं काय द्यायचं ? कागदपत्रावर पुष्कळ लिहिलं तरी काय तूं इथली शेतीवाडी शहरगांवीं नेणार आहेस का ? का नोकरी चाकरी सोडून इथं या खेडेगांवांत रहाणार आहेस ? मी म्हणतो, येच तूं केशवा, सोड नोकरी आणि रहा इथं. नांगर धर हातांत. नी कर शेती. मी शिकवतो तुला कशी करायची तें. "

" तें होणार नाहीं. " मीं म्हणालो.

" तेंच म्हणतोय मी." तंबाकूची फक्की मारत काका म्हणाले, "कागदपत्रावर होतं तें कांहीं खरं नाहीं. आपलेपणानं, प्रेमानं होईल तेंच खरं. मी काय पळून जाणार आहे कां ? कोर्टानं तुला अर्धीच जमीन दिली. आणि अर्धेच घर दिलं. पण मी तुला सबंध देतो. काय समजलास मुला ? माझा मुलगा आणि तूं, तुम्ही कांहीं वेगळे नाहींं मला. सगळं तुझंच आहे. मग तूं कशासाटीं एवढा उपद्व्याप केलास ? "

मी उत्तर दिलें नाहीं. काकांचा हा असला घोळ मला माहीतच झाला होता. तावा आज नाहीं उद्यां घेतला म्हणून कांहीं बिघडत नाहीं असा विचार करून मी म्हणालो, " तीन हजार रुपये मग कधीं देता काका ? "

" तुझा काका म्हणजे काय जहागिरदार लागून गेला आहे काय ? देईन सावकाश. हप्त्याहप्त्यानं."

मी " बरं " म्हणालो.

नेहमीं प्रमाणेंच जेवायला बसलो. पण लक्ष जेवणांत नव्हते. ताबा कसा घ्यायचा याचा विचार करीत होतो. पंक्तीला आमची चुलत भावंडें होतीच. त्यांतला एक आठ नऊ वर्षांचा मुलगा मला म्हणाला, " तुम्ही फिर्याद लावली आमच्यावर ? "

" अरे तो मालक आहे आतां ! " काका आमटीचा भुरका मारत म्हणाले. " मालक म्हणजे तूं काय समजलास ? "

" फिर्याद म्हणजे काय हो नाना ? " त्या पोरानें पुन्हां विचारलें.

मला कसें तरीच झालें. मीं कांहीं उत्तरच दिलें नाहीं. जायला निघालों तेव्हां पोरें माझ्याभोंवतीं गोळा झालीं. त्यांना हातावर कांहीं तरी देऊन मी वाटेला लागलो.

घरीं आलों. निकाल आपल्यासारखा झाला हें जेव्हां कळलें तेव्हां आईला आनंदाचें भरतें आलें. बाबांचा चेहरा मात्र उतरला. स्वतःशींच म्हणाल्याप्रमाणें ते म्हणाले, " म्हणजे जातं फुटलं. त्यापायीं नातं तुटलं नाहीं म्हणजे मिळवली. "

या गोष्टीला चार आठ दिवस झाले. मी विचार करीत होतो कीं सगळें ताब्यांत कसे घ्यावे ? तों एक दिवस आमच्या वकीलाचें पत्र आलें कीं काकांनीं जिल्हा कोर्टांत अपील केलें आहे !

हाच का तो काका ? कीं जो सगळेंच तुला दिलें आहे असें म्हणत होता ? हीच का काकांची माया ? आणि प्रेम ?

पुन्हां कोर्टांत हेलपाटे सुरू झाले. कोर्टांत गेलों कीं भांडण आणि घरीं आलों कीं काकांचे मायावी भाषण. जेवणाचा आग्रह. बोलण्याचा घोळ. मुलं मात्र माझ्यावर माया करूं लागली होती.

पण याहि कोर्टाचा निकाल आमच्याचसारखा झाला. उलट कोर्टाचा झालेला आमचा खर्च काकांनी भरून द्यावा असा आणि नवा बोजा काकांच्या डोक्यावर चढला.

मग काकांनी वरच्या कोर्टांत अपील केलें.

तिथेंहि आमच्याचसारखा निकाल झाला. कोर्टाचा आणखी खर्च काकांच्या उरावर चढला.





अनुक्रमणिका






घरीं येऊन काका मला म्हणाले, " नाहीं देणार तात्या. काय करायचं तें करून घे. "

मीं धसकलो. हें काय हें ? काका अद्वातद्वा पुष्कळ बोलले. मीहि मागें पुढें पाहिलें नाहीं. कायद्यानें जें झालें तेंसुद्धां न करण्याचा आडमुठेपणा पाहून माझें डोकें भडकलें होतें. मीहि बोलायचें बाकी ठेवलें नाहीं. पण काका कशालाच तयार झाले नाहींत तेव्हां कोर्टांत तात्या मिळत नसल्याची तक्रार मी केली.

कोर्टानें समन्स बजावलें. बेलीफ आणि पोलीस घेऊन मी शेतावर गेलो. पंच आले. पाटील कुलकर्णी हजर झाले आणि काकांच्या बडबडीकडे मुळींच लक्ष न देतां जमिनीच्या वाटण्या झाल्या. तसे कागदपत्र झाले. सह्या झाल्या. काकांनासुद्धां सही करावी लागली.

मला वाटलें, काका आकांडतांडव करतील. पण ते अगदीं शांत होते. जशी कांहीं आमचीच जमीन त्यांना मिळाली आहे. कां कोण जाणें ! माझाच जीव चुटपुटला !

आणखी पंधरा दिवसांनीं मी पुन्हां गेलों. पोलीस, पाटील, कुलकर्णी, पंच आणि बेलीफ. यावेळीं मला जरा कठीण वाटत होतें. कारण हा नुसताच घराचा वाटा नव्हता. तीन वर्षांच्या उत्पन्नाचे तीन हजार आणि कोर्टाच्या खर्चाचे पांचशें, असे साडेतीन हजार वसूल करून घेण्यासाठीं काकांच्या घरावर आम्ही जप्ती आणली होती.

प्रथम घराची वाटणी झाली. त्यापूर्वी मी काकांना म्हणालों, " तुम्हांला हवा तो भाग घेऊन उरलेला मला द्या."

काका तंबाकू मळत म्हणाले, " तसं कशाला ? तूं पुतण्या आहेस. मी काका आहे. तुला हवा तो तूं घे आणि उरलेला भाग मला दे." सर्वांच्या संमतीनें घराची वांटणी झाली. नाहीं म्हटलें तरी माझ्या पोटांत कालवलें. पोरें लुकूंलुकूं बघत होतीं. काकू डोळे पुसत उभी होती. काका मात्र थंड होते. वाटणी झाल्यावर त्यांनीं आपलीं सगळीं पोरें बाजूला केलीं आणि ते म्हणाले, " हा तुमच्या नानाचा भाग बरं. तिकडे नाहीं जायचं आतां खेळायला."

तसा तो आठ क्रमांकाचा पोरगा एकदम रडूं लागला. मला कसें-तरीच झालें. पण तें दाबून टाकण्यासाठीं मी त्या पोरावर एकदम ओरडलों, " ए, रडूं नकोस रे."

त्याबरोबर तें पोरगें गप्प झालें.

पण खरें संकट पुढेंच होतें. वाटणी झाली खरी. पण ते साडेतीन हजार द्यायला काकांजवळ रोख रक्कम कुठें होती ? त्यासाठीं काकांची भांडीकुंडी आणि घरदार यांच्यावर जप्ती आणायचा हुकूम आम्हांला मिळाला होता. तो हुकूम बेलीफानें काकांना दाखवला. काका म्हणाले, " मग घ्या तात्या. चला रे पोरांनों, चल ग तूं. व्हा बाहेर सगळी. हा तुमचा भाऊ आला आहे जप्ती करायला. कर्ज फेडून घ्यायचं आहे त्याला. तेव्हां व्हा बाहेर सगळीं. "

काकांचीं अकरा पोरें एकेक, एकेक बाहेर आलीं. रडूं लागलीं. काकू बाहेर अंगणांत येऊन उभ्या राहिल्या. काका तर सर्वांच्या आधीं बाहेर आले होते. अंगणांतल्याच एका ओंडक्यावर ते बसले आणि तंबाखू चोळूं लागले.

मला जरा चमत्कारिक झालें. काय करावें तें सुचेना. मी बेलीफाकडे पाहिलें. तो काकांना म्हणाला, " तुमची भांडीकुंडी बाहेर काढा."

काका म्हणाले, " छे ! आमचा पुतण्या आला आहे जप्तीला. तो स्वतः काढील भांडीकुंडी. मी कशाला हात लावूं ? मी नाहीं लावायचा. "

माझ्या जीवाची घालमेल झाली. पण विचार केला कीं आतां डगमगून उपयोगी नाहीं. बेलीफ आणि मी आंत गेलो. भांडीकुंडी, डबेडुबे, बाडली, घंगाळ, सगळें बाहेर आणून अंगणांत टाकूं लागलों. वाटत होतें कीं ज्या भांड्यांतून काकूंच्या हातचें जेवलो तीच भांडी आज अंगणांत आणून टाकतोय. ज्या घंगाळांतून आंघोळ केली, तेंच घंगाळ आज...पण हा असला शोक करण्यांत कांहीं अर्थ नव्हता. मन घट्ट करून आम्ही काकांचें सगळें सामान अंगणांत आणून टाकले. पंचासमोर त्यांच्या याद्या झाल्या. किंमती झाल्या. गांवच्या लोकांनासुद्धां आश्चर्य वाटत होतें. मी इतका निष्ठूर असेन अशी त्यांची कल्पना नव्हती. पण मी मन दगडासारखें घट्ट केलें. कर्तव्यावर नजर ठेवली. आईची मूर्ती समोर आणली. आणि हिशेबावर दृष्टी लावली.

चाळीस रुपये कमी भरत होते. काकांचे आणखी कांहीं तरी घ्यायला हवे होतें. पण आतां तर काकांच्याजवळ कांहींच नव्हतें. चाळीस रुपयांची सूट देण्याचें माझ्या जिवावर आलें. पण काकांचें घ्यायचं काय ?

मला एकदम आठवण झाली कीं शेतावर सरमाडची गंज आहे ती घ्यावी. आणि जी वसूली होईल ती पावली असें समजावें. मी








काकांना म्हणालो, " काका, वाईट वाटतंय, पण अजून वसूली पूर्ण झाली नाहीं. तेव्हां सरमाडची गंज..."

" मग घे की वेड्या. हा कायदा आहे. व्यवहार आहे. यांत वाईट काय वाटायचं आणि चांगलं काय वाटायचं ? काय तुला लागेल तें घे. "

आम्ही ती गंज जमा केली. तरी कांहीं रक्कम शिल्लक रहातच होती. बेलीफ म्हणाला, " उरलेली रक्कम तुम्हांला माफ केली आहे. "

" तरी हरकत नाहीं. " काका म्हणाले. ते अगदीं शांत होते. काकूला सारखे भरून येत होतें. सकाळीं हें काम सुरू झाल्यापासून आत्तांपर्यंत दुपारचे साडेअकरा बारा व्हायला आले होते. मुलांना भुका लागल्या होत्या. मुलें किती लहान म्हटली, आणि त्यांना कांहीं कळत नाहीं म्हटलें तरी आपल्याला घराबाहेर काढलें आहे हें त्यांना समजलें. नऊ क्रमांकाचा मुलगा बापाला बिलगून ओठ काढून म्हणाला, " आपल्याला बाहेर काढलं ? "

" होय रे बाबा. " काका त्याचे डोळे पुसत म्हणाले.

" होय कां हो नाना ? आम्हांला तुम्हीं बाहेर काढलं ? " माझ्याकडे झेपावून येत तें पोरगें म्हणालें. माझा गळा एकदम भरून आला.

आठ क्रमांकाच्या मुलाला भूक लागली होती. तो म्हणाला, " आतां आपण जेवायचं कुठें ? "

सर्वांत मोठा होता तो कावराबावरा झाला. त्याला रडायची लाज वाटत होती. आणि तें त्याला आवरत नव्हतें. तो आपल्या आईला म्हणाला, " आतां आपण कुठें जाणार ? "

एकमेकांचें पाहून सगळीं रडूं लागली. काकूचा तर बांधच फुटला. एखादें मनुष्य जावें तसा ती आक्रोश करूं लागली. मुलें आपापल्या भांड्यांना हात लावूं लागली, " हें माझं पाणी प्यायचं हें तुम्ही घेतलंत नाना ? ही माझी झारी, ही तुम्ही घेतलीत नाना ? ही माझी दुधाची वाटी. ही तुम्ही घेतलीत नाना ? "

" नाना, नाना, नाना," सगळ्यांनी मला गराडा दिला. आणि माझ्या अंगाला ळळत, लबत, अंगावर चढत तीं मला विचारूं लागली, " आम्हांला घराबाहेर काढलंत ? आम्हांला घराबाहेर काढलंत ? "

माझ्या जिवाची कालवाकालव झाली. एकाएकी पूर आल्यासारखें झालें. माझ्या डोळ्यांतून पाणी वाहूं लागलें. एखाद्या बाईसारखेंच मला रडूं येऊं लागलें, तीं मुलें एकदां आपल्या आईकडे जात. एकदां माझ्याकडे येत. एकदां बापाला कवटाळीत. एकदां मला मिठी मारीत. बांध फुटून ती रडूं लागली. मोठा मुलगा बापाकडे गेला. आणि म्हणाला, " हें सगळं नानांचं झालं ? "

" हो " काका अगदीं शांतपणानें म्हणाले.

" घरसुद्धां ? "

" घरसुद्धां "

" भांडीसुद्धां "

" भांडीसुद्धां " काकांचा स्वर मगाचच्या इतकाच थंड होता.

" घरांतलं धान्य सुद्धां ? "

" धान्य सुद्धां. "

" मग आतां आपण कुठें जेवायचं ? "

काका क्षणभर थांबले. आणि मग एकदम म्हणाले,

" नानाच्या घरांत. आतां आपण नानाच्या घरांत जेवायचं. चला रे पोरानो, चल ग तू, आतां आपण नानाच्या जवळ राहूं या. ये रे नाना. तुझ्याशिवाय आम्हांला कोण आहे या जगांत ? आतां आम्ही सगळीं तुझ्याचजवळ राहूं. चला चला व्हा आंत. उचला हें नानाचं सामान. नानाची भांडी. झाडून स्वच्छ करा हें नानाचं घर. आणि नानाच्या काकू, तूं आज नानाच्या घरचा स्वैपाक कर. आज तो मालक. आपण पाहुणे. आपण आज त्याच्या घरीं जेवूं या. "

पोरें भराभर सामान उचलूं लागली. काकू घर झाडूं लागली. कोणीतरी चुलीला पेटवण घातलें. काकूनें त्यावर भाताची हंडी चढवली. काका आपले ओटीवर नेहमींच्या जागीं बसून तंबाखू मळूं लागले.

तेव्हां मी त्यांच्यासमोर गेलों. आणि तो जप्तीचा कागद फाडून टाकला. तो वाटणीचा कागद मीं फाडून टाकला. दोघांनी मिळून सह्या केलेला तो वाटणीचा कागद मी फाडून टाकला.

●●●

पुरुषजीवन समृद्ध करणें हे या मासिकाचे ध्येय. त्यासाठीं आम्हीं अनेक योजना आंखलेल्या आहेत आमची गाढ निष्ठा आहे कीं हें मासिक पुरुष जातीची सर्वांगीण सेवा बजावील.



# केवळ पुरुषांसाठी!

— मं. वि. राजाध्यक्ष

'पुरुषांचें मासिक' ही कल्पना वाटते तेवढी विनोदी नाहीं. स्त्रियांची मासिकें असतात, मुलांचीं असतात; पण या खास जमातींची सोय आणि कौतुक पाहातांना बहुसंख्य पुरुष वाचकांची कुचंबणा होते हें त्यांच्याहि ध्यानीं येत नाहीं. इतकें तें अंगवळणी पडून गेलें आहे. तसें म्हटलें तर बहुतेक मासिकें पुरुषांचींच असतात–निदान वरवर तरी. मुद्रक–प्रकाशक-संपादक–लेखक बहुतांशीं पुरुषच; पण त्यांच्या डोळ्यापुढें वाचक असतो तो मात्र पुरुषच असतो असें नव्हे; किंबहुना सहसा नसतोच. उगाच नाही एवढ्या 'पुरुषी' मासिकांची नावें स्त्रीलिंगी आहेत. आणि कांहीं फक्त व्याकरणापुरती पुल्लिंगी असतात; इतकीं नाजुक आणि मऊ. त्यांचे मुखवटे पाहा, विषयांची निवड आणि त्यांची सजावट पाहा, काय बिशाद आहे त्यांच्या पुरुषी कारभाराचा संशय येईल! इतकेंच काय, पण जीं सांगूनसवरून स्त्रियांचीं मासिकें त्यापैकीं बहुतेक पुरुषच चालवीत आले आहेत. या सगळ्या वाङ्मयीन स्त्रीसेवेंत स्व-जाति-द्रोह होत आहे याची आम्हां पुरुषांना फारशी जाणीवहि नाहीं—

याला अपवाद आहेत, पण ते अगदींच थोडे. 'पुरुषार्था' सारखें मासिक नांवापासूनच सोवळें आहे खरें; पण त्याच्या विवंचना पारमार्थिक असतात; आपलें बोलणें आहे पुरुषांच्या लौकिक, व्यावहारिक, दैनंदिन विवंचना आणि निकडी यांबाबत. त्यांची दखल कोणी घेत नाहीं. आणि तसें म्हटलें तर, त्या सोंवळ्या निकडींबाबत स्त्री-पुरुष भेद असतोच कुठें? अध्यात्माला लिंगविचार नाहीं. तेव्हां तसलींहि मासिकें फक्त पुरुषांसाठीं नव्हेतच. आणखी एक प्रकार आहे. अशी कांहीं विद्वत्तेनें खचलेलीं, सखोलतेचा हट्ट चालविणारीं, शब्दांच्या वजनानें फरफटणारी,–थोडक्यांत, 'उच्च'—मासिकें असतात कीं स्त्रिया त्यांना सहसा (पुसायला सुद्धां) हात लावीत नाहींत. तीं आपले पुरुष कष्ट करून वाचतात अशी स्त्रियांची श्रद्धा. पण कोणाच्या तरी भिडेस्तव, किंवा बैठकीच्या खोलींत एखादें संस्कृति-चिन्ह असावें म्हणून, त्यांची वर्गणी आंबट तोंडानें भरणारे तसले बहुतेक पुरुष वेष्टन टरकविण्यापलीकडे, किंवा, फार तर, अनुक्रमावरून डोळे फिरविण्यापलीकडे, तीं हातांत धरीत नाहींत. मन लावून वाचणारे थोडे; समजणारे त्याहून. (पण तशा प्रकृतीच्या स्त्रियाहि तीं वाचतात; त्यांतील कांहींना तर तीं समजतातहि म्हणे).

एकूण, 'पुरुषांसंबंधींचीं आणि पुरुषांसाठीं अशीं मासिकें नाहींत; तीं हवींत. हें कबूल करायला अवघडल्यासारखें वाटेल; पण वाटूं नये शेवटीं स्वतःचें पाहिलें पाहिजेच. गैरसमज होऊं नये म्हणून चटकन् एक खुलासा करावा. "फक्त पुरुषांसाठीं" म्हणतांच For Men Only या त्याच्या इंग्रजी पर्यायाच्या चावट आठवणीनें उगाच कल्पनाशक्ति हुळहुळून जाईल तसला चोरटा, रंगेल, निद्रानाशक हेतु यांत नाहीं. (अर्थात् 'तसल्या' मासिकांना पुरुषांपेक्षां स्त्री-वाचकच अधिक असतात, असा प्रवाद आहे.) असलें मासिक (आबालवृद्ध) स्त्री-पुरुषांनीं एकत्र बसून वाचण्याजोगें असेल. त्याला झिरझिरीत वेष्टन नको कीं एखाद्या सद्ग्रंथाचा आडोसा नको.

*     *     *

हा सगळा विचार अगदींच हवेंतला नाहीं. पुरुषांची अशी मासिक सोय करतां येईल का, याची आम्ही कांहींजणांनीं सावध आणि बारीक छाननी केली; ती सोय करतां येईल, असा आतां विश्वास वाटूं लागला आहे. अर्थात् पुरुषांची म्हणजे समस्त पुरुष जातीची नव्हे. तसला 'जागतिक' आव नाहीं. (म्हणून वार्षिक वर्गणी देखील फक्त रुपयांत द्यायची. शिलिंगांत नाहीं कीं डॉलरांत नाहीं—अर्थात् तेथील एखादा साहेब (आमच्या) सांस्कृतिक उन्नतीसाठी भक्कम शिधा पाठवूं लागला, तर त्या सांस्कृतिक माधुकरीला आमची ना नाहीं हें स्पष्ट केलेलें बरें) खरें म्हणजे आमचें संकल्पित मासिक सगळ्या पुल्लिंगी महाराष्ट्रियांसाठीहि नाही. मुंबईचा चित्रपटदिग्दर्शक आणि

पंढरपूरचा वडवा यांच्या किती गरजा सारख्या आहेत ! मग त्यांची दावण कशाला ! थोडक्यांत, पुण्यामुंबईसारख्या लहान मोठ्या शहरांतील कमीअधिक शिक्षण झालेल्या मध्यमवर्गीय मराठी पुरुषांसाठीं हें मासिक असणार. " खालच्या " वर्गासाठीं तें नाही, कारण तेवढी अक्षर-ओळख आणि फुरसत आणि वाचून करण्याची संवय त्याला नसते. आणि 'वरचा" श्रीमंत वर्ग आपल्याकडे नाहींच. ( तिथे चौवे आहेत म्हणतात; त्यांच्या जाहिराती आम्ही मिळवूं ! ) स्त्रियांचीं मासिकें सुद्धां नाही का अशाच ( संख्येनें ) मूठभर महिलांसाठीं असतात ? आणि मुलांची मासिकें सुद्धां छानछान नव्या धर्तीची नांवें आणि हुशार अथवा पैसेवाले पालक असलेल्यांसाठींच बहुधा असतात.

तात्पर्य, प्रस्तुत मासिकापुढें निश्चित वाचक-वर्ग आहे म्हणून विषयांची निश्चित व्याप्ति आहे. समाजवादापासून राशिभविष्यापर्यंत आणि आधुनिकतम चित्रकलेच्या विश्लेषणापासून ते वृत्तपत्राच्या ( अथवा जाहिरातींच्या ) एजंटच्या कुटुंबांतील लग्नाच्या छायाचित्रांपर्यंत समबुद्धीनें सर्व छापण्याची कडबोळी करामत आम्ही करणार नाहीं. मासिकाचे वाचक कोण आणि त्यांच्या अपेक्षा , अभिरुचि व गरजा काय यांचा स्पष्ट आलेख आमच्या डोळ्यांपुढें आहे. म्हणून मासिक बंद करतांना वाचकांचें मागासलेपण अथवा महाराष्ट्राचें दैन्य यांचा उद्धार आम्ही करणार नाहीं हें आगाऊच सांगून ठेवतों.

*          *          *

या उद्दिष्टांच्या अनुरोधानें आम्ही मासिकाचा आराखडा तयार केला आहे; त्यांतील प्रत्येक सदर अशा कसोशीनें आंखले आहे कीं आमच्या प्रिय ( पुरुष ) वाचकांना हें अगोदर पाहूं कीं तें असा संभ्रम वाटेल, आणि नव्या अंकाची ते सोत्कंठ चित्तानें वाट पाहातील. आणि आपल्या घराला त्याच्याशिवाय पूर्णता येणार नाहीं अशी आपुलकीची जाणीव त्यांच्यांत निर्माण होईल, असा आम्हांला विश्वास आहे. एकाच घरांत अनेक पुरुष असले तर मी अगोदर पाहणार कीं तूं अशा चढाओढींत अंकाची ओढाताण, आणि संबंधांत बिघाड होण्याचा संभव आहे. कोणी गादीखाली अंक लपवून ठेवील, कोणी पुस्तकाखालीं, कोणी आणखी कुठें. या मासिकानें पुरुषजीवनांत क्रांति होईल असा आमचा अतिरेकी दावा नाहीं, पण घरांत आणि घराबाहेर त्याचें स्वत्व नव्या जोमानें फुलेल आणि त्याच्या अस्मितेला पुरा वाव मिळेल. ही प्रौढी जाहिरातवजा वाटेल, पण तिच्यांत एका नव्या निष्ठेचा आविष्कार आहे, एका अपूर्व कार्याचें आवाहन आहे.

कोणत्याहि मासिकाच्या आराखड्याचा सर्वात महत्त्वाचा, म्हणून पहिला, भाग त्याच्या बहि-रंगाचा. एक नूर मजकूर तर दसनूर सजावट. त्यांतहि आवाडीला, अर्थातच, मुखपृष्ठ. तें रंगीत हवेंच. आमच्या मुखपृष्ठावर चित्र असेल तें पुरुषाचें — हा कोणाला वेरंग वाटेल; पण मासि-काच्या ब्रीदाशीं आणि हेतूशीं तें सुसंगतच आहे. तें सोडलें, तरी स्त्रियांच्या रूपाची हट्टीला अशी मिठी बसलेली आहे कीं पालट आणि नावीन्य म्हणून मर्दानी रुबाब रुचायला हरकत नाहीं. मात्र तो खराखुरा मर्दानी ढंग असेल. नाहींतर चित्रपट-नायकांचे मुखवटे जाहिरातीच्या दरानें छापतां येतील ! मर्दानी घाटाचा ज्याच्या हाताला अजून सराव आहे अशा चित्रकाराच्या शोधांत आम्ही आहोत. अर्थात् छायाचित्रेंहि वापरूंच; पण त्यांतसुद्धां कटाक्ष राहील तो पौरुषावर. सहसा अशा चित्रांना पुरुषजीवनाचा संदर्भ असेल. उदाहरणार्थ : गोंडस मूल कडेवर असलेला हंसरा बाप; सहलींत गवतावर अथवा वाळूंत अस्ताव्यस्त लोळत वृत्तपत्र अथवा पुस्तक वाचणारा ( पण गवताची काडी न चघळणारा ) रसिक, क्रिकेट–फुटबॉल–खेळाडू, कचेरींत टेलि-फोनवर बोलणारा कटपटीत अधिकारी, किंवा कचेरींत जातांना आगगाडीच्या दाराशीं उभा राहिलेला नोकदार कारकून इत्यादि. आंतील चित्रांचें वळणहि तेंच असेल. म्हणजे स्त्रियांना अजिबात मज्जाव असें नव्हे; तर पुरुषांची पायमल्ली होऊं दिली जाणार नाहीं.

आतां अंतरंगाविषयीं. अशा विशिष्ट ध्येयाला वाहिलेल्या मासिकाचें वैशिष्ट्य म्हणजे त्यांतील सदरें. त्यांत कथा-कविता असतील, प्रासंगिक लेख असतील; लेखांशेवटची जागा भरून काढण्यासाठीं उतारे, पुरुषोत्तमांचे संदेश, संपादकीय, चुटके इत्यादि सोयीचा मजकूरहि असेल. पण मुख्य भर सदरांवर. कवितांबाबत एक खुलासा आवश्यक आहे. अशा मर्दानी मासिकांत कविता कशाला असा एकानें बूट काढला; पण चित्रांप्रमाणें काव्यांतहि बिन-जनानी ढंग शक्य आहे असें बहुमत पडलें. म्हणजे फक्त पोवाडे अथवा सज्जन व सद्गुण यांविषयींची सोज्वळ कविताच नव्हे; किंवा भक्ति-घराण्याची अति-लिंगी कविता नव्हे; तर सांगूनसवरून प्रेमाविषयीच्या कविताहि पुरुष-निष्ठ असायला हरकत नाहीं. आमच्या एका सल्लागाराचें कांहींसें चमत्कारिक मत असें पडलें कीं प्रेम-कविता मुख्यत्वें कवयित्रींच्या असाव्या; त्यांनीं दिलेलीं उदाहरणें ऐकल्यावर तें पटलें. इतकेंच नव्हे तर त्यांनीं उन्माद-कुमारी उपाध्ये आणि सारिका शेवाळे या दोघींकडे आमच्यासाठीं शब्द टाकण्याचें कबूल केलें आहे.

मासिकांत जीं सदरें असतील तीं दोन प्रकारचीं—तात्त्विक आणि व्यवहारोपयोगी. अर्थात् तत्त्वचर्चा आणि व्यवहार यांची पूर्ण फारकत केली जाईल असें नव्हे; एकाला दुसऱ्याची डूब असेलच. तत्त्वें केवळ पुस्तकी नसतील. त्यांचा पुरुषजीवनाशीं घटकेघटकेला संबंध येईल. उलट, क्षुद्र वाटणाऱ्या व्यावहारिक सोयींगैरसोयींमागील सखोल तत्त्वें कटाक्षानें दाखविलीं जातील. तेव्हां वरील भेद स्थूल आणि केवळ तुलनार्थी मानावयाचे.

तत्त्वचर्चा म्हणजे समस्या आल्याच. वीस–पंचवीस वर्षांपूर्वी आपल्या महाराष्ट्रांत स्त्रियांच्या फार समस्या उभ्या राहिल्या आणि त्याहि कांहींशा अकस्मात. मागोमाग महायुद्ध ठाकलें. तोंवर त्या धड मोजून देखील झाल्या नव्हत्या. पण त्या जागतिक धुमश्चक्रींत बरेचसें इकडचें तिकडे होऊन कित्येक बिकट समस्या चटकन् सुटल्या आणि कांहीं तर वेड्या गझाळ झाल्या. सुटल्या त्या कांहीं रंगभूमीवर, कांहीं चित्रपटांत, कांहीं सभांत आणि परिसंवादांत, तर कांहीं रेशनिंग कचेऱ्यांत. अजूनहि थोड्या आहेत; पण पंचवीस गेल्या, पांच उरल्यासारख्या.



आमच्या मासिकाचें मलपृष्ठ

उरल्या त्या बहुतेक वातड हें साहजिकच; एका पिढीचे दांत पडले, तर पुढची पिढी त्या चावायला सज्ज आहे. स्त्रियांच्या आणि स्त्री-निष्ठ मासिकांना तो चिकटा अजून बराच काळ पुरेल असा रंग आहे. पुरो. पण या रगाड्यांत पुरुषांचें काय ? कीं त्यांचे प्रश्नच ( म्हणजे समस्या ) नाहींत ? स्पष्ट बोलावयाचें म्हणजे महायुद्धानें पुरुषांपुढें अकल्पित प्रश्नांची फौज खडी केली आणि स्त्रियांचे जे प्रश्न सुटले म्हणायचे ते पलटी खाऊन पुरुषांचे प्रश्न झाले; किंबहुना या लिंगांतरानें ते अधिक खडतर आणि कडवट झाले. त्याबाबत मात्र आजवर आळीमिळी गुपचिळी. ते असून नसल्याचा धीरोदात्त बहाणा करायचा आणि आपल्याच दांतांनी आपलेच ओंठ चावत लष्करच्या भाकऱ्या भाजण्याचा निःस्वार्थी उद्योग चालवायचा. हें कोठवर चालणार ! आजचा पुरुष गांजून आणि गांगरून गेला आहे.

आर्थिक प्रश्नच घ्या. तें जोखड आजवर पुरुषजातीनें गाजावाजा न करतां वागवलें. कालपरवांपर्यंत. तो जणूं निसर्गक्रम म्हणून तिकडे कोणी मुद्दाम लक्ष दिलें नाहीं. पण आतां धापा टाकूं लागल्या स्त्रिया; म्हणून जो तो तिकडे पाहूं लागला. कोणी करुणेनें तर ( स्त्रीजातीवरील ) अन्यायाच्या परिमार्जनासाठीं संतापानें बद्धपरिकर होऊन. ( कष्टानें मिळवून संसार चालविणाऱ्या स्त्रियांचा यांत अंतर्भाव नाहीं; त्या बापड्या अशा शाब्दिक जंजाळांत पडत नाहीत. ) असो. चाकरी, बेकारी महागाई, प्राप्तिकर इत्यादि काळज्या मुख्यतः पुरुषांच्या, पण स्त्रियांना त्यांची झळ लागतेच. चाकरमान्या स्त्रियांच्या आक्रमणामुळें पुरुषांची बेकारी वाढली आहे ही पोट-काळजी अर्थात् फक्त पुरुषांची. या सगळ्याबाबत आमचें मासिक पुरुष-हिताच्या अनुरोधानें योग्य तें दिग्दर्शन करीलच. कचेऱ्यांतून पुरुषांना लोकसंख्येच्या प्रमाणांत नोकऱ्या मिळाव्यात, हातून होणारें काम आणि मिळणारा पगार व बढती यांचा संबंध असावा, ( काळ-काम-वेगांबाबत स्त्रीपुरुषांचें तौलनिक कोष्टक असावें ) पुरुषांची कार्यव्यग्रता विचल करणाऱ्या विभ्रमांवर बंदी घालावी, दाक्षिण्याचा फाजील फायदा घेतला जाऊं नये. असल्या मागण्यांविषयीं जी कारवाई व्हायला पाहिजे तिला आम्ही उत्तेजन देऊं. याबाबतची आंकडेवारी कसोशीनें मिळवूं. तज्ज्ञ संख्याशास्त्री तिची निःपक्षपाती चिकित्सा करतील. त्याचप्रमाणें स्त्री-सहकाऱ्यांशी कसें वागावें, स्त्री-वरिष्ठांपुढें किती नमावें याबाबतहि बारीक सूचना देण्यांत येतील. सचिवालयांतून नुकतेच निवृत्त झालेले एक ज्येष्ठ अधिकारी हा विभाग सांभाळणार आहेत इतकें सांगितलें म्हणजे पुरे.

हें पैसे मिळविण्यापुरतें झालें; तो खर्चणें हा त्या 'आर्थिक प्रश्ना'चा उत्तरार्ध; तोहि तेवढ्याच महत्त्वाचा आहे; किंबहुना अधिक, कारण त्यांत पुरुषाची कुचंबणा होते ती अवघड जागींच्या दुखण्यासारखी दडवून ठेवावी लागते. कोण्या एके काळीं काय होत असे कोण जाणे, पण सांप्रत पुरुष फक्त 'मिळवता' राहिला

आहे; ‘ खर्चता ’ तो नव्हे. तो त्याच्या स्त्रीचा अधिकार. तो तिनें बनावल्यावर त्यानें आपला बनावायचा–( जमाखर्चाच्या ) तोंडमिळवणीचा. हिशेबनिसी त्याची, वेहिशेबी तिची. चहापाणी, विडीकाडी, कपडेलत्तें यासाठीं ती कांहीं तोडून देईल त्यावर त्याच्या आर्थिक स्वातंत्र्याची गुजराण. मंजुरीच्या वेळीं ती विरोधी पक्षाच्या नेत्यासारखी ( अथवा अकौन्टन्ट जनरल सारखी ) धार–नजरेनें काटछाट करते; आणि वेळोवेळीं आपल्या पुरुषाचें खिसा-पाकीट तपासून ‘ कॅश ’ मोजते ती ऑडिटरच्या गुमींत; कधीं त्यांतील कांहीं, ‘ हाताशी सुटे पैसे नसल्यामुळें ’, मिर्चीकोथंबिरीसाठीं उचलते. असा आणखी खूप तपशील देतां येईल; पण तो येथें नको. थोडक्यांत, याबाबत पुरुषांत पुरी जाग आली पाहिजे; आपल्याला हक्क आहेत ( म्हणजे असावेत ), जो कमवितो त्याला मामुली रकमेसाठीं अजीजी करावी लागू नये, आर्थिक पहारा जरा ढिला व्हावा, यांची जाणीव झाली पाहिजे. ही जाणीव निर्माण करण्याचा, त्या हक्कांची पायमल्ली होऊं नये याविषयीं उठाव करण्याचा आणि ते हक्क राजीखुषीनें न मिळाल्यास अक्कलहुशारीनें कसे मिळवावे व मिळाल्यावर त्यांना जपावे कसें याबाबत सल्ला-मसलत देण्याचा हें मासिक घडाडीनें प्रयत्न करील असें आम्ही आश्वासन देतों. या विषयाची धुरा आमचे एक स्नेही वाहणार आहेत. त्यांना संसाराचा अडीच तपांचा ( आणि कांहींसा विविध ) अनुभव असून, त्यांनी दलितोद्धाराचें व कामगार संघटनेचें कार्य केलें आहे. याशिवाय कांही काळ त्यांनीं एका मोठ्या उद्योगपतीकडे हिशेब लिहिले हा अनुभवहि चलाख सल्ला द्यायला त्यांना उपयोगी पडेल.

या प्रश्नाची उपांगेंहि आहेत. फावल्या वेळीं द्रव्यार्जन करण्याचें एक. शिकवण्या, टायपिंग, एजन्सी, इत्यादि जुनी कलमें आहेतच. त्या शिवाय, पुरुषांच्या हस्तकौशल्याला उत्तेजन आणि दिग्दर्शन पुरविलें जाईल. इतर कांहीं कौशल्य असल्यास त्याबाबतहि. कोणी एखाद्या विषयांत पारंगत असतो. त्यांत तो गरजूंना सल्ला आणि साहाय्य देऊं शकेल. आमचा बापू पंडित पाहा.



विश्वविख्यात समारंभ सम्राट

‘ आमचे समारंभ-सम्राट ’ असें त्याची पत्नी कुचेष्टेने म्हणो पण ( सभा सोडून, तिचा त्याला तिटकारा ) कसलाहि समारंभ असो, अगदीं बारशापासून श्राद्धापर्यंत, बापूवर व्यवस्था सोपविलीत तर अथपासून इतिपर्यंत सगळे सुरळीत आणि नांवाजण्यासारखे व्हायचेंच. विशेषतः चहापाणी अथवा जेवणखाण असलें तर बापूला आणखी चेव चढणार. पक्वान्नाच्या मांडणीपासून ते हात पुसायचा रुमाल नळाच्या कोणत्या अंगाला ठेवायचा येथपर्यंत त्याची टापटीप असते. शुभ-अशुभ, श्रीमंती-गरिबीचें, शाकाहारी–मांसाहारी यापैकीं कोणतेंहि असो, बापू विजार दुमडून पुढें. तेंच बाजारहाट करण्यांत. चांदीसोन्यापासून कात-चुन्यापर्यंत आणि नायलॉनपासून पायपुसण्यापर्यंत कोठें कोणत्या भावानें मिळतें हें त्याला तोंडपाठ; मुंबईतले सगळे बाजार त्याला जणू पायपाठ. बवाहिऱ्यापासून कोळणीपर्यंत ओळखी. रविवारी सकाळीं हा तज्ञ अनेकांच्या पिशव्या हाताखांद्याला अडकवून निघतो, आणि मटण-मासळीसारखी त्या दिवसाला साजेशी, पण कांहींच्या पोटखीशाला आणि जातीपातीला न साजेशी, खरेदी वाजवी प्रमाणांत करतो. पण हें सगळे श्रमदान निष्कामबुद्धीनं. कोठें चहाच्या कपापुरती कृतज्ञता लाभली तर फार झालें. म्हणून, मला वाटतें, त्याची गृहिणी तापट असावी. असे बापू चाळीचाळीतून असतात. त्यांनी खरोखर हा दुय्यम व्यवसाय म्हणून केला पाहिजे. यांतून कदाचित् एक उपप्रश्न निर्माण होईल. असली धडपड करायची ती आर्थिक स्वातंत्र्यासाठीं; पण हेंहि द्रव्य पगाराप्रमाणें जप्त झालें तर ? आमचें मासिक अशा सर्व अडचणींतून वाट दाखवील.

आर्थिक प्रश्न मुख्य. इतर खूप आहेत. सामाजिकच घ्या. या बदलत्या समाजांत पुरुषाचें स्थान काय याचा सांगोपांग विचार झाला पाहिजे. पुरुषांचे ‘ समाज ’ असावेत वा, असल्यास त्यांत ( स्वतःच्यां व मिळवती बायको असल्यास तिच्या ) पगारातून निर्माण होणारे भेद टाळून एकजिनसीपणा कसा आणतां येईल तसेंच समाजासमाजांत सलोखा कसा राहील, फाटाफूट होणार नाहीं, असल्या ‘ समाजांत ’ मनोरंजनाशिवाय बौद्धिक विकासाचा कोणता कार्यक्रम असावा, समाजसेवेसाठीं गरिबांच्या वस्त्यांना अथवा तुरुंगा-इस्पितळांना गटानें ( सचित्र ) भेट द्यावी काय, असले अनेक महान् प्रश्न आहेत. पुरुषमनाच्या विकासाप्रमाणें त्याचें रंजनहि झालें पाहिजे. आणि












तेंहि • खेळीमेळीच्या चढाओढींतून; म्हणजे भ्रातृभाव वाढेल. कॉंट्रॅक्ट ब्रिज अथवा बुद्धिबळ यांसारखे बैठे, हॉकी-फुटबॉल-क्रिकेट सारखे मैदानी आणि कुस्ती-मलखांब सारखे विशेष मर्दानी खेळ यांची सोय अशा समाजांत असणारच; त्याशिवाय उत्सवप्रसंगीं सिगारेटच्या धुराची वर्तुळें सोडण्याच्या, राख पडूं न देतां सिगरेट ओढण्याच्या, एका काडींत अधिकांत अधिक सिगरेट पेटविण्याच्या, सतत बोलण्याच्या, पायजम्यांत नाडी घालण्याच्या, डोळे झांकून भांग पाडण्याच्या वा दाढी करण्याच्या इत्यादि चढाओढी असतील. एकूण पुरुषांचें सामाजिक स्थान आणि संबंध यांचा नव्या युगाच्या संदर्भांत सहानुभूतीनें विचार झाला पाहिजे. तसेंच या युगाची एक नाजुक निकड आहे, तिचीहि दखल घेणें अवश्य आहे. ती म्हणजे लैंगिक प्रश्नाबाबत. कोणी म्हणेल ती खरोखर साहित्यिक निकड आहे; असेलहि. आणि मासिक पुरुषांसाठीं असलें तरी तें साहित्यच. असो. अज्ञान, गैरसमज आणि



मासिक ‘ हिशेब तपासणी ’

प्रेमविषयक कथा कविता यांमुळें आणि पुरुषसुलभ लज्जेमुळें, आजवर अंधारांत चांचपडणाऱ्या संसारोन्मुख तरुणांना या प्रदेशांतील शास्त्रीय सत्यें सुबोध पण संभावित भाषेंत सांगण्याचा आम्हीं प्रयत्न करूं. एक प्रख्यात डॉक्टर या भागाचें संपादन करतील. त्यांची ख्याति वैद्यकीपेक्षां लेखनांत आहे हें मुद्दाम सांगावयाचें. त्यांचे परदेशी मासिकांचें अद्ययावत् वाचन, साहित्याच्या इतर क्षेत्रांतल्याप्रमाणें, येथेंहि उपयोगी पडेलच. वाचकांच्या पत्रांना उत्तरें देऊन ते त्यांच्या अडचणींबाबत काळजीपूर्वक सल्ला देतील. आम्हांला लिहिलेल्या एका पत्रांत ते लिहितात, “ तुमची योजना हजारों वाचकांना फलदायी होईल. त्यांचे संसार सुखी, सुंदर आणि संपन्न होतील, त्यांचा व त्यांच्या संबंधितांचा तुम्हाला दुवा मिळेलच; पण वैद्यक शास्त्राचाहि मिळेल; कारण ही पुरुषरोगचिकित्सेची शाखा एकंदरीनें उपेक्षिली गेली आहे; तिला आतां उठाव मिळेल ” मासिकाच्या या सदराचा ज्यांना वास लागला आहे अशा कांहीं भावी वाचकांनी पाठविलेल्या पत्रांची आतांच केवढी चळत झाली आहे. बुलढाण्याहून यादव चक्रधर पांढरीपांडे लिहितात, “ ( खूपशा खासगी तपशीलानंतर) एकूण आमचें कुटुंब फार विस्तारलें. कर्ताकरविता श्रीहरि ही आमची श्रद्धा म्हणून तक्रार करणेंचि नाहीं. पण आमचे देहाची झीज झाली ती दुरुस्त होणेसाठीं तुमच्या शास्त्रग्रंथांत कांहीं भेटेल का ? ” सावंतवाडीचे गुरुनाथ झिलबा गायतोंडे यांची पृच्छा अशी स्वतःपुरती नाहीं, सर्वसाधारण आहे. ते विचारतात, “ पुरुषांत तिशी–चाळिशीनंतर टप्प्याटप्प्यांनीं जे शारीरिक बदल होतात ( उदाहरणार्थ : आमच्या शांताराम लाडाचें पोट सुटत चाललें आहे किंवा नानू शिरोडकराला केव्हांच टक्कल पडलें ). त्याबाबत कांहीं पथ्ये पाळावयाचीं असतात काय ?”

याशिवाय पुरुषवर्गापुढें नेहमीं उभे राहणारे विविध आणि लहानसहान प्रश्न असतातच. त्यांचा परामर्श घ्यायला हवा. म्हणून एक सदर योजिलें आहे. साहेबाच्या Brains Trust च्या देशी आवृत्त्या हल्लीं निघाल्या आहेत, तसलीच ही असणार. नांवांत नावीन्य हवें. म्हणून ते 'बुद्धिं शरणं गच्छामि.' प्रश्न वाचकांचे; सर्वांत चतुर प्रश्न विचारणाराला सव्वा रुपया (आणि अंक) बक्षीस. तसल्या वाचकांच्या अभावीं सध्यां तरी आम्हीच प्रश्न बनविणार आहोंत. चालू प्रथा तीच आहे म्हणा! एक खुलासा : हीं प्रश्नोत्तरें फक्त थिल्लर-अगदींच विनोदी नसतील. त्यामागें पुरुषोन्नतीची निश्चित विचारसरणी असेल; तीं मार्गदर्शक असतील. उदाहरणार्थ, पहिल्याच अंकांतील प्रश्नांपैकीं एक.

"सौभाग्यवतीला नको असलेले पाहुणे बसले असतांना आंत ती आदळआपट करूं लागली, तर आपण सावरासावर कशी करावी?"

याचें उत्तरहि तयार करून ठेवलें आहे. तें असें :

"पाहुण्यांना म्हणावें, कालच आम्ही नवीन भांडीं खरेदी केलीं आहेत. त्यांना कधीं पोंचे पडणें शक्य नाहीं असा दुकानदाराचा दावा आहे. तो ती खोटा पाडीत आहे."

दुसरा एक असा : 'आमची जागा लहान पण कुटुंब मोठें. मी काय करावें?" हा केवढा मोठा प्रश्न. जवळजवळ राष्ट्रीय, आणि करुण. पण त्याचें संपूर्ण उत्तर द्यायचें म्हणजे लेखमाला लागेल. म्हणून या सदराचें संपादक 'बिरबल' (म्हणजेच, प्रसन्नकुमार हसबनीस—ज्यांच्या झटपट आणि प्रसंगोचित विनोदावर खूष होऊन आचार्य शिंद्यांनीं त्यांना "हजर-विनोदी" ही पदवी बहाल केली.) यांनी त्याचें चटपटीत उत्तर तयार केलें आहे तें असें :

"(अ) कुटुंबाला दोरीच्या उड्या मारावयास लावणें;

(आ) कुटुंबाचें मीठ तोडणें;

बिरबलांनीं येथें विनोदी श्लेष काढून वेळ मारून नेली असें वाटेल; पण श्लेषामागें अपार सहसंवेदना आहे हें सूक्ष्मदृष्टीच्या वाचकांस मुद्दाम सांगणें नलगे.

विस्तारभयास्तव आणखीं उदाहरणें नकोत. तरीपण एकच प्रश्न : "आमच्या घरीं कधीं सुटीच्या दिवशीं हळदीकुंकू-मंगळागौर असले स्त्रियांचे समारंभ साजरे होतात. तेव्हां आम्हीं पुरुषांची कुचंबणा होते. आम्ही काय करावें?" अथवा "वटपौर्णिमेला आणि हरितालिकेला माझी पत्नी 'सातजन्मीं हाच पती लाभावा' असें मागून घेते. यावर आम्हीं काय उपाय करायचा?"

कांहीं प्रश्न असे चटपटीत उत्तरानें सुटण्यासारखे नसतात. त्यांची सर्वांगीण चर्चा आवश्यक असते. त्यासाठीं "वादस्थळी" या नांवाचें सदर (म्हणजेच आपला symposium. किंयेकांना तोच शब्द लौकर समजेल!). दर अंकांत नवा प्रश्न. पहिल्या अंकांत : पुरुषांनी रविवार दुपारचा वेळ कसा घालवावा?" निरनिराळ्या क्षेत्रांतील व्यक्तींना (म्हणजे पुरुषांना) आम्हीं हा प्रश्न विचारला आहे—एका गव्हर्नरापासून एका बस-कंडक्टरपर्यंत.

" प्रकाशांतील पुरुष " हें आणखी एक सदर. नांव मिळविलेल्या पुरुषांविषयीं त्यांच्या सांसारिक तपशिलावर भर देऊन सचित्र लिहिलें जाईल. मुलेंबाळें किती, आवडीचे पदार्थ, कपडे आणि रंग कोणते, यजमान म्हणून पाहुणे-मंडळींना ते कसें आकर्षक वाटतात, ते केस कोठें व कोणत्या ' स्टाईल ' नें कापून घेतात, त्यांचा शिंपी कोण, चांभार कोण याबाबतच्या वाचकांच्या चौफेर कुतूहलाचें पूर्ण समाधान केलें जाईल. अशी एक सूचना आहे कीं दर अंकांत एकाविषयींच लिहावें; ती स्वीकारली गेल्यास त्याला–आणि सदरालाहि–" मासिक पुरुषोत्तम " ( अथवा ' मासिक पुरुषपुंगव ' ) असें म्हटलें जाईल. कदाचित् त्याचें चित्र मुखपृष्ठावरहि येईल. यांतून मासिकाला आर्थिक बळ लाभेल असा अंदाज आहे. शेवटीं व्यवहार पाहिलाच पाहिजे.

' शतपावली ' हें सदर पेन्शनरांसाठीं असेल. त्याचें संपादन पुण्यांत केलें जाईल.—श्री. निवृत्तिनाथ सोनामुखे यांजकडून. आहार, पचन, दंतचिकित्सा, पेन्शन मिळण्यांतील आणि अध्यात्मांतील अडचणी इत्यादि विषयांचा त्यांत खल होईल.

ही सगळीं सदरें मुख्यतः तात्त्विक स्वरूपाची; पण असल्या मासिकाच्या वाचकवर्गाच्या दुसऱ्याहि अपेक्षा असतात. नुसती तत्त्वचर्चा तर मासिकामासिकांतून वाहात असते. गरज भासते ती दैनंदिन व्यवहारांतील मार्गदर्शनाची. म्हणून पुरुष-वाचकांना संसारांत पदोपदीं उपयोगी पडेल असा मजकूर पुरविणारीं कांहीं सदरें आम्हीं देणार आहोंत. त्यापैकीं कांहीं अशी--

वेशभूषा : देहशृंगार म्हणजे फक्त स्त्रियांचा हा शिळा संकेत आतां पुरे. पुरुष म्हणजे गैदी, गबाळा आणि बावळट हा काय न्याय झाला ? वस्तुतः तोहि बापडा आपल्या परीनें डोळ्यांत भरण्याची धडपड करीत असतो, पण तसें उघड बोलण्याची चोरी. मग तो छापील वर्णनें चित्रें, चित्रपट इत्यादींतून कांहींतरी कसेंतरी जुळवून आपली सजावट करतो. वेषाबाबत कापडविक्या आणि शिंपी यांचें स्वार्थी सांगणें मानायचें; केसाबाबत न्हाव्याचें आणि पादत्राणाबाबत चांभाराचें. त्याचा सगळा शृंगार असा परावलंबी. तो विवाहित असलो तर—सगळेंच परावलंबी तसें हेंहि. त्याची पतिव्रता आपल्या



छक्कापन्हुति : ६



अरे, हा तर तुमच्या गांवचाच दोस्त, आहे का ओळखीचा ?
किती गोड गातो--पण लोळतो मात्र खातांत मजेनें--
उगाच दुगाण्या झाडून चिखल उडवणाऱ्या लाचार संपादकासारखा.
जवळ जाऊ नका--घाण आहे त्याच्या मनांत, तोंडात अन् आंगावर
आणि त्याचे तें भेसूर गाणें--ज्याला ना अस्ताई ना अंतरा, फक्त
पलट्याच्या दमछाट ताना--चिक्कट, लाळ शिंपडणाऱ्या.

कल्पनेनें त्याला मढविणार. हा एक मुद्दा, विशेषतः समाजशास्त्रज्ञांनी आणि मानसशास्त्रज्ञांनी, विचारांत घेण्यासारखा आहे कीं स्वतःच्या वेषभूषेबाबत चोखंदळ सौंदर्यदृष्टि दाखविणारी स्त्री नवऱ्याच्या दर्शनी भागाबद्दल इतकी बेफिकीर कां, इतकेंच नव्हे तर त्याला त्याविषयीं



' खुळा ' नवरा !

बदसल्ला कां देते ? ' मोरपंखी ' विजार आणि ' गुलबक्षी ' किंवा ' चटणी-कलर ' बुशकोट एकसमयावच्छेदेंकरून त्याच्यावर चढवून, भल्या माणसाला खुळा कसा करून दाखवते. यांतून त्याची सोडवणूक व्हावी, ( स्वतःबाबत ) त्याची सौन्दर्यदृष्टि साफ व्हावी आणि एकंदरीनें जग अधिक देखणें व्हावें हा या सदरामागील हेतु.

त्यांत रंगसंगतीबाबत काळजीपूर्वक माहिती दिली जाईल. ( त्या संगतींत त्वचेचा रंगहि अंतर्भूत असेल ! ) सगळा जामानिमा त्यांत येईल; म्हणजे विजार, कोट अथवा शर्ट इत्यादि प्रधान वस्त्रें, आणि नेकटाय, हातरुमाल (विजारीच्या खिशांतील वापरायचा व छातीवरच्या खिशांतील दाखवायचा ), मोजे इत्यादि उपवस्त्रेंहि. इतकेंच नव्हे तर पादत्राण, कमरेचा व घड्याळाचा पट्टा, चष्म्याची फ्रेम यांचाहि विचार होईल. रूढ रंगसंगतीपार जाऊन नव्यांचाहि विचार होईल. तेंच खुद्द कपड्यांबाबतहि.

घरांत • पट्ट्यांचा चटोर पायजमा, किंवा अघळ पघळ धोतर यांऐवजीं सुटसुटीत आणि सोयीस्कर लुंगी वापरावी कां ! "थ्री फोर्थ्स्" विजारीची नेमकी लांबी केवढी असावी ? फेंगड्या पायांना ती साजुन दिसेल का ? लांड्या बाह्यांचा शर्ट अधिक शोभिवंत कीं लांब बाह्या कोंपरापर्यंत दुमडाव्या ? कॉलरचे प्रकार, बटनांची संख्या आणि आकार, इतकेंच काय पण मनगटी घड्याळ डाव्या मनगटावर लावावें कीं उजव्या, आणि तेंहि शर्टाच्या 'कफ'वर बांधावें कां येथपर्यंत बारकावा असेल. पुन्हां 'सब घोडे बारा टक्के' नाहीं. पुरुषांत रंगाप्रमाणें बांधणी-चीहि विविधता असते; कोणी स्थूल, कोणी शेलाटा ( म्हणजे हाडकुळा ), कोणी उंचेला, कोणी टुसका ( म्हणजे ठेंगू ), कोणी कोठें वक्र असें परमेश्वराचें कसब असते. त्याच्या अनुषंगानें, आणि तें शक्यतोंवर झांकलें जावें, असें आपले कसब असावें. शिलाईतच नव्हे तर कापडाचा रंग आणि त्यावरील रेघा, ठिपके व इतर डिझाइन यांच्या निवडींतहि वस्त्र पेहेरणाऱ्याच्या लांबी-रुंदीवर वेतलें पाहिजे. पुरुषांना याची कधीं जाणीव नसते; ती आम्ही करून देऊं. त्या कामीं मुंबईतील घोबीतलावचा प्रसिद्ध शिंपी 'जॉन् डी शिल्वा' याचें तज्ज्ञ साहाय्य आम्हांला मिळणार आहे. त्याच्या पाठीशी पांच पिढ्यांचा अनुभव आहे; आणि दर दोन वर्षांनीं नवी 'फॅशन' रुळविण्याबद्दल त्याचा लौकिक आहे. त्याच्या आणि आमच्या नवनवीन वेष-योजना प्रत्यक्षांत दाखविण्यासाठीं दर अंकांत एखाद्या देखण्या पुरुषाची त्या वेषांत, आणि निरनिराळ्या पोजेस्‌मध्यें, छायाचित्रें देण्यांत येतील. तींहि आर्टपेपरवर. पण 'फॅशन्'च्या गोंडस नांवा-खाली आम्ही उधळमाघळ शिकविणार नाहीं; काटकसरीचेहि धडे देऊं. उदाहरणार्थ, न विरलेला शर्ट फाडून, त्याच्या पाठीचे हात-रुमाल कसे करावे, पुढच्या भागाचा उपयोग बूट पुसण्यासाठीं कसा होईल, बटनें लावायची पट्टी काढून घेऊन तसल्याच कापडाच्या नव्या शर्टला कशी लावावी. असल्या उपयुक्त सूचना देऊं. कपड्याच्या घड्या कशा घालाव्या, घरीं इस्त्री कशी करावी इत्यादि बाबींकडे आमचें लक्ष असेल.

तेंच केशभूषेविषयीं. चेहेऱ्याच्या ठेवणीला शोभतील असे केस कापणें, भांग पाडणें, झुलपें किंवा फुगे ठेवणें वा न ठेवणें याबाबत, तसेंच शोभा आणि निगा या दोहोंसाठीं कोणतीं तेलें व तत्सम द्रव्यें कशी वापरावी याबाबत तपशीलवार आणि सचित्र मार्गदर्शन करूं. तेंच मिशीप्रकरणीं, आणि श्मश्रूप्रकरणीं. दाढी करण्याचा प्रकार साधारणतः एकच. ती सुलभपणें कशी होईल, ती झाल्यावर कसलीं चूर्णें आणि द्रव्यें चोळावी याची चर्चा करूं. दाढी वाढविण्याचे अनेक प्रकार आहेत, त्यांचीहि सचित्र आणि तौलनिक चिकित्सा करूं. कोणती प्रसाधनें केव्हां आणि कशी वापरावी याची माहिती पुरवू. या शिरश्रृंगार-शाखेचे नेतृत्व आचार्य फणींद्र माधव कात्रे करतील एवढें सांगितले म्हणजे पुरे.

पुरुषांच्या मासिकांत पाकशास्त्र, शिवणकला आणि बालसंगोपन ही सदरे असल्याचें वाचून अनेकांना विनोदाची शंका येईल; पण थोडा विचार केला तर हे पटेल कीं पुरुषांना या कला शिकण्याची आवश्यकता आहे. विशेषतः विवाहित पुरुषांना. वरीलपैकीं क्रमांक तीनची कला फक्त विवाहितांसाठींच आहे हें स्त्रियां-नाहि पटेल. पहिल्या दोहोंचें कसें ? त्यांबाबत ब्रह्मचर्याच्या सबबीवर तो इतरांवर अवलंबून राहू शकतो, पण ती सबब आंखडतांच त्याची अवस्था बिकट होते. काटकसरीच्या काचामुळें तो बाजारी कसबहि मिळवू शकत नाहीं. अर्थात स्वस्त्रीठायीचें कसब तत्वतः त्याच्यासाठीच. पण तें कमीअधिक असूं शकतें, आणि समान हक्कांच्या बजावणीचा भाग म्हणून, आणि कधीं सहकार्याच्या सक्तीसाठीं, त्यालाहि ते शिकून घ्यावे लागतें आणि तिच्या गैरहजेरींत तें आचरावेच लागतें. पाकशास्त्राची लहान मोठी पुस्तकें हल्लीं फार प्रसिद्ध होत असतात; तीं

( पान १२० वर पहा )

*गिरगांव म्हणजे मध्यमवर्गीयांचा बालेकिल्ला. मुंबईकर महाराष्ट्रीयांचें मर्मस्थान— अशा या अद्‌भुतरम्य ऐतिहासिक स्थलाचें हें नव-प्रवासवर्णन —*



# माझा गिरगांवचा प्रवास

अनंत काणेकर

कोंकणांतल्या एका कोंपऱ्यांतल्या खेड्यांत मी रहात असतों. तरी पण मुंबईत नोकरी करणाऱ्या आमच्या गांवच्या लोकांनी एक चांगलें वाचनालय आमच्या खेड्यांत उघडलेलें असल्यामुळें वाचनालयांतलीं प्रवास-वर्णनांचीं अलिकडलीं सर्व पुस्तकें मी अधाशासारखीं वाचून काढलीं होतीं. तीं वाचल्यानंतर प्रवासासाठीं मी अगदीं वेडा-पिसा झालों. कांहीं तरी करून कुठें तरी प्रवास केलाच पाहिजे, असा ध्यास माझ्या मनानें घेतला.

मुंबईत गिरगांव नांवाचा जो एक भाग आहे तिथलें सृष्टिसौंदर्य, समाजस्थिति, वास्तु-कला इत्यादिसंबंधीं मी लहानपणापासून किती तरी ऐकलें होतें आणि वाचलें होतें. तेव्हां प्रवासच करायचा तर पहिल्यांदा गिरगांव पाहून यायचें असा निश्चय मी केला. होते नव्हते तितके पैसे गांठीला बांधून बंदरावर गेलों आणि तिसऱ्या वर्गाचें एक तिकिट घेतलें. पडावांतल्या मागल्या उतारूनें ढक-लल्यामुळें शेवटीं सुरक्षितपणें बोटीच्या तळाशीं असलेल्या खड्ड्यांत जाऊन पडलों. बोटी-वरल्या त्या बाराचौदा तासांच्या अवर्णनीय जीवनाचें वर्णन काय करावें ? तरीहि केलें असतें; पण वळकटी सोडून कसातरी पाय पोटाशीं धरून पडलों असतां डोक्या-शींच शेजारच्या उतारूनें ठेवलेली भांड्या-कुंड्यांनी भरलेली गोणी बोट चालू झाल्या-बरोबर खाड्कन् डोक्यावर आदळली, आणि तिरिमिरीमुळें दोन तीन तास तरी मी डोळे उघडून आजूबाजूला पाहूं शकलों नाहीं. पुढें डोळे उघडले आणि आजूबाजूला पाहिलें तेव्हां बायका, पुरुष, पोरें बकाबक एक-मेकांच्या अंगावर ओकत होतीं. त्याचें वर्णन काय करावें ? तेंहि केलें असतें; पण बहुजन समाजाबद्दल लहानपणापासून वाटत असलेला सहानुभूतीचा उमाळा मला आवरतां आला नाहीं, आणि मीहि भडाभड ओकूं लागलों. हैराण होऊन वळकटीवर जें डोकें टेकलें तें दुसऱ्या दिवशीं सकाळीं नऊ वाजतां मुंबईच्या धक्क्याला बोट लागली तेव्हां वर केलें—

एका काखेंत माझी पत्र्याची पेटी आणि दुसरींत वळकटी घेऊन बोटींतून बाहेर पडूं पहाणाऱ्या उतारूंच्या चेंगराचेंगरींत मी धडपडत होतों. इतक्यांत धक्क्यावरून पटा-पट उड्या मारून आंत आलेल्या लाल पैरण-वाल्या हमालांनी आम्हाला वेढा घातला. मी ‘नको’ ‘नको’ म्हणत असतां एका दांडग्या हमालानें माझी पेटी आणि वळकटी काखेंतून हिसकावून घेतली. मुंबईतल्या लोकांचें मला खरोखरच मनापासून कौतुक वाटलें. आपल्या गांवीं येणाऱ्या पाहुण्यांची किती नोंद नीय त्यानीं केली आहे ! पाहुण्यांचें सामान फुकट उचलून नेण्याकरतां माणसें ठेवावीं आणि त्यानीं आग्रह करून पाहुण्याला स्वतःचें सामान वाहूं द्यायचें नाहीं, ही काय लहान-सहान गोष्ट आहे ? अशा विचारांत मी धक्क्यावर येऊन पोहोचलों, आणि हमालाकडून सामान घेऊन पुढें चालूं लागलों. त्या धटिंगण हमालानें माझा दंड पकडला, आणि ‘हमाली दिल्याशिवाय चालला कुठं, भटजी ?’ म्हणून मला दटावलें तेव्हां हें सर्व स्वागत फुकट नाहीं हें माझ्या ध्यानांत आलें. ‘मी तुला सांगितलं होतं का माझं सामान उचलायला ?—तूंच आग्रह करून माझ्या काखेंतलं काढून घेतलंस,’ मी त्याला शांत-पणें म्हणालों. तेव्हां तो अगदींच एकेरीवर येऊन मला हिसड देऊं लागला. कोंकणचें






पाणी प्यालेला मी या मुंबईच्या भामट्यांना दबतों होय ? पहिल्या इतक्याच शांतपणें मी त्याला म्हणालों, ' अंगाला हात लावूं नकोस—तुला काय कायदेशीर इलाज करायचा तो कर. '

कायद्याचें नांव काढल्याबरोबर तो चांगलाच नरमला; आणि शेवटीं दोन रुपये मागत होता त्याऐवजीं चार आणे घेऊन कांहीं तरी मोठमोठ्यानें बडबडत निघून गेला. त्या बहुतेक शिव्या असाव्यात, पण त्याच्या घाटी भाषेंतल्या असल्यामुळें त्या मला समजल्या नाहींत. तेव्हां मी त्यांच्याकडे विशेष लक्ष दिलें नाहीं. तो गेल्यावर मी एक सुटकेचा श्वास टाकला, आणि मुंबई आहे तरी कशी म्हणून वर खालीं पाहूं लागलों. तें धुरकट आकाश आणि पाया-खालची डांबरी जमीन बघून मला कोंकणांतल्या स्वच्छ निळ्या आकाशाची आणि तांबड्यालाल मातीची आठवण झाली. ' अहाहा ', मी मुंबईकरांना उद्देशून मनां-तल्या मनांत म्हणालों, ' काय पण तुमचें आकाश, आणि काय पण तुमची माती ! '

मुंबईतल्या ट्रामगाडीसंबंधीं मी पुष्कळ ऐकलं होतं. ती बघायची मला फारच उत्सुकता होती. एक दोघांना विचारलें तेव्हां त्या कार्न्याक पुलाजवळ ट्राम घेऊन धोबी-तलावाला जा, आणि तिथून दुसऱ्या ट्रामनें गिरगांवांत जा असें त्यांनी सांगितलें. त्या रस्त्यावर आलों आणि इकडून तिकडे जाणाऱ्या ट्रामगाड्या पाहून आश्चर्यानें चकित झालों. ही ट्राम म्हणजे एक अजबच वाहन आहे. आमच्या कोंकणांत दुतोंडें नांवाचें एक जनावर असतें त्याची आठवण मला झाली. या गाडीला मागें आणि पुढें असें वेगळें कांहीं नाहीं. मागेंहि तोंड आणि पुढेंहि तोंड ! एकदां ह्या तोंडानें जायचें ! मी आपला इकडून तिकडे जाणाऱ्या या गाड्यांकडे किती तरी वेळ बघतच राह्यलों.

ट्रामगाड्याप्रमाणेंच मुंबईच्या बायकां-संबंधींहि मी पुष्कळ ऐकलें होतें, आणि त्यानाहि बघायला मी फार उत्सुक होतों. लवकरच त्यांचा मला पुष्कळच अनुभव आला. धोबीतलावाकडे जाणाऱ्या ट्राममध्यें एका बाकावर जाऊन मी बसलों. इतक्यांत माझ्याच बाकावर एक झकपक रेशमी साडी नेसलेली सुंदर लठ्ठ बाई मला अगदीं चिकटून, —चिरडूनच म्हणाना—बसली. मी आनंदानें डोळे मिटून घेतले. मला फारच बरें वाटलें, किती प्रेमळ या मुंबईतल्या स्त्रिया—नाहीं तर आमच्या कोंकणांतल्या बायका ! मी असा विचार करतों आहे, इतक्यांत कंडक्टर तिकिट मागायला आला. इतक्या प्रेमळपणें मला खेटून बसलेल्या त्या उदार स्त्रीच्या सौजन्याची आपण कांहीं तरी परतफेड करावी या सात्त्विक इच्छेनें मी तिच्याकडे पाहून कंडक्टरला दोन आणे देऊन दोन तिकिटें द्यायला सांगितलीं. त्यानें दोन तिकिटें दिलीं आणि तो पुढें जाऊं लागला. तिनें ' कंडक्टर, कंडक्टर ' म्हणून हांक मारून आपला एक आणा तिकिटासाठीं त्याला ती देऊं लागली. माझ्याकडे बघून ' यानीं तुमचं तिकिट घेतलंय् ' असं तो म्हणाला; त्यासरशीं आश्चर्यानें ती माझ्याकडे बघूं लागली. मी हंसरा चेहेरा करून तिला एक तिकिट देऊं लागलों, तेव्हां तिनें तें चोळानोळा करून खालीं टाकलें, आणि हिंदी कीं सिंधी भाषेंत ती तडातडा बोलूं लागली. ट्राममधले सगळे लोक माझ्याकडे पाहूं लागले. शेवटीं एक तिकिट कंडक्टरकडून घेऊन माझा बाक सोडून दुसऱ्या बाकावर जाऊन ती बसली. मी मनांत म्हटलें, जाईना—आपण आपलें कर्तव्य केलें.

कांहीं वेळानें माझ्या बाकावर एक आणि माझ्या मागल्या बाकावर एक असे दोघे—केंसाची झुलुपें राखलेले, तंग सदरे चड्ड्या घातलेले तरतरीत चेहेऱ्यांचे पोरगे येऊन बसले. त्यांच्या हातांत पुस्तकांबरोबर कसल्या तरी खेळायच्या काठ्या होत्या. एकमेकांशीं मराठींत बोलतांना ते एकमेकांना ' अग ' म्हणायला लागले तेव्हां मी स्तंभितच झालों.

# रेडियमच्या जंगलांप्रमाणें—

— दिलीप पुरुषोत्तम चित्रे



रेडियमच्या जंगलांप्रमाणे हिमांध रात्रींतल्या
मी प्रकाशतों...पेटतों...विझतों...अर्ध-स्वर्गीय शय्येवर
या शिलगणाऱ्या गारव्याखालीं गीतें हालतात वाळूवर
आपल्या दोघांच्या सांवल्या मिसळतात अधीर धरणींतल्या

पाजळलेल्या वाऱ्याप्रमाणें अंतराळ भोसकणाऱ्या
या पुनवेच्या—वादळांत...तूं उभी...
पेट घेणाऱ्या शून्यांमधून...तूं उभी...
मला दिपतेस या निःशब्द स्फोटांतल्या

अनादि महासागरांची होते एकच लाट उंच
आणि चंद्रचुंबी वादळांच्या चांदण्या उधळतात
काळोखाच्या वलयांत शून्य निस्तब्ध होतात

रेडियमच्या जंगलांप्रमाणें अर्धोज्ज्वलित समुद्रांत
आपली शरीरें दोलायमान होतात विझत्या लाटांवर
अनादि अंगांगांची उडते वाळू उंच उंच.

मला रहावेना. मी त्यांना म्हणालों, 'अरे तुम्ही मुलगे असतांना एकमेकांना अग'अग काय करतां ?' ते मोठमोठ्यानें हंसू लागले. 'अहो, भटजी, आम्ही मुली आहोंत!' माझ्याशेजारीं बसलेला पोरगा हंसत म्हणाला. असतील मुली; पण कशावरून त्यांना मुली म्हणायचें तें मला कळेना.

धोबीतलावाला ट्राम बदलून दुसऱ्या ट्राममध्यें चढलों. तिथें आणखी एक अजब अनुभव आला. गाडींत फारशी गर्दी नव्हती. बायकांसाठीं राखून ठेवलेल्या दोन बांकापैकीं एकावर लुगडें नेसलेलें, हातांत बांगड्या असलेलें कुणी तरी बसलें होतें—निरखून पाहिलें, तों गणपतीचे दिवस असल्यामुळें मुंबईचे बालेगडी नाच करतात त्यांच्यापैकीं बायकोचें सोंग काढलेला तो बाल्यागडी होता. बायकोचें सोंग असलें तरी त्याच्या मिशा जशाच्या तशा होत्या. गाडीचा कंडक्टर भला धिप्पाड, अगडबंब भय्या होता. आम्हाला तिकिटें देत देत तो त्या बाकाकडे गेला. या लुगड्यांतल्या बाल्याला पाहून तो एकदम खेकसला, 'एः, ये जगा बाईलोकके वास्ते है—उठो उदरसे!' ऐटींत पाय सोडून त्या बाकावर बसलेला बाल्या शांतपणें म्हणाला, 'हम् बायको है!' तो अगडबंब भय्या बावळट चेहेरा करून 'त-त-प-प' करीत इकडे तिकडे पाहूं लागला. ट्राममधले सर्व लोक—बायकासुद्धां खो खो खो करून हंसू लागल्या. भय्या फार बावरला. मिशाचेहेरा पुरुषाचा असला तरी लुगडेंचोळींतला, 'हम बायको है' म्हणणारा तो बाल्यागडी बायको नाहीं, हें तिथें कसें सिद्ध करायचें? गुपचूप त्या बाल्याला एक तिकिटे देऊन खालीं मान घालून तो कंडक्टर मागें जाऊन उभा राहिला. बायको कोण आणि पुरुष कोण हें ओळखणं मुंबईत खरोखरच कठीण आहे.

चिराबाजार या मुंबईच्या प्रख्यात बहुरंगी, बहुढगी, 'कॉस्मॉपॉलिटन्' वस्तींतून आमची ट्राम गिरगांवाकडे चालली होती. हिंदु, किरिस्तांव, मुसलमान, गुजराती, पारशी नाना प्रकारचे लोक रस्त्यांत दिसत होते. ट्राम एके ठिकाणीं उभी राहिली असतां समोरच्या दुकानाच्या पाटीकडे माझें लक्ष गेलें. गोव्याच्या किरिस्तांवाचें तें कापडाचें दुकान होतें. हिरव्या, लाल, काळ्या, पिवळ्या रेघांच्या किंवा चौकटीच्या साड्या आणि कांहीं पांढऱ्या कापडाचे तागे कांहीं फळ्यांवर धूळ खात पडलेले दिसत होते. दुकानाचा मालक पेटवलेल्या चिरूटांचें शेपूट चघळीत पॉलिश उडून गेलेल्या एका भकास बाकड्यावर बसला होता. मला विशेष पहाण्यासारखी वाटली दुकानाच्या दारावरली पाटी. त्या पाटीवर रोमन लिपींतलीं के, ए, पी, ए, डी, ए, एन्, सी, एच्, ई, एन् व पुढें डी, यू, सी, ओ, एन् अशीं अक्षरें होतीं. मला पहिल्यांदा या अक्षरांचा कांहींच बोध होईना. मग एकदम माझ्या लक्षांत आलें कीं 'कापडांचें दुकान'! रोमन लिपींत लिहिलेलीं तीं कोंकणी किंवा मराठी भाषा होती.

मला वाटतें हीच ती चारशें वर्षांच्या फिरंगी संस्कृतीच्या सहवासानें निर्माण झालेली गोव्याची स्वतंत्र अस्मिता. या दुकानाचें रंग, रूप आणि लिपि पाहून मला तिचा एकदम साक्षात्कार झाला. पोर्तुगिजांच्या बंधनांतून गोमन्तक मुक्त झाला तरी त्याचा महाराष्ट्रांत समावेश न करतां त्याचें एक स्वायत्त राज्य भारतांत ठेवावें असें काका कालेलकरादि थोर पुढाऱ्यांना कां वाटतें तें एकदम माझ्या ध्यानांत आलें.

पुढें ठाकुरद्वारच्या बाजूनें ट्राम चालली असतां 'हेंच तें गोऱ्या रामाचें देऊळ!' म्हणून, माझ्या शेजारीं बसलेल्या एका माणसाला मी 'हें काय?' 'तें काय' म्हणून विचारीत होतों, त्यानें सांगितलें. देवळाच्या दाराशीं 'रस्त्यावर एक मोठी थोरली परभी पागडी धातलेले म्हातारे पाठारे प्रभु गृहस्थ उभे होते. 'रामाचें देऊळ' हे शब्द ऐकल्याबरोबर ट्रामच्या खिडकींतून डोकें व हात बाहेर काढून मी भक्तिभावानें नमस्कार केला. त्या प्रभु म्हाताऱ्याला वाटलें मी त्यालाच नमस्कार केला; आणि त्यानें मला उलट नमस्कार केला! रामाला केलेला माझा नमस्कार त्यानें असा मध्येंच झेलून घेतलेला पाहून मला त्याचा राग आला. पण तितक्यांत काळ्या रामाचें देऊळ!' असें शेजाऱ्यानें सांगितलें, तेव्हां ताबडतोब मी काळ्या रामाला नमस्कार ठोकला. 'काळा राम' आणि 'गोरा राम' अशीं हीं जवळजवळच रामाचीं दोन मंदिरें कां? असें मी शेजाऱ्याला विचारलें; तेव्हां तो म्हणाला, 'काळ्या रंगाच्या स्त्रीपुरुषांसाठीं काळ्या रामाचें देऊळ आहे, आणि गौरवर्ण लोकांसाठीं गोऱ्या रामाचें आहे.' प्रत्येक गोष्ट इतक्या







अनुक्रमणिका

व्यवस्थितपणें करणाऱ्या मुंबईच्या लोकांचें मला अतिशय कौतुक वाटलें.

मुगभाट, कांदेवाडी, केळेवाडी, निकदवरी लेन, खोताची वाडी वगैरे गिरगांवाचे जगद्विख्यात भाग ट्राममधूनच पहात पहात मी गिरगांवच्या नाक्यावर उतरुन गोरेगांवकराच्या चाळींत माझ्या बायकोचा भाचा रहातो त्याच्याकडे मुक्कामाला गेलों. स्नान, भोजन, वामकुक्षी केल्यानंतर गिरगांवांतलीं ऐतिहासिक स्थळें पाहायला बाहेर पडलों. मी उतरलों होतों ती गोरेगांवकराची चाळ हेंसुद्धां गिरगांवांतलें एक मोठें ऐतिहासिक स्थळ आहे. वास्तुकलेंतल्या चाळ या प्रकाराचा हा एक उत्कृष्ट नमुना समजला जातो. एकामागें एक अशा गोरेगांवकरांच्या एकाहून एक भव्य सहा चाळी आहेत. मुंबईवर चालुक्य वंशाचें राज्य कांहीं शतकांपूर्वी होतें. त्या वंशांतल्या चाळके आडनांवाच्या गृहस्थानें चाळ हा वास्तुप्रकार पहिल्यांदा निर्माण केला, असें वास्तुशास्त्राचे तज्ज्ञ सांगतात. चाळीमध्यें शेंकडो कुटुंबें एकमेकांना चिकटून रहातात, आणि प्रत्येक मजल्यावर एखादाच पाण्याचा नळ असल्यामुळें या कुटुंबांचे अत्यंत घनिष्ठ संबंध निर्माण होतात. खासगी जीवन असें कांहीं उरतच नाहीं. त्यामुळें समाजशास्त्रावरसुद्धां वास्तुकलेच्या या प्रकाराचे गंभीर परिणाम झाले आहेत असें म्हणतात.

गोरेगांवकरांच्या चाळींतून बाहेर पडल्यानंतर कांहीं पावलें समोरच्या रस्त्यावर चालल्याबरोबर गिरगांवातल्या प्रार्थनासमाजाची इमारत दिसूं लागली. डॉ. रामकृष्णपंत भांडारकर, न्यायमूर्ति चंदावरकर वगैरे महाराष्ट्रांतल्या थोरथोर पुरुषांनी ज्या मंदिरांत उपासना आणि प्रवचनें केलीं तें एकदां डोळे भरून पहाण्याची मला लहानपणापासून इच्छा होती. आंत जाऊन पायऱ्या चढूं लागलों तों लहान पोरांच्या किनऱ्या आवाजांत एक प्रार्थनागीत चाललेलें कानांवर येऊं लागलें. प्रार्थनासमाजाच्या सभासदांची नवी पिढी प्रार्थना करीत असावी, असें मला वाटलें. मंदिरांत पाऊल टाकलें तों खाकी चड्ड्यांतलीं शाळेंतलीं पोरें मास्तर शिकवीत असलेलें कसलें तरी संघगीत उभीं राहून म्हणत असलेलीं दिसलीं. या इमारतींत सध्यां एक मोठी शाळा चालू आहे, असें कळलें. तिथल्या मास्तरांना जवळपास गिरगांवातलीं आणखीं कोणतीं ऐतिहासिक स्थळें पहाण्यासारखीं आहेत म्हणून विचारलें तेव्हां समोरच्या चाळीकडे बोट दाखवीत ते म्हणाले, ' ही कॉन्ट्रॅक्टर बिल्डिंग. या चाळींत तें कुळकर्ण्यांचें चहाचें दुकान दिसतें ना ? त्यांत गिरगांवाचा अत्यंत उज्वल इतिहास घडला आहे. संध्याकाळच्या वेळीं इथें तळलीं जाणारीं बटाट्याचीं भजीं आणि सुकी भाजी त्रिभुवन-विख्यात आहे. हीं भजीं आणि भाजी खाल्लेला माणूस पुढें मग पृथ्वीवर असो, पाताळांत जावो कीं स्वर्गात चढो, त्याला त्यांचें विस्मरण होणार नाहीं. गिरगांव म्हटलें कीं त्याला या भज्यांची आठवण होणारच. अहो, एकदां गिरगांवात राहिलेला माणूस पुढें कधीं दादर, अंधेरी, बोरीवलीला जरी राहायला गेला, तरी कोटांतल्या कचेरींतून सुटल्यानंतर आधीं गिरगांवात येतो, इथें भजीं सुकीभाजी खातो आणि मग दुसऱ्या गाडीनें पुढें घरीं जातो —'

' म्हणजे—', मी उद्गारलों.

' अहो, म्हणजे काय ? ', मास्तर मला अडवून म्हणाले, ' महाराष्ट्रांत आतां मोठे डॉक्टर, वकील, न्यायाधीश, नट, प्राध्यापक, मंत्रि, लेखक म्हणून मशहूर झालेल्या किती तरी लोकांची बुद्धिमत्ता या भज्यांवर पोसली गेली आहे. महाराष्ट्र, गंधर्व वगैरे नाटक मंडळ्या पूर्वी इथेंच जवळपास असलेल्या घरांत उतरत असत. आतां प्रसिद्ध असलेले किती तरी लोक शिकत असतांना या चाळींत किंवा आसपासच्या चाळींत रहात असत. ही सर्व मंडळी नियमानें या दुकानाला आश्रय देत असत ही गोष्ट त्यांचेच मित्र आणि नातेवाईक अजूनहि मोठ्या अभिमानानें सांगतात.

अनंत काणेकर या लेखकाचें नांव तुम्ही ऐकलंय का ?—'

' वः ऐकलंय् म्हणजे ? ', मी म्हणालों, ' त्यांनी प्रवासवर्णनं लिहिलीं आहेत. त्यांचीं सगळीं प्रवासवर्णनं मी वाचून टाकलींत. त्यांचें काय ? '

' ते याच कॉन्ट्रॅक्टर चाळींत लहानपणापासून कित्येक वर्षें रहात असत, ' मास्तर म्हणाले.

' काय, म्हणतां काय ? ' मी किंचाळलों.

' अजूनहि गिरगांवांत कांहीं कामाकरतां आले कीं इथलीं भजीं खाल्ल्याशिवाय ते जात नाहींत, ' मास्तर सांगूं लागले, ' मधाशीं त्यांच्यासारखा कुणीतरी आंत शिरतांना मी पाह्यला ! '

' असं ? ' मी उत्सुकतेनें म्हणालों, ' तर मग जातोंच मी त्या दुकानांत. काणेकर दिसोत न दिसोत, तीं इतिहासप्रसिद्ध भजीं आणि सुकी भाजी तरी खाऊन घेतों. '

दुकान रस्त्यावर होतें, पण मागल्या बाजूला चाळीच्या तळमजल्यावरल्या सर्व खोल्या दुकानाच्याच होत्या. खोल्यांत, गॅलरींतल्या बाकावर आंत, बाहेर बसलेले लोक चहाभजीं फस्त करीत होते. प्रत्येक खोलींत








डोकावून मी इकडे तिकडे पाहिलें. एका खोलींतल्या कोपऱ्यांतल्या टेबलावर पुस्तकांतल्या चित्रांत पाहिलेल्या काणेकरासारख्याच दिसणारा एक गृहस्थ मोठ्याथोरल्या बशींत डबलप्लेट भर्जी घेऊन शांतपणें खात बसलेला दिसला. तिथें काम करणारा हॉटेलचा पोऱ्या आमच्या कोंकणांतलाच दिसला. त्याला जवळ बोलावून मी हळूच विचारलें, 'त्या कोपऱ्यांत अगदीं चटणींत बुडवून एकएक भर्जे चवीनें खात बसलेले ते अनंत काणेकरच काय रे?' तो म्हणाला,'हो. काणेकरच ते. आम्ही सर्व त्यांना ओळखतों. आमच्या मालकांचे फार जुने मित्र आहेत ते. त्यांना निवडक भर्जी आम्हीं देतों. लेखन करतांनाहि एकाग्रचित्त होत नसेल इतक्या एकाग्रचित्तानें महाराष्ट्राचा हा ख्यातनाम, प्रथितयश वगैरे वगैरे लेखक आपल्या डोळ्यासमोर भर्जी खात बसला आहे, हें मला खरेंच वाटेना. पण तें सत्य—अगदीं निर्भेळ सत्य होतें. आपल्या गिरगांवच्या प्रवासवर्णनांत घालायला बरा मालमसाला मिळाला म्हणून जिभल्या चाटीत मीहि दोन बशा भर्जी मागवलीं, आणि त्यांच्यावर यथेच्छ हात मारून मोठ्या आनंदानें प्रवासवर्णन लिहून काढायला गोरेगांवकरांच्या चाळींत परत आलों.

• • •





( पान ११४ वरून चालू )

वाचणें स्त्रियांना फार आवडते. त्यांचा उपयोग मात्र अधिक करून पुरुषांनाच होतो. पण पुरुषांसाठीं तसलें सुटसुटीत पुस्तक कोणी प्रसिद्ध करीपर्यंत त्यांच्यासाठीं आम्ही एक सदर चालवूं. वेळखाऊ, पैसेखाऊ आणि दिखाऊ पदार्थाऐवजीं साधे, स्वस्त आणि रुचकर पदार्थ आम्ही देऊं. पिस्त्यांची चटणी अथवा रताळ्याची बिर्यानी (उपासाची) असले चमत्कार नकोत; पुरुषासारख्या पुरुषाला चहा कसा करावा, कुकरमध्यें भात-डाळ-भाजी कशी शिजवावी आणि राहावलेंच नाहीं, तर अंडें कसें उकडावें अथवा तळावें, अथवा (महत्त्वाकांक्षा फारच पेटली, तर) त्याचें ऑम्लेट (सारखें कांहींतरी) कसें करावें, इतकें किमान आलें पाहिजे. येईल, फक्त आत्मविश्वास हवा. गृहिणीच्या देखरेखीखालीं सगळें करतांना तो डळमळतो, इतकेंच. तेंच शिवणकलेविषयीं. तुटलेलें बटण लावतां येणें, थोडेसें उसवलेलें शिवणें, फाटलें असल्यास साफ छाटून टाकणें, हा स्त्रीवर्गाच्या हातचा मळ असा समज. पुरुषांच्या हातांनीं काय पाप केलें आहे? याबाबतहि आम्ही वाचकांना शिक्षण देऊं. म्हणजे असल्या जुजबी गरजांसाठीं त्यांना तोंड वेंगाडावें लागणार नाहीं.

बालसंगोपन ही पुरुषांची नवी जबाबदारी. पूर्वीं म्हणे बापानें मुलाला उचलून घेणें अशिष्ट मानीत. आतां बाप हाताशीं असतां आईनें मुलाला उचलून घेणें अशिष्ट मानलें जाईल कीं काय, अशी शंका वाटते. तेंच खेळविण्याविषयीं. त्यांत चूक आहे असें नाहीं. आईला अन्य अवधानें सांभाळायचीं असतात आणि मुलाची नीट वाढ झाली पाहिजे. तेव्हां मुलाची स्नानादि साफसफाई, त्याची वेषभूषा, त्याच्या मनोरंजनासाठीं (वयाच्या गटाप्रमाणें) विविध आवाज काढणें, मूल ज्याला गाणें म्हणतें ती क्रिया करणें ('अंगाई' हा त्यांतीलच एक प्रकार), गोष्ट सांगणें आणि वेळप्रसंगीं उड्या मारणें इत्यादि कर्तव्यें बापाला पार पाडावीं लागतात. सरावानें तीं जमतातच, पण सराव होईपर्यंत कोणीतरी सांगायला हवें. आई बापाला सांगायची नाहीं कारण (त्यांतलें तिला कांहीं येत असलें तरी) अपत्याचें प्रेम मिळविण्याबाबत चढाओढ असते एक बाप दुसऱ्या बापाला विचारायचा नाहीं कारण आपल्याला घरीं असें करावें लागतें हें कबूल करण्याची लाज वाटते. आमचें मासिक याविषयीं आवश्यक माहिती पुरवील. केवळ बालसंगोपनाची 'कृती'च नव्हे तर बालमानसशास्त्र, नवख्या बापानें कसें वागावें वगैरे विषयासंबंधीं वेळोवेळीं लेख प्रसिद्ध होतील. परदेशीं काय परिस्थिति आहे याचाहि तौलनिक विचार होईल. 'अमेरिकेंतील बाप' यावर तीन (भाषांतरित) लेख तयार आहेत.

असे विषय अनंत आहेत, पानें थोडीं. पुरुषजीवन समृद्ध करणें हें मासिकाचें ध्येय. त्या जीवनाची अंगें केवढीं विविध आहेत; त्यापैकीं बहुतेक आजवर दुर्लक्षिली गेली आहेत. त्यांचा योग्य परामर्श घेतला तर नव्या युगांत पुरुषाला आपली कर्तव्यें यशस्वीपणानें पार पाडतां येतील. नुसतीं कर्तव्येंच नव्हे तर सुखेंहि; तींहि अंगीं लागलीं पाहिजेत, मोठी काय किंवा लहान काय यासाठीं पान कसे लावावें, तंबाखूच्या जाती आणि त्याचे गुणधर्म, धूम्रपानाचें तंत्र असले विषयहि या मासिकाच्या कक्षेंत येतील. आमची गाढ निष्ठा आहे कीं हें मासिक पुरुषजातीची सर्वांगीण सेवा बजावील.

या मासिकाचें नांव अजून आम्ही निश्चित केलेलें नाहीं. वर दिलेले ध्येय व कार्यपद्धति ध्यानांत ठेवून प्रिय वाचकांनीं नांवें सुचवावींत. जे नांव निवडलें जाईल तें सुचविणाऱ्यास पारितोषिक दिलें जाईल. आतांपर्यंत पुढील नांवें आलीं आहेत. 'गृहस्थ" 'श्रीयुत 'मर्द', 'सखा', 'नरका नारायण'. नांवांत काय आहे हें शेक्सपिअरपासून शाळकरी मुलांमुलींपर्यंत अनेकांनीं हजारों वेळां म्हटलें आहे—तेव्हां तें खोटें नसावें. मात्र अशा मासिकाची आवश्यकता आणि हा आराखडा आमच्या पुरुष वाचकांना आवडला आणि पटला असेल अशी आशा आहे.

• •

अनुक्रमणिका

# रात्र झाली गोकुळीं

— जी. ए. कुलकर्णी

जमिनींतून विशाल कारंजा निघून हिरवा गोठून गेल्यांप्रमाणें दिसणारे ते चांफ्याचें प्रचंड झाड परसांत अगदीं मध्येंच होते. त्याचीं मुळें आजूबाजूच्या पांचसहा घराखालीं गेलीं असतील. रात्रीं वाऱ्यांत तें झाड हजार पानानें सळसळूं लागले कीं अर्ध्या गल्लीची झोंप आपल्या फांद्याप्रमाणें चाळवे. त्याच्या भोंवतालीच समोरच्या बिऱ्हाडांतील भांडीं घांसण्याची जागा होती, आणि तेथें सदोदीत राख, काश्याखापरींचे तुकडे पडलेले असत. परवां पावसाळ्यांत डाव्या बाजूची भिंत मध्येंच कोसळली. त्यामुळें रस्त्यावरील पाणी सरळ आंगणांत साठूं लागले, आणि ते काळबंडले. त्या सतत ओलीमुळें गोकुळचा उंबरठा हिरवाचार होऊन शेवाळानें निसरडा झाला.

मागच्या बाजूला असलेलें हें घर म्हणजे एकच सोपा होता. पण वारणाईनें तट्टी बांधून त्यांत एक लहानशी खोली केली होती. दुसऱ्या बाजूनें रॉकेलचे डबे उघडून तात्पुरती भिंत झाली होती. सुरवातीला तो पत्रा झगझगीत दिसे पण दोन पावसाळ्यांतच तो तांबरला व त्याला बारीक भोकें पडली. तट्टींतच वारणाईनें चौकोनी भोक पाडून छोटीशी खिडकी केली होती, परंतु नंतर तिच्या कडा बोंदऱ्या होऊन ती वेडीवांकडी झाली. शिवाय नंतर तट्टीला तशीच अनेक भोकें पडल्यामुळें मूळची खिडकी कोणती हेंच समजेनासे झाले. त्या साऱ्यामुळें आंत चूल सुरूं झाली कीं धूराच्या अनेक पट्ट्या त्यांतून निघत. बाकीच्या बिऱ्हाडांना परसांत यायला रस्ता तेथूनच होता, आणि तेथें सांदरींतून आंग तिरपें करून जावे लागे. भाजी किंवा तांदूळ निवडायचे झाले कीं अर्धवट आंत, रस्त्यावर बसावे लागे. अशाचवेळीं नेमकें कुणीतरी परसांत जायला यायचे. मग सारे गोगलगाईच्या शिंगाप्रमाणें आंत घ्यावें लागे. ते लोक धूरामुळें वारणाईला ऐकूं जातील अशा शिव्या देत. पुष्कळदां तोंड आवळून वारणाई गप्प बसे. पण मध्येंच कधींतरी आंगांत भूत शिरल्याप्रमाणें प्रत्येक बिऱ्हाडाच्या परसांत जाऊन हातवारे करत भांडून येत असे.

मागच्या बाजूला जुनेऱ्याएवढी मोकळी जागा होती. तेथें अनेकवर्षें मोकाट वाढलेले रानवट द्राक्षालाचे झाड होते, व त्यावर नेहमीं अर्धवट उघडलेली करंगळीएवढी लाल फुलें असत. मग उरलेल्या कोंपऱ्यांत वारणाईनें कुठूनतरी आणलेले गुलबासाचे झाड लावून टाकलें इतकीं माणसें परसांत जात, परंतु त्याकडे कधीं कुणाचें लक्ष गेले नाहीं. पण तें मात्र मोरीच्या पाण्यावर समाधानानें वाढत होते व सूपभर निरुपयोगी फुलें फुलवत होते.

असल्या मळक्या पायरीला स्पर्श करावा कीं नाहीं अशा तऱ्हेनें ऊन्ह पायरीपर्यंत आले व वारणाईचा दुपारचा शांत, सुखाचा एक तास चुटकी सारखा संपला. तो एकच तास तिचा खासगी. त्यावेळीं शकी दवाखान्यांत कामाला गेलेली असे. कृष्णा शाळेत, दाजी तर आठ वाजेपर्यंत घरीं येत नसे. घरीं राहतां राहिली दुर्गी, पण ती हल्लीं अगदीं अबोल झाली होती. चार गोष्टी बोलत बसाव्यात म्हटलें कीं पांचदहा मिनिटांतच ती कंटाळत असे. तिचें मन कुठेंतरी भरकटत असल्याप्रमाणें ती आपल्यांतच आंखडून बसूं लागली होती. सारीं दुपारभर परसांतल्या जुन्या खुर्चीवर बसून ती तींच तीं पांचसहा पुस्तके सदा वाचत असे, मध्येंच द्राक्षाळाची मुक्या कळ्या असलेली फांदी तोडून कुसकरून टाकत असे. समोरच्या बिऱ्हाडांचे दरवाजे तर बहुधा बंदच असत. त्यांचे जग वेगळे, त्यांचे दरवाजे आपणाला नेहमी बंद. वारणाई त्या प्रत्येकाशीं कधीं ना कधींतरी भांडली होती. पण त्यांनीं कधीं तिला पापड करायला, सांडगे घालायला बोलावले असते तर ती आनंदानें गेली असती ! पण नाहींच. समोरच परवां मुंज झाली, पन्नास माणसें जेवून गेली, पण आमंत्रणाचे चार तांबडे तांदूळ कांहीं वारणाईला मिळाले नाहींत.

गुडघे दाबत वारणाई उठली व तिनें पाठीवर पदर सावरून घेतला अद्याप हौदांत पाणी घालायचे होते. पाणी ओढायचे म्हणतांच तिच्या आंगावर शहारा आला. आतां तिला पाणी ओढणें होत नसे, आणि मध्येंच जर का भिंगरी फिरल्याप्रमाणें खोकल्याची उबळ आली कीं हात दुबळे होत, व घागरीबरोबर आपणहि आंत जातो कीं काय अशी तिला भीति वाटे. पाणी झाल्यानंतर चूल तेथें होणारा सगळाच धूर आपल्या नाकाडोळ्यांत जातो कीं काय असें तिला नेहमीं वाटत असे. पण या गोष्टी काय टाळण्याजोग्या असतात ? असा विचार करून ती आंत आली, व परसांत गेली. तेथील खुर्चीवर तळहातावर हनुवटी ठेवून दुर्गी उगीच बसली होती, आणि तिचें पुस्तक खालीं पडले होते.

" दुर्गी, काय ग हें ? अशी काय बसलीस करकऱ्या वेळीं ? " वारणाई म्हणाली, " पितेस काय चाय कपभर ? "

ती एकदम बोलल्यामुळें दुर्गी एकदम दचकली व तिनें आंग आकसलें.

" छे छे नको. आतां शकी कृष्णा येतील, मग बघूं " ती लगबगीनें म्हणाली. ती उठली व पुस्तक तिनें तेथल्याच कोनाड्यांत ठेवलें " मी पाणी ओढूं कां दोनचार बादल्या ? "

" अग कसलं पाणी, आहे तर सारं दोन घागरी," वारणाई










आणि दुर्गीचें आयुष्य फाटून गेलें. तिनें फटींतून पाहिलें, तिचा विश्वास बसेना, पण दुसऱ्यांदा हसण्यानें तिची खात्री झाली. ती शकीच होती, व लक्ष्मणाला बिलगून बसली होती.

म्हणाली, पण तिला एकदम खोकल्याची उबळ आली. ती पांच मिनिटें खोकत होती, व नेहमींप्रमाणें मग तिची छातीची हाडं दुखूं लागलीं. तिनें डोळ्यांतील पाणी पुसलें, व ती उगाचच हंसली. "मी करते सारं. अग, उद्यां तुझा संसार सुरू झाला म्हणजे आहेच सगळं. पण इथं मी जिवंत असेपर्यंत तुला विहीरीकडे पाठवणार नाहीं. तूं थोडे दिवस गप्प पडून रहा. बघतर नुसतं हाडकातडं राहिलंय. शकीच्या त्या दवाखान्यांत दाखवून तरी का येत नाहींस एकदां ?"

दुर्गी गप्प राहिली, पण ती शरमली. तिला वाटलें, मला डॉक्टर काय करायचा ? माझं दुखणं मला माहीत ! पहिली मुलगी म्हणून वारणाईनें तिला अगदीं सायीसारखं वाढवलं होतें. आतां तिच्या वहाणा मळून गेल्या, त्यांना दहावेळां तुकडे जोडले गेले पण त्या मखमली, किंमती होत्या. दुर्गीनें झाडणीला नुसता हात लावलेला तिला खपत नसे. पण ती हल्ली खंगली होती. तुळशीचा काढा, डिंकाच्या लाह्या, सारें कांहीं झालें. पण ती कांहीं केल्या आंगच धरेना. तिनें हात वर केला कीं बांगड्या कोंपरापर्यंत उतरत.

"मग मी भाजीतरी चिरते," दुर्गी हट्टानें म्हणाली, ती उठली तिनें दहाबारा पिवळसर, डोरली वांगीं आणलीं. ती वांगीं अगदीं तुरट, खूप बिया असलेलीं असत. पण तीं आण्याला ढीगभर मिळत. त्यांच्या फोडी करून आमटींत टाकल्या कीं तिच्यांत डाळ नाहीं, मसाला नाहीं हें ध्यानांत येत नसे.

वारणाईनें घागर उचलली, पण तिला तें सारें नकोसे वाटलें. उद्यां सकाळीं कृष्णालाच दोन घागरी ओतायला सांगावे असा तिनें विचार केला. तिनें घागर ठेवून दिली व चूल पेटवली. घरीं लांकडावरील सालीच वापरत असल्यानें तासभर धूर कोंडून रहात असे. तसल्याच चुलीवर वारणाईनें सकाळींच करून ठेवलेल्या गुळाच्या चहाचें पातेलें ठेवलें. आतां संध्याकाळीं काय हा दररोजचा प्रश्न उभा राहिला, कारण मूठभरहि तांदूळ नाहींत तिला पूर्ण माहीत होतें. पण तिनें डबा काढून मुद्दाम पाहिलें. सारे धान्याचे डबे एका बाजूला आडवे टाकलेल्या बाजल्याखालीं होते.







हें दुसऱ्या डब्यांत फारतर मूठभर डाळ असेल. एकांत मात्र डांगराचें पीठ होतें. त्यांत गांठी गांठी झाल्या होत्या, त्या तिनें काढून टाकल्या व बचकभर पीठ पातेल्यांत घेतलें, झाली संध्याकाळच्या जेवणाची तयारी! तिनें कपाळाला हात लावत म्हटलें कधीं घरीं येतोय शकीचा पगार, देव जाणे!

मागचा दरवाजा धड्कन उघडला व कृष्णा धांवतच आला. त्यानें दप्तर तेथेंच खांद्यावरून खालीं सरकवलें व तो आंत आला. दुर्गी वाटेंत होती, व त्याच्या ठेंचाळण्यानें तिच्यापुढील चिरलेल्या फोडींचे ताट उलटें झालें.

"काय डोळे आहेत कीं परत्र्याची भोकं आहेत?" ती रागानें म्हणाली.

"मग तूं वाटेंत कशाला बसावंस म्हशीसारखं?" त्या फोडी गोळा करण्यासाठीं बिलकूल न थांबता आंत जातांना कृष्णानें उत्तर दिलें.

त्याचा चहा अद्याप गरम झाला नव्हता, तेव्हां तो चिडला. त्यानें दणादणां पाय आपटायला सुरवात केली. "मग आम्हांला भूक लागतेय. चहासुद्धां देत नाहींत घरी वेळेवर —"

वारणाईनें बोलायला तोंड उघडलें, पण पुन्हां छातींत खसखसलें, व ओठ आवळून ती गप्प राहिली. थोड्या वेळानें तिनें वळून पाहिलें. कृष्णा परसांत जाऊन उभा राहिला होता. समोरच्या घरांतील मुलांनीं पोह्याच्या ताटल्या बाहेर आणल्या होत्या. आपल्या घराकडे भीत भीत पहात कृष्णानें एकापुढें हात केला होता व त्यावर त्या मुलानें आपला रिकामा हात फटदिशीं मारला होता.

"कृष्ण्या, भिकारड्या," वारणाईनें संतापानें हांक मारली. कृष्णा आंत येऊन तिच्यासमोर रागानें बसला. "तुला काय लाजबीज आहे कीं नाहीं! घे तुझा चहा. अगदीं दुष्काळांत जन्मलंय कारटं!" वारणाईनें कोमट झालेला काळसर चहा बद्कदिशीं कपांत ओतला, कप त्याच्यापुढें आदळला.

समोर फक्त चहाच पाहून कृष्णाचें तोंड गाढग्यासारखें झालें. "नुसताच चहा प्यायचा?" त्यानें चिडून विचारलें. "ते कालचे चुरमुरे संपले?"

तेलांत तळून त्यांना हळद लावून थोडे चुरमुरे वारणाई कधीं तरी घरीं ठेवीत असे ते कधींच संपलें. काल देखील त्याला मिळालेले चुरमुरे खरें म्हणजे शकीच्या वांटणीचे. तिला चुरमुऱ्यांत हल्लीं चव वाटत नसे. चहा देखील तिनें घेतला न घेतला असेंच चालायचं. दवाखान्यांत पुष्कळ लोक घरच्या बाळंतिणीसाठीं चहा आणत, त्यांतील तिला मिळत असे म्हणे.

"कृष्णा, आज गिरणींत जायचं आहे सखारामकडे," वारणाई सांगूं लागली. पण तोंवर घटघटा चहा पिऊन कृष्णा बाहेर सटकला-सुद्धां. 'आत्तां काय करावं कारट्याला!' म्हणत वारणाई त्याच्याकडे पहातच राहिली. कोंपऱ्यावरील गिरणींत काम करणारा सखाराम पूर्वी समोरच्या घरांत खोली घेऊन रहात होता, त्या वेळची जुनी ओळख. आलेल्या दळणांतून तो मूठपसा धान्य बाजूला काढून ठेवत असे, त्यांतील थोडे तो मधून मधून वारणाईला देत असे.




परंतु आतां सखारामकडे जाणार तरी कोण ? शकी लहान होती तोपर्यंत तीं आनंदानें गिरणींत जात असे. दुर्गी देखील जायला नाहीं म्हणायची नाहीं. पण सखारामनें तिची एकदां थट्टा केली. ती तिनें मनाला लावून घेतली. वास्तविक त्यावेळीं हंसायला गिरणींत तिसरें कुणीसुद्धां नव्हतें. पण आतां तिच्यापुढें सखारामचें नांव काढण्याची सोय नव्हती. ' वराय ' असा सुस्कारा सोडत वारणाई चुलीकडे वळली.

आतां करकरीत संध्याकाळ झाली. वाराणाईनें कंदील लावला त्यावेळीं तिच्या ध्यानांत आलें कीं त्याची कांच फुटली आहे. हें त्या शकीचेंच काम असले पाहिजे. आज सकाळीं तिला कांच स्वच्छ करायला सांगितली होती. आणि फोडल्यावरही शहाजोगाप्रमाणें तिनें ती जशीच्या तशी ठेवून दिली होती. दवाखान्यांत लागल्यापासून तिचे कामाकडे लक्ष नाहीं हेंच खरें.

आज कसें काय कुणास ठाऊक, दाजी लवकर घरीं आला. त्यानें कोटटोपी खुंटीवर ठेवली, आणि खिशांतून विड्या, एक पुडी हातांत घेऊन तो कांहीं न बोलतां वारणाईसमोर बसला. त्याच्या डोक्याला टोपीचा कच पडला होता, व तो त्यावरून हात फिरवत होता. त्याचा चेहरा त्रस्त, दमलेला दिसत होता. त्यानें एक विडी काढली, व चुलींतील जळत्या सालीवरच पेटवली.

" काम फार होतं आज ? " वारणाईनें विचारलें. दाजीनें एक सुस्कारा सोडला. "चालायचचं" तो म्हणाला, " आज चहा आहे काय थोडा ? म्युनिसिपालटीच्या दवाखान्यांतून मो दोन गोळ्या आणल्या आहेत. त्या म्हणे चहाबरोबर घ्यायच्या आहेत. "

" घ्या कीं. शकीचा चहा आहेच, " वारणाई चटकन कप भरत म्हणाली, " तिचं काय, घेतला न घेतला. शिवाय तिला चांगला अर्धा तास आहे यायला. "

' शकीचा ' म्हणतांच दाजीनें हात चटकन मागे घेतला " तिचा नको. उगीच तोंड करत बसेल ती. मलांच नंतर दे कीं ग. " तो म्हणाला.

" नको. आत्तांच घेऊन टाका त्या गोळ्या. नाहींतर सारं आंगावरच काढायची संवय आहे तुम्हांला." आग्रहानें वारणाई म्हणाली. दाजीनें चहाबरोबर एक गोळी घेतली, व कांहीं न बोलतां तो विडी ओढूं लागला.

शकी आली ती चटकचटक वहाणा वाजवितच. तिनें वहाणा काढल्या, व त्या खुंटीवरील पोलक्यानें स्वच्छ पुसून वरच्या कोनाड्यांत ठेवून दिल्या. ती आंत आली, व सरळ बाजल्यावर जाऊन आडवी " हुश्श, दमले बाई. आंग दुखायला लागलं. "

दाजी, वारणाई कुणी कांहीं बोलले नाहीं. " होय का ग ! बस जरा केंव्हा तूं. तूं आहेस म्हणून घरांत तीस रुपये तरी येतात," असें वारणाईनें म्हणावें असें तिला फार वाटलें. पण ती कांहींच बोलत नाहीं हें पाहून ती हिरमुसली, आपला फार अपमान झाल्यासारखें तिला वाटलें, आणि या घरांत सारे लोक ऐतखाऊ, कृतघ्न आहेत अशी तिला चीड आली. खरें म्हणजे तिचे पैसे अद्याप घरीं आलेच नव्हते. पहिल्या रुपयांतून तिनें दोन तलम पातळें व वहाणा

घेतल्या होत्या. नाहीं म्हणायला तिनें घरीं एकदां तीन आण्याच्या गोवाऱ्याच्या शेंगा आणल्या होत्या. "चहा नाहीं माझा?" तेथेंच कपड्यांच्या ढीगावर रेलत तिनें विचारलें.

"हा काय, होतोय पांच मिनिटांत," वारणाई म्हणाली, "तुझा होता शिल्लक. पण तो यांना दिला. त्यांना कसलीतरी गोळी—"

पण शकीचा धीर सुटला, व तिनें वारणाईचें पुरतें ऐकूनहि घेतलें नाहीं. उसळून ती म्हणाली "मग दुर्गीचा, कृष्णाचा चहा द्यायचा होतास. सारं होतंय तें माझ्याच बाबतींत दुर्गी तुझी लाडकी लेक ना!"

वारणाईनें हात मांडीवर ठेवले व शांतपणें शकीकडे पाहिलें. तिच्यांत तावडतोब येणारा अनिवार संताप नव्हता. पण शकीच्या मुस्कटांत एक काड्कन ठेवून द्यावी म्हणजे तिच्या आवाजांतील उर्मटपणा निवळेल असें तिला वाटलें. पण तिनें तो मोह आवरला. मात्र तिच्याकडे पहायला लागूं नये म्हणून ती शकीकडे पाठ करून बसली.

दुर्गी आंत आली व शकीकडे पाहूं लागली.

"तिथं टेकून बसूं नका बाईसाहेब, माझं धुतलेलं पातळ आहे." ती एकदम तुटकपणें म्हणाली. आंग वळवून शकीनें आंगाखालचा पातळाचा चोळामोळा काढला, व तो तेथूनच अव्यवस्थितपणें दुर्गीच्या आंगावर फेकला.

"घे तुझं पातळ, तुझं आपलं ठीक आहे बघ. घरीं बसायचं, खायचं. पातळ चुरगळलं म्हणून काय झालं?" ती म्हणाली व पुन्हां मागें रेलली.

दुर्गीनें पातळ तेथेंच बाजूला ठेवलें, आणि ती खालीं बसली. खालची जमीन ओलसर होती व जरा जोरांत पाऊल टाकलें कीं पोपडे पायांना चिटकून येत. मोरीजवळची भिंत तर अगदीं भुसभुशीत झाली होती. आणि त्यांतच हल्लीं घराला कुठंतरी घूस लागली होती. दररोज सकाळीं उठून पाहिलं कीं ढीगभर माती दिसे. वारणाईनें रस्त्यावरील दगड गोळा करून तसलीं बिळें तीनचारदां तरी बुजवली होती. पण मग लगेच दुसरीकडे घूस उकरत असे. काल बाजल्याखालीं माती दिसली होती.

दुर्गी बसली होती, पण तिचं सारें लक्ष शकीकडे होतें. तिला उगाचच तिच्याविषयीं आंतून विलक्षण चीड येत होती. हल्लीं शकी अगदीं रानवट तऱ्हेनें भरदार झाली होती, आणि कामाला लागल्यापासून तर ती छातीवरील पदर जास्तच दाबून बसवत असे. पण तिचे पाय मात्र ओबडधोबड बडवण्यासारखे होते. पण दुर्गीचें लक्ष तिच्या बांगड्याकडे गेलें व ती चमकली.

"शके, माझी कांकणं कशाला घातलीस तूं?" तिनें रागानें विचारलें.

शकीनें आपल्या हाताकडे समाधानानें पाहिलें, व ती कौतुकानें हंसली. दुर्गीची कांकणें आपण वापरली याबद्दल तिला बिलकूल अपराधी वाटलें नाहीं. "मग काय झालं वापरलीं तर? ती घेऊन मी कांहीं पळून जात नाहीं. खुंटीवर तर ती पडून होती दोन महिने."

"पण ती मला आणलीं आहेत, ती माझीं आहेत." दुर्गीचा तोल जाऊन ती कर्कशपणें ओरडली. तिचें डोकें एकदम भणभणूं लागलें, आणि बोलतांना तिच्या गळ्याच्या शिरा एकदम सुतळीप्रमाणें टचटचीत बाहेर आल्या.

"बराय, तूं ओरडूं नकोस मांजरासारखं," वेडावत शकी म्हणाली. "तूं कांकणें घालणार तरी केव्हां? माझा पगार जर माझ्याजवळच राहिला, तर मीच घेऊन देईन तुला असलीं कांकणें पन्नासदां," शकीनें पुन्हां कांकणाकडे पाहिलें व तिच्या पुरता तो विषय संपला.

दुर्गीच्या डोक्यांत एकदम कांहींतरी पेटल्यासारखें झालें, आणि साऱ्या आंगावर घाव पडल्यासारखें तिला वाटूं लागलें. डोकें गच्च दाबून धरून ती शकीकडे थोडावेळ वेड्यासारखी पहात बसली.

बाहेर फरशीवर कुणी कांहींतरी फेकल्याचा आवाज झाला. व मंजू मांजरी ओठावर जीभ फिरवत सांवलीप्रमाणें निशब्द आंत आली. काळ्याभोर रेशमी आंगाची ही मांजरी, आंतून तिला हाडें नसावींत असें वाटण्याजोग्या सफाईनें हलत असे, ती आली तें समोरच्या घरांत चुलीवरचें दुध पिऊनच ती आली व दाजीच्या आंगाला आंग घांसू लागली. दाजीला वाटलें, आंग असे











मऊ उसीसारखे असावे. कुठें ठणका नाहीं कुठें वेदना नाहींत. त्यानें मंजूच्या आंगावरून प्रेमानें हात फिरवला, व थोडा चहा असलेली बशी त्यानें तिच्यापुढें ठेवली. तिनें एवढीशी जीभ काढून चहाला स्पर्श केला, पण तिला तो आवडला नाहीं. शेपटी उंच करून ती तशाच सांवरी कापूस हालचालीनें बाहेर निघून गेली.

" दुर्गे, घेतली तिनं तुझी कांकणे तर घेऊं देत, " समजावणीच्या स्वरांत वारणाई म्हणाली. या साऱ्या धूरकट कडवट वातावरणांत आपले डोकें खिसल्यासारखे होत आहे असें तिला वाटले. आतां तासभर सगळ्यांची तोंडे जातील, कुणाचाहि शब्द कानावर पडूं नये, मग आपण थंड वाऱ्यांत पांच मिनिटें तरी जाऊन यावे, आपल्याला थोडी उसंत मिळावी, असा रागीट विचारहि तिच्या मनाला स्पर्श करून गेला. ' तुला लागतील ना, त्यावेळीं पुन्हां आणून देईन म्हणे. आतां गप्प रहा. "

" बघ दुर्गी, तुला नवी आणून देणारी माणसें आहेत, " कुत्सितपणें शकी म्हणाली, " आम्ही काय, हमालच बोलून चालून. उद्यां पत्रावळीदेखील चालतील कीं ! "

दुर्गीला आतां हें सारें असह्य झाले, आणि तिच्या अशक्त कानशीलावरील शिरा ताठल्या, व ती रडूं लागली. वारणाईनें तिला हाताला धरून आग्रहानें उठवले, व दरवाजाकडे वळवले. " तूं जा बाहेर, बस थोडा वेळ कट्ट्यावर. काय लागतेस तिच्या तोंडाला. दिवसेंदिवस ती निःसंग व्हायला लागलींय. " वारणाई म्हणाली.

दाजी देखील उठला व बाहेर येऊन कट्ट्यावर उकिडवा बसला. हे सारे शब्द त्याच्या कानावर पडले, पण त्यांच्या अर्थाचा त्याला स्पर्शहि झाला नाहीं. आयुष्यावरील एक थर त्यानें बैलाच्या मानेवरील जाड कातड्याप्रमाणें निबर केला होता. हा झुरका शेवटचा, त्यानंतर तो कधींच मिळणार नाहीं अशा हावरेपणानें तो छाती भरून धूर घेत होता, व विडी ओढतांना विडीच्या लाल टोंकांतच फक्त त्याच्या मनाची धग दिसत होती.

त्याच्या खांद्यांचे हाड न हाड दुखत होते, आणि सारें आंग मरगळल्यासारखे झाले होते. हें दुःख नको, हें ओझें नको असा एक वैताग त्याला आला होता. त्याच्या हेडक्लार्कनें दोन गाड्या लांकडे घेतली होतीं, व तीं माळ्यावर रचण्यासाठीं त्यानें दाजीला बोलावलें होते. दोन तासभर तो लांकडे नेत होता, वर रचत होता. हातीं खालीं वाकलें कीं डाव्या बाजूला छातींत नोठी तापलेली सुई साव-काश खोल रुतवल्याप्रमाणें बारीक पण असह्य कळ येत असे हें त्यानें वारणाईलाहि सांगितलें नव्हते. एकदां तर हातांतील लांकडे तशीच धडाधडा खालीं टाकून तो असहाय उभा राहिला होता, त्याचा चेहरा घामानें डबडबला होता...आणि त्या बाईनें कपभर चहादेखील दिला नव्हता. दाजीला वाटलें, नको ही नोकरी, घरदार सोडून जावे कुठें तरी, कुठेंहि मसणांत. बाजूच्या आवारांत झाडीझुडी जास्त असल्यानें संध्याकाळीं खूप डांस येत. दाजी मधून मधून हात फिरवत होता, पण तें उगाचच. हे देखील श्रम नको, सारीं दुखरी हाडें हलवणें नको असें त्याला वाटत होते. बराच वेळ झाला पण दुर्गी अद्यापी हुंदके देत होती. दाजी कांहीं बोलला नाहीं. हें एक आणखी दुःख आपल्याच आयुष्याचा कोंभ. हौसेनें तिला वाढवलें, तिचे लाड केले, पण आतां पुढें काय ? उद्यां जर आपण पटदिशीं रस्त्यांतच पडलो तर हिचं काय ? वारणाईचें काय ? ती खोकून खोकून हैराण झाली म्हणजे दाजीला वाटे, हा खोकला तिचा जावा, आपल्याला यावा. सध्यापेक्षां आपल्याला काय जास्त सहन करावें लागणार आहे ? पण ती मात्र फाटक्या पण रुंद पानांच्या, नोठ्या काल्याच्या केळीसारखी आहे. तिला हा खोकला नको. सारें घर तिनें पाठीवर संभाळले आहे...

दाजीनें विडी टाकली व तो उठला. " दुर्गी, फार वेळ बसूं नको वाऱ्यांत. डांस फार आहेत." तो आंत येतां येतां म्हणाला. कांहीं न बोलता दुर्गीनें मान हलवली. दाजी आंत आला तें पाठ चेपतच. वारणाईनें त्याला जवळची फळी टाकली, व म्हटलें, " बसा थोडा वेळ इथंच. जेवायनं झालंच कीं ! " दाजीला

( पान १५० वर चालू )

गेल्या पिढींत चौदा वर्षांच्या मुलीच्या हातीं जीं पुस्तकें द्यायला कुणी धजलें नसतें, तीं पुस्तकें आज 'पामिला' मूर सारख्या चौदा वर्षांच्या पोरी लिहूं लागल्या आहेत. 'सॅगन' या पोरसवदा लेखिकेनें अशा स्वरूपाच्या आपल्या एकूण तीन कादंबऱ्या प्रकाशित करून, साडेसात लाख डॉलर्सची कमाई केली.



अलीकडे युरोपियन वाङ्मयांत कामकथांना बहर आला आहे. दिवसेंदिवस कामकथांची लोकप्रियता वाढत आहे. 'लोलिता' सारख्या कादंबरीच्या असामान्य लोकप्रियतेनें समाज-धुरीणांना आणि चोखंदळ अभिरुचीच्या वाङ्मयसमीक्षकांना एक प्रकारें आव्हानच दिलें आहे. जागतिक वाङ्मयाच्या क्षेत्रांतील इंग्रजी वाङ्मयाची मिरासदारी संपली असून रशियन, फ्रेंच, इटालियन, नॉर्वेजियन आदि भाषांतील कथावाङ्मयानें लोकप्रियतेचे उच्चांक गाठले आहेत. (अर्थात् यांतील कथा शब्दाची व्याप्ति मोठी आहे. यांत कादंबऱ्यांचाहि समावेश होतो.) ग्रेस मॅटेलिअस या कादंबरीकर्त्रीच्या 'पेटन प्लेस' या कादंबरीनें तर विक्रीच्या बाबतींत अभूतपूर्व असा विक्रम केला आहे. कॉल्डवेलच्या अश्लील म्हणून गाजलेल्या 'गॉडस् लिटल एकर' या कादंबरीच्या १० वर्षांत ७५ लक्ष प्रती खपल्या. पण 'पेटन प्लेस' नें हा उच्चांक एका वर्षांतच मोडला. गेल्या वर्षांत या कादंबरीच्या एकूण ७२ लक्ष प्रती खपल्या. याशिवाय कादं-बरीच्या चित्रीकरणाचे हक्क ११ लाख डॉलर्सना विकत घेण्यांत आले आणि लेखिकेला पुस्तकविक्रीची रॉयल्टी म्हणून ३ लाख डॉलर्स एवढी कमाई झाली. पंचवीस रुपयांच्या मोबदल्यानें हातीं स्वर्ग आला असें मानणाऱ्या देशी लेखकांचे हे आंकडे वाचूनच डोळे पांढरे होतील यांत शंका नाहीं. या कादंबरीची जाहिरातहि मोठीं सनसनाटी करण्यांत आली होती. या जाहिरातींत दोन बलात्कार, दोन गर्भपात, चार खून लावण्याचे प्रकार, दोन कुमारिकांचें मातृपद, बलात्काराला बळि पडलेल्या असहाय्य स्त्रीकडून झालेला खून या गोष्टींना ठळक प्रसिद्धि देण्यांत आली होती. शिवाय हे प्रसंग वर्णन करणाऱ्या लेखिकेनें आपल्या साध्या-भोळ्या शाळामास्तर नवऱ्यापासून घटस्फोट घेतला असून एका चंट माणसाशीं तिनें लग्न केलंय् याचीहि टिमकी वाजविण्यांत आली होती.

पाश्चिमात्य वाङ्मयांतील कामकथांचें हें लोण आजचेंच नाहीं. जागतिक वाङ्मयांतील काम-कथांचा प्रणेता म्हणजे डी. एच्. लॅरेन्स. ३० ऑक्टोबर १९१५ रोजीं त्याची दुसरी कादंबरी 'रेनबो' प्रसिद्ध झाली, आणि सर्वत्र अश्लील, अश्लील असा पुकारा झाला. त्यावेळीं इंग्लंडमध्यें एमिल झोलाच्या 'चावट' कादंबऱ्या प्रकाशित करणाऱ्या प्रकाशकाला तुरुंगाची हवा खावी लागली होती. पण टीकाकारांनीं रेनबो ही कादंबरी 'झोलापेक्षां भयंकर' असा आरडा ओरडा केला. याचा परिणाम असा झाला कीं स्कॉटलंड यार्डच्या पोलिसांनीं 'रेनबो' च्या प्रकाशकाची झडती घेऊन एक हजार प्रती जप्त केल्या आणि बो स्ट्रीट पोलिस कोर्टमध्यें प्रकाशकावर खटला भरण्यांत आला. बिचाऱ्या प्रकाशकानें अशी जबानी दिली कीं, आपण दोन वेळां लेखकाकडे त्याचें हस्तलिखित दुरुस्तीसाठीं पाठविलें—आणि तिसऱ्यावेळीं त्यानें यापुढें आहे तसेंच छापा असा आग्रह धरला—पण आपण नीट दुरुस्ती न करतां हें पुस्तक छापण्यांत गाढवपणा केला व त्याबद्दल आप-ल्याला माफी करावी अशी त्यानें कोर्टाची करुणा भाकली. मॅजिस्ट्रेट सर जॉन डिकीन्सन यांनीं रेनबो ही कादंबरी अत्यंत घाणेरडी आणि अश्लील ठरवून त्याच्या सर्वच्या सर्व प्रती सात दिवसाच्या आंत नष्ट करण्याचा हुकूम दिला.

या खटल्यानें इंग्लंडमध्यें सर्वत्र खळबळ माजली. ऑथर्स सोसायटीनें लेखकाच्या वतीनें भांडायची सिद्धता केली. लॅरेन्सच्या कांहीं मित्रांनीं कायदेशीर हालचाल करण्याचा सल्ला दिला; पण लॅरेन्सनें तें नाकारलें. शेवटीं लॅरेन्सचा एक मित्र आणि लिबरल पक्षीय पार्लमेंटचा सभासद फिलिप मॉरेल यानें ह्या विषयाला पार्लमेंटमध्यें तोंड फोडलें. सर जॉन सायमन, सेक्रेटरी फ़ॉर होम अफेअर्स यांनीं हा विषय उडवून लावला. परत डिसेंबर महि-न्यांत त्यानें पार्लमेंटमध्यें आणखी कांहीं प्रश्न विचारले—पण हे दोन्ही प्रयत्न फसले. कायदेशीर फिर्याद करायला लॅरेन्स तयार नव्हता. तो म्हणाला I am not going to pay any more out of my soul even after for the sake of beating them. रेनबो नंतर लॅरेन्सची खळबळजनक कादंबरी म्हणजे 'वुमेन इन लव्ह.' या कादं-बरीनें तर सोवळे टीकाकार चांगलेच चिडले. लंडनच्या 'जॉन बुल' नें तर पानभर मधळा दिला—" पोलिसांनीं तात्काळ जप्त करण्या-

**बाळ सामंत**

जोगें पुस्तक " पण लॅरेन्स जगभर ख्यातनाम झाला त्याच्या ' लेडी चॅटर्लीज लव्हर ' या कादंबरीमुळें. या कादंबरीचें हस्तलिखित त्यानें तीन वेळां बदललें. शेवटचें म्हणजे तिसरें हस्तलिखित छापायला कोणताच प्रकाशक तयार होईना. या कादंबरीनें अश्लीलमार्तंड चांगलेच खवळणार आहेत. आणि आपल्याला मानसिक ताप फार होणार आहे हें लॅरेन्स जाणून होता. शेवटीं त्यानें ही कादंबरी स्वतःच छापायचें ठरविलें. त्यानें फ्लॉरेन्समधील एक छोटा बुकसेलर गाठला. त्याचा एक मोडकातोडका छापखाना होता आणि कंपॉझिटरना इंग्रजी मुळींच येत नव्हतें. त्यामुळें मुद्रणाच्या असंख्य चुका या पुस्तकांत झाल्या एका प्रतीची दोन गिर्नी किंमत ठेवूनही कादंबरीची पहिली आवृत्ति झपाट्यानें संपली. कादंबरीचा कॉपीराईट नसल्यामुळें काहीं अमेरिकन प्रकाशकांनी चोरून नकली प्रति छापल्या आणि दामदुप्पटीनें विकल्या. हा काळाबाजार थांबविण्यासाठीं अस्सल प्रती ' दी वे ऑफ ऑल फ्लेश ' सारख्या कादंबऱ्यांचीं मुखपृष्ठ चढवून इंग्लंडमध्यें पाठविण्यांत आल्या. या कादंबरीचा जागतिक बोलबाला फारच झाला होता. कादंबरीच्या किंमतीएवढे पैसे देऊन भाड्यानें वाचायला नेणारे अनेक उत्साही वाचक निघाले. त्यामुळें नकली ' लेडी चॅटर्लीज लव्हर ' अनेक प्रकाशकांनीं छापून वाचकांची फसवणूक केली आणि खूप पैसा मिळवला. इंग्लंडमधील टीकाकारांनीं तर ' शेमफुल बुक. लॅंड मार्क इन इव्हिल ' अशी या पुस्तकाची संभावना केली. ' इंग्रजी वाङ्मयाला काळोखी आणणारें एक पापकृत्य ' असेंही काहीं टीकाकारांनीं तिचें वर्णन केलें. सर स्टॅन्ले बाल्डविन चे होम सेक्रेटरी सर विल्यम जॉन्सन डिक्स यांची तर खात्रीच झाली कीं लॅरेन्स हा जनतेच्या स्वास्थ्याचा एक नंबरचा शत्रु आहे. पोस्ट, कस्टमच्या अधिकाऱ्यांना लॅरेन्सच्या पुस्तकाच्या बेकायदेशीर आयातीवर सक्त नजर ठेवण्याच्या सूचना देण्यांत आल्या. लॅरेन्सनें मॅंड्रेक प्रेसमध्यें आपल्या कवितांचें हस्तलिखित आणि ' इंट्रोडक्शन टू पेंटिंग्ज ' चें हस्तलिखित पाठवलें तें मधल्यामध्यें जप्त करण्यांत आलें. या जप्तीची बातमी बाहेर फुटली आणि त्यावर पेथिक लॅरेन्ससारख्या मजूरपक्षीयांनीं पार्लमेंटमध्यें त्याचा निषेध केला.

याच काळांत लॅरेन्सच्या चित्रांच्या प्रदर्शनावर बंदी घालण्यांत आली व १९२९ मध्यें ' लेडी चॅटर्लीज लव्हर ' ही कादंबरी चोरून विकल्याबद्दल पुस्तक विक्रेत्याला ८०० रु. दंड आणि ४ महिने शिक्षा झाली. त्यावर अपील करण्यांत आलें असतां सुप्रीम कोर्टाच्या न्यायाधीशांनींही तें पुस्तक अश्लील असल्याचें मान्य केलें आणि त्याची शिक्षा कायम केली.

१९३० सालीं लॅरेन्स मृत्यु पावला. अखेर ' लेडी चॅटर्लीज लव्हर ' चें वादळ त्याच्या प्रकृतीला मानवलें नाहीं. पण त्याच्या मृत्युनंतरहि या कादंबरीवरचे आक्षेप दूर झाले नाहींत. २० वर्षेपर्यंत त्याच्या कादंबरीची अस्सल प्रत प्रकाशित करण्याचें कोणीच धाडस केलें नाहीं. मात्र १९५० मध्यें जपानमध्यें वासेदा . युनिव्हर्सिटीचे प्रा. सेई इटो यांनीं अस्सल प्रतीचें जपानी भाषांतर प्रसिद्ध केलें. या भाषांतरानें जपानमध्यें एकच काहूर उठलें. एक अश्लील आणि घाणेरडें पुस्तक म्हणून त्याची ख्याति झाली. टोकीयोंतील या पुस्तकाचे प्रकाशक हिसाजीरो कोयामा यांना जपानी कोर्टानें दोषी ठरवून दंड केला आणि सर्व प्रती जप्त केल्या.

गेल्या वर्षी लॅरेन्सच्या ' लेडी चटर्लीज लव्हर ' ची अस्सल आवृत्ति अमेरिकेंत प्रसिद्ध झाली. आणि तिच्या पन्नास लाखाहून अधिक प्रती संपल्या आणि अजूनहि लोकप्रियता दिवसेंदिवस वाढत आहे.

लॅरेन्सच्या मागोमाग गाजलेला लेखक म्हणजे कॉल्डवेल. त्याची ' गॉडस् लिटल एकर , ही कादंबरी १९३३ सालीं प्रसिद्ध झाली आणि २ मे १९३३ रोजीं ' न्यूयॉर्क सोसायटी फॉर दी सप्रेशन ऑफ व्हाईस ' या सोसायटीनें हें पुस्तक अश्लील, उत्तान आणि घाणेरड्या प्रसंगांनीं जागोजाग भरलें आहे म्हणून त्याच्यावर फिर्याद

केली. हा खटला चालू असतांना मॅजिस्ट्रेटला या कादंबरीच्या वाङ्मयीन गुणांची प्रशंसा करणारीं प्रत्रें सुमारें साठसत्तर मातवर व्यक्तींनीं पाठविलीं होतीं. त्यांत सिंक्लेअर लुईस सारखे लेखक, आणि प्रमुख वाङ्मयीन साप्ताहिकांचे वजनदार संपादक होते. मॅजिस्ट्रेटनें निकाल देतांना हीं पत्रें आणि निरनिराळ्या प्रमुख नियतकालिकांत आलेले त्यावरचे अभिप्राय विचारांत घेऊन प्रकाशकाला दोषमुक्त ठरविलें. आपल्या निकाल-पत्रांत मॅजिस्ट्रेटनें म्हटलें.–" सदर्न युनायटेड स्टेटस्‌मधील एका विभागाचें सत्य आणि प्रमाणिक चित्रण करण्याचा लेखकानें कसोशीचा प्रयत्न केला आहे. याचा पुरावा या कादंबरींत जागोजाग दिसतो. वास्तववादी चित्रण करण्याचा लेखकाचा हेतू उघडच आहे. अशा वास्तववादी चित्रणांत कांहीं वारकावे येणें अपरिहार्य असतें. हे वारकावे जीवनाच्या लैंगिक बाजूबाबत आहेत आणि ते रांगड्या मनमोकळे-पणानें चित्रिले आहेत. असें चित्रण करावयास नको होतें असें कोर्ट म्हणूं शकत नाहीं. या कादंबरीची भाषाहि कांहीं ठिकाणीं रांगडी आणि उत्तान आहे. पण रांगड्या लोकांच्या तोंडीं सोवळी भाषा घातली पाहिजे असें कोर्ट म्हणूं शकत नाहीं. " मॅजिस्ट्रेटनें पुढें असेंहि म्हटलें कीं या पुस्तकाचा दर्जा काय आहे तें ठरविणें आमचें काम नव्हे. पण तो एक अधिकृत वाङ्मयीन प्रयत्न असें म्हणतां येईल. या कादंबरींतील कांहीं परिच्छेद नक्कीच अश्लील आहेत. पण ते ज्या संदर्भांत आले आहेत त्या संदर्भांत ते अश्लील मानतां येत नाहींत. तसं पाहिलं तर चॉसर, अरिस्टॉटल इतकंच काय पण बायबलमध्येंहि असे अश्लील उतारे सांपडतील. यांत कोणत्याहि दुर्गुणाची वा दुराचाराची प्रशंसा केलेली नाहीं. हें पुस्तक वाचून कोंवळ्या वा संभ्रमित मनावर त्याचा अनिष्ट परिणाम होईल असें आगाऊ भाकित करण्यास कोणताच आधार नाहीं. आणि याच न्यायावर पुस्तकांना बंदी घालायची ठरवल्यास वाङ्मयांतील फक्त शुष्क कंटाळवाणीं आणि खुरटीं पुस्तकेंच तेवढीं शिल्लक राहातील–' शेवटीं तो म्हणतो I believe the author has choosen to write what he believed to be the truth about a certain group in American life. To my way of thinking truth should always be accepted as justification in literature.

'गॉडस् चिटल एकर' प्रमाणें अश्लील म्हणून गाजलेली कादंबरी म्हणजे स्टॅन्ले कॉफमनची 'फिलंडरर' ही कादंबरी. १९५४ सालीं ही कादंबरी प्रसिद्ध झाली आणि अश्लीलतेच्या आरोपाखालीं या कादंबरीच्या प्रकाशकावर खटला भरण्यांत आला. सेंट्रल क्रिमिनल कोर्टांत हा खटला दोन दिवस जस्टिस स्टेबल आणि बारा ज्युरींसमोर चालला. त्यांत तीन स्त्रिया होत्या. या खटल्यांत कादंबरी दोषमुक्त ठरविण्यांत आली. ज्यांच्यावर अनीति-मय विचारांचा पगडा लवकर बसण्याचा लवकर संभव आहे. अशांच्या हातीं हें पुस्तक पडलें



अनुक्रमणिका







तर त्याचा अनिष्ट परिणाम होईल, असा या पुस्तकावर मुख्य आरोप होता. हा खटला ज्यूरींना समजावून देतांना न्यायमूर्ति स्टेबल यांनीं केलेलें विवेचन अत्यंत महत्वाचें आहे. न्यायमूर्तींच्या म्हणण्याचा सारांश असा कीं,–"नायकाचें व्यक्तिमत्व आकर्षक आहे. स्त्रीविषयक प्रवळ आसक्ति हा त्याच्या आयुष्याचा स्थायीभाव आहे. परंतु लेखकानें आपल्या कादंबरींत व्यभिचाराचें समर्थन किंवा प्रशंसा मुळींच केलेली नाहीं. एखाद्या अतिरिक्त मद्यपि माणसासारखी त्याची स्थिति झालेली आहे. मद्यपानाचे अघोर परिणाम माहीत असूनहि त्याला त्यापासन परावृत्त होतां येत नाहीं. त्याच्या लहानपणीं त्याचे आई आणि वडील यांच्या बिघडलेल्या परस्परसंबंधांचा त्याच्या कोंवळ्या बालमनावर फार परिणाम झाला आणि त्याची मनोवृत्ति या संस्कारांतून परिणत झालेली आहे. या कादंबरीचा विषय उघड उघड लैंगिक आहे. कामवासनेला पाप मानणारे आणि कामवासनेला सर्वस्व मानणारे असे दोन परस्परविरोधी पक्ष आहेत. या दोन ध्रुवांचा सुवर्णमध्य साधून सर्वसामान्य माणूस आपलें संथ आणि एकसूत्र जीवन जगत असतो. आतां वाङ्मयीन निकष १४ वर्षाच्या मुलीच्या निकषावर तोलून पाहायचा का? कीं, लहान पोरांचीं जीं पुस्तकें असतात त्याचाच निकष या पुस्तकांना लावायचा? याचें उत्तर अर्थात नाहीं असें आहे. प्रसिद्ध होणाऱ्या वाङ्मयापैकीं बरेंचसें वाङ्मय तरुण मुलांना वाचण्यासाठीं योग्य नसतें. पण त्यामुळें सर्वसामान्य प्रौढ वाचकांसाठीं हीं पुस्तकें प्रसिद्ध करणाऱ्या प्रकाशकाला गुन्हेगार मानणें योग्य होणार नाहीं." न्यायमूर्तींनीं पुढें म्हटलें–"व्हिक्टोरियन काळांत टेबलाचे पाय मनुष्याच्या नागव्या पायासारखे दिसत म्हणून त्यावर आच्छादन घातलें जाई. पण लैंगिक बाबतींत छपवाछपव करण्यापासून नाश संभवतो–तसा अत्यंत बीभत्स अशा संभोग साहित्यानेंहि. मुलामुलींना लैंगिक ज्ञानापासून अलिप्त ठेवणें म्हणजे नकाशा, सुकाणूं, ~~होकायंत्र यांच्या~~ अभावीं स्वतःच्या जबाबदारीवर महासागराच्या पर्यटनास पाठविण्यासारखें आहे. The function of the novel is not merely to entertain contemporaries; it stands as record or a picture of the society when it was written"

कामकथांची ही वाढती लोकप्रियता आज युरोपियन वाङ्मयांत तर कळसाला पोंचली आहे. गेल्या पिढींत चौदा वर्षांच्या मुलींच्या हातीं जीं पुस्तकें द्यायला कुणी धजलें नसतें तीं पुस्तकें आज पासिला मृर साख्या चौदा वर्षांच्या पोरी लिहूं लागल्या आहेत. सॅगन या पोरसवदा लेखिकेनें अशा स्वरूपाच्या आपल्या एकूण तीन कादंबऱ्या प्रकाशित करून साडेसात लाख डॉलर्सची कमाई केली. तिची Bounjour Tristesse ही कादंबरी १९५४ सालीं प्रसिद्ध झाली. आणि तिला अनेक पारितोषिकें वहाल करण्यांत आलीं. तिची दुसरी सुमारें १२५ पृष्ठांची 'सर्टन स्माईल' ही कादंबरी अशीच गाजली. यांत नायिकेचा आपल्या वयापेक्षां दुपटीनें मोठ्या असलेल्या पुरुषाशीं चाललेला प्रणय वर्णन केला आहे. 'इव्हान हंटर' सारखा लेखक तर आपल्या कादंबरींत शृंगाराच्या वारकाव्याचें वर्णन मोठ्या कुशलतेनें करतो. 'स्ट्रेंजर्स व्हेन वुई मीट' या कादंबरीचा विषय तर व्यभिचाराचा आहे. तरीपण न्यूयार्क टाईम्स मध्यें या कादंबरीचें परीक्षण करतांना 'इव्हान-हंटर' हा फ्रेंच लेखकांच्या मानानें फारच सोंवळा आणि भित्रा लेखक आहे अशी तक्रार केली आहे. 'वाय लव्ह पझेसड्' या कादंबरींत जेम्स कॉझीन्सनें तर अशाच उत्तान प्रसंगाची जागोजाग पेरणी केली आहे. पूर्वीचे लेख चुंबनालिंगनावर समाधान मानीत–आणि त्याचा कळस झाला कीं वाचकांनाहि गुदमरल्यासारखें होई. पण आजचे धाडसी लेखक चुंबनालिंगनाच्या पलीकडे गेले आहेत. ते वस्त्रहरण-कुशल बनलेले आहेत. ( Undressing sepecialist ). याची सुरवात जेम्स जोन्सने आपल्या 'फ्रॉम हियर टू इटर्निटी' या कादंबरींत केली–आणि त्याच्या मागोमाग ॲलिसन मॅकेन्झी, इव्हान हंटर, जॅक केरॉक, जेम्स एम् केन यांनीं त्याचें शास्त्रच बनविलें आहे.

जीवनांतील श्लील-अश्लीलतेची पर्वा न करणाऱ्या सर्व आधुनिक लेखकांचा दावा असा कीं, ते जीवनाचे भाष्यकार असल्यामुळें मानवी जीवनांतील बरें वाईट जें असेल तें यथातथ्य वर्णन करण्याचा त्यांना पुरेपूर हक्क आहे. पाश्चिमात्य वाङ्मयांतील हे पडसाद तेथील जीवनाचे वाङ्मयावर झालेले अपरिहार्य परिणाम







आहेत; युरोपियन राष्ट्रांत त्यामानानें इंग्लंड हा देश सोवळा आणि सनातनी. त्यामुळें गेल्या महायुद्धात ब्रिटननें आपलें स्वत्व गमावलें नाहीं. उलट युरोप मधील जर्मनी, नॉर्वे, इटली, फ्रान्स, हीं राष्ट्रे महायुद्धांत अक्षरशः होरपळलीं. जर्मनीसारख्या राष्ट्रांत तर तरुणांची एक पिढीच्या पिढी कापली गेली. युद्धाचा हा तडाखा एवढा जबरदस्त होता कीं जीर्ण संकेतांना वीसच्या वर्षांत मूठमाती मिळाली. सामाजिक जीवनाची जुनी चौकटच ढासळली. जीवन सैराट आणि बेबंद झालें. आणि यांतूनहि राष्ट्रपुनर्निर्मितीचा प्रश्न जर्मनीसारख्या राष्ट्रासमोर होता. अशा परिस्थितींत शांत, सुस्थिर काळांत ज्या नीतिनियमांचें मोठ्या हौसेनें स्वंध करावयास सवड असते ती सवड या राष्ट्रांना नव्हती. राष्ट्रीय जीवनांत एक प्रकारची पोकळी निर्माण झाली होती. ' स्लम्स ' म्हणजे झोंपडीकर लोकांची एक प्रचंड समस्या या राष्ट्रांसमोर होती. तशांत वाढती बेकारी आणि महागाई. आणि यांतून जीवनाची एक नवी मूस तयार झाली. तिला साजेसें वाङ्मय किंवा तिचें प्रखर वास्तवपूर्ण ( फारतर अतिवास्तव) चित्रण वाङ्मयांतून होऊं लागलें. १९२९ सालीं डी. एच् लॉरेन्सनें लिहिलेल्या लेडी चॅटर्लीज लव्हर या कादंबरीच्या अस्सल पॅरीस प्रतीला जी प्रस्तावना लिहिली ती पुढें त्यानें वाढवून स्वतंत्र पुस्तिकेद्वारें प्रसिद्ध केली. त्यांत आपण ही कादंबरी कां लिहिली आणि आपल्याला यांत काय सांगावयाचें आहे. याचें प्रदीर्घ आणि मार्मिक विवेचन लॉरेन्सनें केलें आहे. तो म्हणतो Inspite of all antogonism, I put forth this novel as an honest, healthy book, necessary for us today " आज अशा प्रामाणिक आणि निरोगी पुस्तकाची आपल्याला गरज आहे. आज आपल्या आचारांत आणि विचारांत महदंतर पडलेलें आहे. आपण विचार करीत असतांना कृति करीत नाहीं आणि आपल्या कृतीला विचाराचें बंधन नसतें. उक्ति आणि कृतीमध्यें सुसंगति साधणें ही आजच्या युगाची पहिली गरज आहे आणि म्हणून I want men and women to be able to think sex, fully completely honestly and cleanly (Sex liter ature and censorship D. H. lawrence. page 227)

लॉरेन्सनें याच प्रस्तावनेंत जुन्या वाङ्मयांतील प्रेमविषयक कल्पनांची हजेरी घेतली आहे. आणि प्रेम ह कसें नकली आणि बेगडी आणि परंपरागत झालें आहे याचें मार्मिक वर्णन केलें आहे. कथाकादंबऱ्यांतून नकली आणि फसव्या प्रेमाच्या कल्पना घेऊन स्त्री-पुरुष वागत असतात आणि प्रेमांत असेंच वागावें लागतें म्हणून बेगडी संकेतांचें खोटें अनुकरण जीवनांत करीत असतात. पण काळ याचा सूड घेतो. आणि या नकली प्रेमाचीं आवरणें एक दिवस गळून पडतात. आजच्या बेगडी संस्कृतीला ' काम ' म्हणजे काय याचा अर्थच कळलेला नाहीं. उलट अमेरिकन संस्कृति या संदर्भात अतिशय रानटी मानावी लागेल असें लॉरेन्सचें मत आहे.

या विवेचनाच्या अनुषंगानें आजच्या मराठींतील नववाङ्मयाच्या बाबतींत लिंगप्रधान विकृत अशी जी ओरड केली जाते आणि जिचे पडसाद साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षपदाच्या भाषणांतहि उमटतात त्याचा विचार करणें मोठें उद्बोधक ठरेल. गेल्या कांहीं वर्षांत मराठींतहि कांहीं कथाकार आपल्या कथांतून कामावासनेला प्राधान्य देऊं लागले आहेत ही गोष्ट निर्विवाद. कांहीं सोवळ्या टीकाकारांचा या अपरिहार्य अशा प्रामणिक आणि अंतर्भेदी चित्रणाला कडाडून विरोध असला तरी गेल्या पिढींतील लेखकांच्या फसव्या आणि बेगडी प्रेमकथांपेक्षां आजची कथा आणि कादंबरी अधिक रसरशीत, जिवंत आणि प्रामाणिक अनुभूतींतून निर्माण झालेली आहे. अरविंद गोखले, स. आ. जोगळेकर, पु. भा. भावे, अच्युत बर्वे इत्यादि कथाकारांच्या कांहीं कथांना कामकथा म्हणून संबोधण्याची जी एक फॅशन पडली आहे तिचा उगम अज्ञानांतून आणि भाबडेपणांतून झालेला आहे. टीकाकार हा वाङ्मयावर भाष्य करतो पण त्यामुळेंच त्याचें जीवनविषयक ज्ञान लेखकापेक्षां अधिक व्यापक आणि प्रगत पाहिजे. त्यानेहि लेखकासारखें जीवन जगलें पाहिजे. गिरगांवांतल्या कोंदट खोलींत बसून अस्सल ग्रामीण कथेचें परीक्षण करणें अवघड आहे. ते अशा अर्थी कीं, त्या खोलीच्या बाहेरचें जग माहिती नसेल तर त्याची टीका नुसती पुस्तकी








आणि पोपटपंची ठरेल. अरविंद गोखल्यांच्या 'गंधवार्ता' या आंतरराष्ट्रीय ख्यातीच्या कथेंतील एका प्रसंगावर भाष्य करतांना आपल्या क्षुद्र जगांत वावरणाऱ्या कांहीं शाळकरी पढिक टीकाकारांनीं तो अवास्तव आहे म्हणून टीका केली होती व ती कथाहि अगदींच सामान्य आहे असें मत प्रकट केलें होतें याची या प्रसंगीं आठवण होते. या संदर्भात गोखल्यांच्या वेश्याजीवन-विषयक 'अनामिका' या धाडशी कथासंग्रहाचा मुद्दाम निर्देश केला पाहिजे. मला वाटतें देशी वाङ्मयांतहि एका आगळ्याच विश्वाचें दर्शन घडविणारा हा पहिलाच प्रयत्न असावा. कथेचें विश्व संकुचित होत चाललेलें आहे अशी तक्रार करणारे टीकाकारच या संग्रहाला कदाचित् नांवें मुरडतील पण तरुण गोखल्यापेक्षां पन्नाशीच्या घरांत आल्यावर अहल्या, वारियानें कुंडल हालेसारख्या जिवंत कथा लिहिणाराचा जोगळेकरांवर कांहीं थेगडी समीक्षकांनीं अशीच आग पाखडली. पण या कथांमागें-जें प्रखर सत्य डोकावत आहे. जीवनाच्या ज्या भीषण बाजूचें दर्शन होत आहे. त्याकडे उघडे डोळे ठेवून पहाण्याची ताकद नसल्यामुळें अनेकांनीं अश्लील अश्लील म्हणून त्यांचा धिक्कार केला. या जीवनाचें सत्यस्वरूप प्रकट करणाऱ्या कथा अश्लील मानावयाच्या असतील तर आमच्या पुराणांतील वारयोषितेकडे आपल्या कुष्ठरोगी पतीला घेऊन जाणाऱ्या पतिव्रतेच्या कथा, बीभत्स आणि हीन अभिरुचीच्या कथा, कौतुकानें वाचल्या जातात त्यांचा प्रथम जोरदार निषेध करावा लागेल.

गेल्या महायुद्धामुळें महाराष्ट्राची सामाजिक घडी विसकटली. मध्यमवर्गीय मुली मिळवत्या झाल्या. चित्रपटांच्या वाढत्या प्रभावामुळें दिखाऊ आणि नटव्या जीवनाची तरुणतरुणींत अभिलाषा निर्माण झाली. मुंबईसारख्या शहरांत एकाच खोलींत दोन दोन तीन-तीन कुटुंबें राहूं लागलीं. निर्वासितांची आवक—वाढती बेकारी, सुशिक्षित बेकारांची संभ्रमावस्था, खडतर जीवनामुळें मध्यमवर्गीय पालकाच्या हातून सुटलेलें त्याच्या घराचें सूत्र, कामगारांची सुस्थिति आणि त्यांच्यांतहि मध्यमवर्गीयाचें अनुकरण



छेकापन्हुति : ७ :

ही पहा शहामृगी अन्
ती कोपऱ्यांत मृगनयनी
लज्जित, बावरलेली—
आखला स्कर्ट सांवरीत
उंच टाचांनीं कशी ही मिरवते—
जणूं काय दाद मिळाल्यावर
कुऱ्यानें लवलवणारी बॅलेची नटी.
ती मात्र एखाद्या नवोढा काकूसारखी
वटसावित्रीच्या पुजेला जातेशी वाटते
बावरत, सावरत, चमकत
जाऊं नका जवळ तिच्या उगीच विनयभंग व्हायचा



करण्याची वाढती प्रवृत्ति, इत्यादि अनेकविध प्रश्नांमुळें महाराष्ट्राच्या सामाजिक जीवनांत एक प्रकारचा चमत्कारिक विसंवाद निर्माण झाला. जुनीं मूल्यें घसरली आणि गुळगुळीत बनलीं. या सर्वांचें प्रतिबिंब वाङ्मयांत पडणें अपरिहार्य होतं. उलट तें जितकें प्रकर्षानें पडावयास पाहिजे होतें तेवढें प्रतिबिंबित झालेलें नाहीं अशीच तक्रार करावी लागेल. आमचे कथाकार, विनोदी लेखक, कादंबरीकार अजून चाकोरीबाहेर,—आपल्या छोट्या विश्वाच्या बाहेर—जायला धजत नाहींत, किंवा जाण्याचें सामर्थ्य त्यांच्यापाशीं नसेल. आणि या चाकोरीबाहेर जाऊन एका वेगळ्या जीवनाचें भयानक चित्रण करूं पाहाणाऱ्या स. आ. जोगळेकर किंवा अरविंद गोखल्यांसारखे अपवाद हाताच्या बोटावर मोजण्याइतके थोडे ! शिवाय यांपैकीं एकहि लेखक व्यभिचाराचें अगर वेश्या-व्यवसायाचें प्रशंसन अगर समर्थन करीत नाहीं. उलट समाजस्थितीचें एक भीषण अंग समाजासमोर ठेवण्याचा तो एक लालित्यपूर्ण प्रयत्न आहे. आणि असे निर्मळ व निरोगी प्रयत्न जितके व्यापक तऱ्हेनें होतील तितकें वाङ्मय प्रसन्न, विविधांगी आणि वैभवशाली होईल हें निश्चित ! ●●●



युगें अठ्ठावीस क्यूमध्यें उभा
घरीं जातां करी रखुमाई शोभा ॥



# अपघात

रणजित देसाई

नर्सबाई गडबडीनें खोलींत शिरली, टेबलावरचें सामान सारखें तिनें लावलें. साऱ्या खोलीवर तिनें नजर फिरवली. खोलींत जमलेल्या मित्रांना ती म्हणाली.

" सर्जन येताहेत. "

बहुतेक सारे खोलीबाहेर गेले. बाहेर बुटांचा आवाज झाला. गौरवर्णाचे, मध्यम बांध्याचे, हंसतमुख सर्जन खोलींत शिरले व माझ्याकडे पहात म्हणाले,

" Good Morning. "

" Good Morning " मी उत्तर दिलें.

" बरं आहे ना ? " त्यांनीं हातांत हात घेत विचारलें.

" हो. "

नाडी पाहून होतांच ते म्हणाले " छान ! काळजी करायची नाहीं हं. भ्यायचं कांहीं कारण नाहीं. "

मी मान हलवली. सर्जन खोलीबाहेर पडले. आप्तस्वकीयांची गर्दी खोलींत उसळली होती. सारे येऊन पहात होते. खोटें हसून कांहींतरी निरर्थक बोलत होते. माझंही लक्ष कशांत नव्हतें. कसला विचार नव्हता. कांहीं नव्हते. ऑपरेशनचा गंभीरपणा मला ठाऊक होता. कदाचित मृत्यु आलाच तर......अवधी फार थोडा होता...बोलण्यासारखं कांहीं नव्हतं आजवरच्या आयुष्यावरून आठवणींचा पडदा सरकत होता. अचानक ती तंद्री भंगली. खोलींत स्ट्रेचर आणलें जात होतें. पलंगाला खेटून ती ढकलगाडी उभी करण्यांत आली. नर्सनें साऱ्यांना बाहेर घालवलें. त्या गाडीवर मला अलगद झोपवलें गेलें.

नर्स डोक्यापाशीं उभी होती. कॅरीडॉरच्या छतावरच्या मर्क्यूरी कांड्या एका पाठोपाठ मागें जात होत्या. दोन्ही बाजूला उभ्या असलेल्या परिचित अपरिचित मंडळींचे चेहरे भराभर मागें सरकत होते. माझे शुभ्रवस्त्राआड झाकलेले हात प्रेमभरानें दाबले जात होते. ते चेहरे नाहींसे झाले. ढकल-








अनुक्रमणिका

**केवढी सुंदर जागा ! आयुष्य संपायचें झालेंच तर माणसानें येथें यावें आणि सरळ आपलें अंग त्या प्रवाहात झोंकून द्यावें. केवढाही पातकी असो, ह्याच्याइतकें सुंदर मोक्षद्वार त्याला शोधून सांपडायचें नाहीं.**

गाडी वळविल्याची जाणीव झाली. काचेचीं कपाटें नजरेत आलीं. कसलातरी उग्रवास नाकांत शिरला. मी हें सारें पहात होतों.

हेड नर्स दाराशीं आली होती. तिचे बोलके घारे डोळे मला धीर देत होते. तिनें चढविलेल्या मास्क आडदेखील तिच्या चेहऱ्यावर हसूं असावें असें मला अकारण वाटलें. माझी गाडी आंत नेली गेली. सळसळ ऐकूं येत होती. डॉक्टर माझ्याजवळ आले. त्यांनीं माझ्याकडे पाहिलें व ते म्हणाले.

" करायचं ना ऑपरेशन ? "

" हो...मी वळेंच हसून म्हटलं.

" That's good " येवढें बोलून ते वळले. त्या ऑपरेशन थिएटरमध्यें आठ दहाजण शुभ्रवस्त्र धारण केलेले, ऑपरेशन पहायला आलेले सर्जन उभे होते. मला अलगद उचललें गेलें. ऑपरेशन टेबलाचा स्पर्श मला जाणवला. मान नकळत वर-खालीं गेली. कुणीतरी माझे कपडे काढत असल्याची जाणिव झाली. शरमेची एक तीव्र वेदना मनाला स्पर्श करून गेली. कोणीतरी मला म्हणालें " जरा एका कुशीवर वळतां ? "

मी पाहिलें, दुसरे डॉक्टर मला सांगत होते. मी कुशीवर वळलों.

" पाय पोटाशीं घ्या. "

मी तसें करतांच पाठीमागून आवाज आला " ठीक. "

माझ्या पाठीच्या कण्यावरून बोटें फिरत असल्याचें मला जाणवलें. कमरेच्या कण्यावर तीं बोटें स्थिर झालीं. एक असह्य वेदना उठली. मणक्यांत शिरणारी सुई-जाणवली मी नकळत कण्हलों. " आ-ऽ ऽ "

" झालं " ती वेदना तशीच कांहीं क्षण रेंगाळली आणि त्या ठिकाणीं परत बोटें खेळलीं.

" नीट झोपा. "

मी झोपलों. सर्जन मास्क चढवून तयार होते. त्यांच्या हातांत रबरी हातमोजे चढवलेले होते. माझ्या छातीवर स्क्रिन सरकविला गेला. डॉक्टर म्हणाले

" पाय नीट करा पाहूं ! करा ना. "

सारे हसल्याचा मला भास झाला. सर्जनचीं जाड भिंगें एका जागीं स्थिर झालीं होतीं. माझी नाडी कोणीतरी पहात होतें. एकवार सर्जननीं माझ्या उशाकडे पाहिलें व विचारलें.

" O. k. "

" Yes. "



सर्जननीं सर्वांवरून नजर फिरवली. अचानक वरचा मोठा दिवा पेटला. त्या प्रकाशझोतानें डोळ्याला अंधारी आली. सर्जननीं सर्वांकडे नजर टाकली. त्यांचे रबरी पंजे उंचावले होते. ते म्हणाले–

" Now ! we will start the operation "

" नाईफ ! " क्षणांत त्या पंजांत तें धारदार शस्त्र दिसलें. हात खालीं आले. मनामध्यें अकारण धडधड झाली. मी डोळे मिटले. सकरचंदाची फोड कापतांना आवाज यावा तसा अस्पष्ट आवाज आला. पण कांहीं जाणवत नव्हतें. एका पाठोपाठ सर्जनच्या हातीं शस्त्रें, उपकरणें दिलीं जात होतीं. त्यांच्या हातांची भराभर हालचाल होत होती. पण डोळे एकाच ठिकाणीं स्थिरावले होते. तें सारं दृश्य कंटाळवाणें होत होतं. अंग आळसावलं होतं. नकळत मी डोळे मिटले......

...कुणीतरी माझ्या कानाशीं संगीताचे सूर गुणगुणत होतें. ते परिचित संगिताचे सूर वाढतां वाढतां अगदीं स्पष्ट झाले. मी मान वर केली....

त्या प्रशस्त हॉटेलच्या हॉलमध्यें एका कोपऱ्यांत बॅंडस्टॅंड होता. शुभ्रवेष धारण केलेले कलावंत आपापलीं वाद्यें हाताशीं घेऊन एका सार्थांत वाजवत होते. वृंदवादनाचा संचालक उभा राहून हातातल्या छडीनें संगीताच्या लयीचे चढउताराचे इशारे वादकांना देत होता.

रंगपावडरीची सफेदी केलेल्या अनेक सुंदर युवती आपल्या स्नेह्यांच्या बरोबर गप्पा मारत होत्या. हसत होत्या. त्यांना मुक्त हस्तानें वापरलेल्या सेंटचा सुगंध, निरनिराळ्या मद्यांचा मिश्र दर्प आणि धुम्रवलयांनीं वातावरण भरून गेलें होतें. एखाद्या वेळीं कोपऱ्यांतील टेबलांवरून उठलेला हास्याचा किनकिनाट साऱ्यांचें लक्ष वेधून घेत होता.

पांढऱ्या शुभ्र पोषाखांतले वेटर्स टेबलांच्या मधून वावरत होते. वाईनबारवर सोड्याच्या बाटल्या फुटत होत्या. टेबलावरच्या मद्याचे चषक किणकिणत होते. मी माझ्या टेबलावरच्या रिकाम्या झालेल्या बीअरच्या बाटल्यांकडे पहात होतों. ४ ग्लासमधली बीअरची चव घेत, सिगारेट ओढत त्या हॉलमधलें वातावरण निरखीत एका कोपऱ्यांत बसलों होतों.

जेव्हां बीअर संपली तेव्हां वेटरला बोलविण्यासाठीं हात वर केला आणि चुटकी वाजवली. त्याचवेळीं त्या हॉलच्या प्रवेश द्वारांतून येणाऱ्या व्यक्तीकडे माझें लक्ष गेलें. माझा उंचावलेला हात तसाच राहिला. ती युरोपियन तरुणी दारातच थबकली. मोकळ टेबल धुंडाळण्यासाठीं तिची नजर हॉलवरून भिरभिरत होती. हातातल्या पर्सशीं तिचा चाळा चालला होता. वेटर धावला आणि तिला एका मोकळ्या जागेकडे बोट दाखविलें. वेटर पाठोपाठ ती जात होती. मी तिच्याकडे आश्चर्यचकित होऊन बघत होतों. ' छे ! जॅन हिंदुस्थानांत कसं शक्य आहे ? ' ती आली असती तर तिनें मला कळवलें नसतें का ? मी तिच्याकडे पहात होतों. मला शंका राहिली नाहीं. एवढं साम्य दोन स्त्रियांमध्यें असणें शक्य नव्हतें. मला तें पटेना. मी ताड्कन उठलों आणि इतर टेबलांच्या मधून वाट काढीत तिच्या टेबलाकडे जाऊं लागलों. जातांना एकदोन खुर्च्यांना माझा धक्का लागला. पण माफी मागण्याचेंहि मला भान नव्हतें. मी टेबलाजवळ पोंहोचलों तिची पाठ माझ्याकडे होती. ती बॅंडस्टॅंडकडे पहात होती. मी मागून हाक मारली.

" जॅन. "

" एस्... " म्हणत तिनें मान वळविली. मला पहातांच तिचे हात तोंडावर गेले, तिचे घारे नेत्र विस्फारले गेले. मी तिच्याकडे पहात







अनुक्रमणिका

हसत होतों. तिचें आश्चर्य निरखीत होतों. क्षणभरानें तिनें ओठावरचा हात खालीं घेतला. ती गंभीर झाली. माझ्या अपेक्षांना केवढा धक्का बसला. मला पाहून ती हर्षानें किंचाळेल, मला मिठी मारील असें मला वाटलें होतें. पण मला पहातांच तिची मान खालीं गेली होती.

" मला ओळखलं नाहींस ? सॉरी माझी चूक झाली. माफ कर..." एवढें रागानें बोलून मी पाठ फिरवली. त्याचवेळीं तिचे शब्द कानावर आले.

" अरु प्लीज. "

मी वळलों. तिचे नेत्र पाणावले होते. मी नजीक गेलों. तिचा हात हातांत घेतला. आणि हलकेच दाबला. त्याचवेळीं वेटर टेबलाजवळ आला. त्यानें मद्याचा चषक टेबलावर ठेवला. नॅपकिनमध्यें गुंडाळून आणलेली बाटली. तो उघडणार तोंच मी त्याला थांबवलें. मी विचारलें.

" काय मागवलंस ? "

" शेरी ! "

" शेरी ? हं. हें बघ. माझं टेबल निवांत आहे एका कोपऱ्यांत. मी माझ्या टेबलाकडे बोट दाखवून म्हणालें. " तिथं चल आपली भेट होत आहे आणि शेरी पिणार तूं ? येवढी अरसीक केव्हां झालीस ? उठ.

तिचे पाणावलेले डोळे खुदकन् हसले. ती उठली. वेटर आमच्याकडे पहात होता. मी टेबलापाशीं जातांच जीनला खुर्ची दिली. तिच्या जवळच्या खुर्चीवर मी बसलों. वेटर नजीक आला. टेबलावरच्या तीन रिकाम्या बीर बाटल्या व अर्धा बीरचा ग्लास पाहून जीन म्हणाली

" हा तुझा पराक्रम ? "

" हो ! "

" लंडनमध्यें तुला एक बाटलीहि खपत नव्हती ना ? "

" हो ! लंडनमध्यें. पण ती नशा बीरची नव्हती.

" मग ? " तिनें मिस्कीलपणें विचारलें.

" तुला माहीत नाहीं ? "

मोठ्यानं हसत ती म्हणाली, " कांहीं सुद्धां बदलला नाहींस ना ? "

" खोटं वाटतं बघ हवं तर. " म्हणत मी त्या बाटल्यांच्या गळ्या-मधून एकाही बाटलीला स्पर्श न करतां बोट फिरवलें. जीन मोकळेपणानें हसली आणि तिनें हळुवार टाळ्या पिटल्या. वेटर खाकरला. आम्ही दोघांनीं एकमेकांकडे पाहिलें. मी विचारले,

" काय घेणार ? "

" कांहींहि " ती म्हणाली.

" शँपेन. "

" हूं ! "

मी ऑर्डर दिली. वेटर रिकाम्या बाटल्या घेऊन गेला. मी विचारलें " जीन, केव्हां आलीस तूं ? "

" महिना झाला. "

" महिना ? आणि तरीहि कळवलं नाहींस ना ? कशी आलीस तूं ? "

" फोर. एच्. मधून "

" मग मला कां नाहीं कळवलंस ? "

" त्याला कांहीं अर्थ नव्हता. "

" मग कां आलीस तूं ? "

" मी सांगितलं ना ? "

" हो ! पण तें खरं होतं ? तेवढंच कारण होतं ? "

" अरु ! प्लीज, आपण भांडूयां नको. "

" ठीक ! " मी स्वतःला सावरत म्हटलं.

वेटरनें दोन चषक टेबलावर ठेवले. ते गुलाबी उंच गळ्याचे चषक मोठे मोहक दिसत होते. स्टेनलेसचा बर्फानें भरलेला कटोरा टेबलाच्य मध्यभागीं ठेवला गेला. शँपेनच्या बाटलीचा उंच गळा त्यांतून डोकावत होता. मी वेटरला खुणावलें. त्यानें नॅपकिन हातांत घेऊन बाटली उचलली. बाटली उघडल्याचा आवाज झाला. चषकामध्यें तो शँपेन ओतूं लागला. मी जीनला विचारलें,

" लेमोनेड ? "

" नको. "

मद्य ओतून वेटर निघून गेला. मी माझा ग्लास उचलला. तिच्या हातांतल्या ग्लासाला टेकवत म्हणालों–

" To our golden past . "





अनुक्रमणिका

" Yes, past. " म्हणत तिनें तो चषक तोंडाला लावला. एका घोटामध्यें मी तो चषक रिकामा केला. जीन उद्गारली.

" अरु ! "

" घाबरूं नको. मी नेहमीच घेतों. त्याची मला संवय करावीच लागली. " म्हणत मी माझा चषक पुन्हां भरला. कांहीं न बोलतां मी सिगारेटकेस बाहेर काढली व जीनसमोर धरला. जीनने एक सिगारेटकेस घेतली. लायटरनें तिची सिगारेट शिलगावून मी माझी सिगारेट पेटविली. बराच वेळ मद्याची चव चाखीत आम्हीं न बोलतां बसून होतों.

व्हायोलीन सुरू झालें. त्याला वाद्यवृंद साथ देऊं लागला. या पूर्व-परिचित संगीतानें वृत्ति बहरून आल्या. न कळत पावलें ताल धरूं लागलीं. झांजवाल्यानें एक मोठा झणत्कार करून वॉल्झची लय सुरू झाल्याचा इषारा दिला. नाजूक हळुवार सूरांचीं वेटोळीं घेत जाणारें संगीत सुरू होतांच एकेक जोडपें उठूं लागलें. वाद्यवृंदाच्या समोरच्या मोकळ्या जागेंत नृत्याचीं पावलें टाकूं लागलें. मी जीनकडे पाहिलें. तिनें मांडीवरची पर्स टेबलावर ठेविली व ती उठली. मी तिच्या पाठोपाठ उठलों. आम्हीं नृत्याच्या जागीं जातांच जीन माझ्या समोर उभी राहिली. तिनें एकवार माझ्याकडे पाहिलें व दृष्टि वळविली. लयीचा अंदाज घेऊन मी तिच्या नाजूक कटीभोंवतीं हाताचा विळखा घातला. आमचीं शरीरें एकमेकाला भिडलीं. आणि गोलाकार पावलें पडूं लागलीं. नाचतां नाचतां तिनें आपलं मस्तक माझ्या छातीवर टेकलें. तिच्या भरदार वक्षस्थळांचा स्पर्श मला जाणवला. माझी तिच्या कमरेवरची पकड नकळत आवळली गेली. आणि माझ्या खांद्यावर तिचीं नाजूक बोटें रुतलीं. आम्हीं दोघेंही बेभान होऊन नृत्य करत होतों.

वाद्यवृंद थांबला. हातांच्या मिठ्या सैल झाल्या. टाळ्यांचा कडकडाट झाला. जोडपीं परतणार तोंच वाद्यवृंदसंचालकानें आपल्या छडीचा आवाज केला. फॉक्सट्रॉट नृत्याची लय सुरू झाली. परतणारीं जोडपीं पुन्हां नृत्य करूं लागलीं. मी जीनकडे पाहिलं. जीन म्हणाली.

" नको, थकलें मी. "

" ठीक ! "

आम्हीं दोघें टेबलाकडे परतलों, पुन्हां मद्य ओतलें गेलें. जीन म्हणाली,

" मला नको. "

" कां ? घे ना. "

" अगदीं थोडी. तूं घे हवी तर. "

मी मद्य चाखत होतों. जीनकडे पहात होतों. जीन आपल्या रुमालाशीं चाळा करत होती. मी तिच्या हातावर हात ठेवला आणि दाबला.

" जीन, बोल ना. "

" तूं सांग मी ऐकतें. "

" हें तुझें नेहमींचेंच आहे ! तूं बेंगलोरला केव्हां आलीस ? "

" झालें चार दिवस. "

" किती दिवस आहेस इथं. ? "

" उद्यां जाणार.

" रहा ना. "

" माझे कार्यक्रम निश्चित झाले आहेत अरु ! " आर्जव आणून ती म्हणाली. मी घड्याळाकडे पाहिलं व म्हणालों.

" आपण जेवण घ्यायला दुसऱ्या ठिकाणी जाऊं. सुंदर जेवण मिळतं. "

तिनें होकारार्थी मान हलवतांच मी वेटरला खुणावलें. त्यानें बिल आणून समोर ठेवलें. बिलाचे पैसे देऊन मी जीनसह बाहेर पडलों. टॅक्सींतून ' चायना ' हॉटेलकडे जातांना जीन कांहीं बोलली नाहीं. अथवा माझ्याकडे पाहिलंही नाहीं. हॉटेलमध्यें पोहोचल्यावर मी तिला वर घेऊन गेलों. छोट्या खोलींत आम्ही जाऊन बसलों. वेटरला जेवणाची ऑर्डर दिली. तो निघून जातांच जीनला मी मिठींत घेतलें. तिनें विरोध केला नाहीं. तिचें दीर्घ चुंबन घेत असतांनाही तिनें त्याला प्रत्युत्तर दिलें नाहीं. मी मागें सरकतांच ती म्हणाली—

" अरु ! मला येवढ्यासाठींच का इथं आणलंस ? " तिचे डोळे पाण्यानें भरलें होते. मी म्हणालों

" माफ कर ! पुन्हां मी त्रास देणार नाहीं. वचन ! " मी माझा रुमाल काढून तिच्यापुढें धरला. तिनें डोळे टिपले. नाक शिंकरलें. रुमाल खिशांत ठेवत असतांना ती म्हणाली--

" अरु रागावलास ? "

" नाहीं जीन ! तुझ्यावर मी रागावूं शकत नाहीं; हे तुला माहीत नाहीं का ? पण जीन मी तुला विसरूं शकत नाहीं. आपण त्याचवेळीं लग्न केलं असतं तर आज असे दुःखी बनलों नसतों.

" छे मला तसं वाटत नाहीं. जें झालं तें ठीक "

वेटर आंत आला. टेबल मांडून होतांच जेवणाच्या बशा यायल्या सुरवात झाली. गप्पांना मोकळेपणा आला. लंडनच्या आठवणींना उजाळा दिला जात होता. मध्येंच जीननें विचारलें.

" तुला तो मायकेल आठवतो ? "

" कोण तो धटींगण ? वाऽ" मी मोठ्यानें हसत म्हणालों. " त्याला कसा विसरेन मी. तो तुझा हवा तिथें उपमर्द करायला मागें-पुढें पहात नसे. "

" श्रू ! " ती ओठावर बोट ठेवून म्हणाली. " आतां तसं तुला बोलतां यायचं नाहीं. "

कां ? "

" तो माझा पती आहे. "

माझ्या हातांतला काटा तसाच राहिला. त्यानें पकडलेला तुकडा सुटून बशींत पडला. मी विचारलें " काय सांगतेस ? "

" हो ! खरं आहे तें. "

" छान ! म्हणजे माझ्यापेक्षां तुला तो आवडला. "

" अरु ! असली थट्टा करूं नकोस. " क्षणभर थांबून ती म्हणाली. " तूं गेलास म्हणून मी त्याच्याशीं लग्न केलं. "

" मी समजलों नाहीं. "

" समजेल ! एक दिवस तुला जरूर त्याचा अर्थ समजेल. पण तो कळूनही आतां त्याचा फारसा उपयोग नाहीं. तें जाऊं दे. मला सांग तूं लग्न केलंस कीं नाहीं ? "

" अहं ! पण करीन. "

" केव्हां ? "

" लवकरच "

जीन कांहीं बोलली नाहीं. जेवण संपलं. मी पैसे दिले. उठत असतां मी विचारलें " जीन तूं कुठें उतरलीस ? "

" हॉटेल ग्रँड "

अनुक्रमणिका




" निदान आजची रात्र आपली आहे. आपण मजेंत घालवूं. "

" नाहीं अरु ! मी उद्यां हॉटेलांत जाणार. " तिच्या आवाजांत निश्चय होता.

" एकटी ? "

" हो. "

" ठीक ! पुन्हां केव्हां भेट. "

" तें शक्य होईल असं दिसत नाहीं. "

" त्यापेक्षां तुझी इच्छा नाहीं हें कां सांगत नाहींस ? "

" अरु असं बोलूं नकोस. " कापऱ्या आवाजांत ती म्हणाली, तुला कसं समजत नाहीं ? स्त्री एकदांच प्रेम करूं शकते. मी तुझी होतें आणि तुझीच राहीन. "

" मग ? "

" त्यासाठींच मी धडपडतें आहे. "

" आपण जाऊंया " मी थंडपणें म्हणालों.

आम्हीं उठलों. पुढें जाणारी जीन एकदम वळली. आणि माझ्या गळ्याला मिठी घालून तिनें मोठ्या आवेगानें चुंबन घेतलें आणि दुसऱ्याच क्षणीं ती खोलीबाहेर पडली. रुमालानें ओंठ पुसत मी तिच्या पाठोपाठ जात होतों. हॉटेलबाहेर एक टॅक्सी उभी होती. मी जीनला म्हणालों,

" जीन ! तुला मी हॉटेलमध्यें सोडीन आणि मी तसाच पुढें जाईन. "

" नको अरु ! मी ऐकटीच जाणार. तूंच म्हणाला होतास ना ? Parting slow is a lengthened sorrow ! "

" मग तूं टॅक्सी घेऊन जा. "

" आणि तूं ? "

" मी दुसरी पाहीन. "

टॅक्सीचा दरवाजा मी उघडला. जीननें माझा हात हाताशीं घेतला. आपल्या गालाशीं टेकवला आणि पटकन् ती गाडींत शिरली. दार बंद केलें. मी खिडकीशीं वाकलों व म्हणालों,

" बाय, बाय ! कदाचित सकाळीं येईन मी. "

तिनें माझ्या केसांना स्पर्श केला व हसण्याचा प्रयत्न करत ती म्हणाली " खट्याळ आहेस "

टॅक्सी सुरू झाली. डांबरी रस्त्यावरुन भरधांव जाणाऱ्या त्या टॅक्सीकडे पहात मी उभा होतों. रात्र वाढली होती. हॉटेलचा प्रकाश सोडला तर सारा रस्ता काळोखांत बुडाला होता.

सकाळीं मला जाग येतांच कपडे करुन मी हॉटेलच्या बाहेर पडलों. हॉटेल ग्रँडमध्यें पोंहोचलों. पण जीन तेथें नव्हती. ती रात्रींच बेंगलोर सोडून निघून गेली होती. जीन गेली होती......गेली होती......... कुणीतरी माझ्या कानाशीं कुजबुजत होते.. ...

" I should'nt have taken such a complicated case.........नर्स, मॉस्किटो-फॉर्सेप, लवकर......"

मी डोळे उघडले. अंधुक दिसत होतें. डॉक्टरांचा चेहरा मोठा वाटत होता. कुणीतरी माझें कपाळ टिपलें. माझा एक हात दुसऱ्या डॉक्टरांच्या हातांत होता. ते विचारत होते--

" त्रास होतो ? "

" नाहीं. " मी पुटपुटलों. माझी नजर वर गेली. त्या प्रकाश झोतानें मी डोळे मिटले. केवढा प्रकाश !.....

## क्षितीजाच्या रेषेपाशीं

क्षितीजाच्या रेषेपाशीं
एक रात्र थांबलेली
वाकलेल्या सावल्यांची
आहे पहात वाटुली
मुक्यांतल्या त्या रात्रीला
मंद श्वासांची किनार
ओठांतल्या दंवामध्यें
मऊ झालासे अंधार
शब्द झाले बर्फ तरी
स्पर्शालाहि भाषा फुटे
रात्र झाली फिकी फिकी
पाकळ्यांत पाणी दाटे
काळ्या कुरळ्या जाळीचा
कोंप पहांटे भोंवतीं
कापराचे क्षण चार
दोन उजळल्या ज्योती
उदंड या यात्रेंतली
रात्र अशी अर्धीपिशी
अजाणता विलगावी
चार मूक पापण्याशीं !

— पद्मा गोळे



## हें बरें नव्हे........

उमलल्या गुलाबापरी
तुझ्या या टाचा
करितात चुराडा
पर्थी किती हृदयांचा !
हें बरें नव्हे गे,
काय अशी भरदिवसा
तूं येतां-जातां—
उगा करावी हिंसा !

—वि. म. कुलकर्णी

......कानांत अनके आवाज घुमत होते. त्या आवाजांत रुद्रता होती. त्याचा गंभीर नाद वाढत होता. समोर अर्धचंद्राकृति पर्वतावरून प्रचंड प्रवाह दरींत कोसळत होता. अखंड नाद साऱ्या दरीवर उठत होता. पहाटेचें कुंदावलेलें वातावरण, दाट धुकें आणि समोर फक्त जोग. अंगावर दंव पडत होतें. अखंड नाद कानांत भरत होता. तें रुद्रसौंदर्य बेभान होऊन मी पहात होतों. दाट धुक्याचें पटल चढूं लागलें आणि जोग पुन्हां नाहींसा झाला. आतां फक्त प्रपाताचा गंभीर नाद तेवढा कानावर येत होता. धुक्यानें आच्छादलेल्या दरींतून धुक्याचे प्रचंड लोट वर उसळत होते. आकाशांत चढत होते. दिसत मात्र कांहीं नव्हतें. जाणवत होतें तें मात्र फार मोठें. मन व्याकूळ करणारें. एकटेपणाची जाणीव तीव्रतेनें झाली. ललितेची उणीव भासूं लागली. हें विशाल दर्शन एकमेकांशेजारीं बसून आपण घेतलें असतें तर जीवनांतल्या रुद्रतेचा, भव्यतेचा, त्यागाचा साक्षात्कार आपल्याला झाला असता. कांहीं न बोलतां समजलें असतें. सारें कळलें असतें असें वाटलें. अंगावर येणाऱ्या ह्या दंवानें तुझा सुंदर चेहरा ओलाचिंब झाला असता. मी तो रुमालानें टिपण्याचा प्रयत्न केला असता तर तूं म्हणाली असतीस

" नको राहूं दे. "

हें तूं म्हणणार हें मला ठाऊक आहे. म्हटलें नसतेंस तर माझी निराशा झाली असती. ह्या सौंदर्याच्या ओढीनेंच आपण एकत्र येतों ना? तुझ्या चेहऱ्यावरचें तें गूढ हास्य ह्यावेळींही दिसलें असतें. इतक्या वर्षांच्या परिचयामध्यें मी त्याचा अर्थ लावूं शकलों नाहीं. तें समजूं शकलों नाहीं. वासना अनिवार्य आहे पण त्यापेक्षांही प्रेमाचा ओघ शतपटीनें प्रबळ आहे.



त्यांत रुद्रता नाहीं. त्यात समाधान आहे. जगण्यासारखें कांहींतरी आहे. हें आयुष्यांत तूंच मला प्रथम शिकवलंस

तो एकांत; तें दाट धुकें, तो रुद्रनाद ह्यानें मी बेचैन झालों. ललितेला बोलावण्यासाठीं मी बंगल्याच्या पायऱ्या चढलों. ललितेची खोली रिकामी होती. तिथें कोणी नव्हतें. मी हाका मारल्या " ललिता...ललिता...!

ललिता माझ्या आधींच उठून बाहेर पडली होती. अशा पहाटे ही कुठें गेली? मी तसाच बाहेर पडलों. त्याच वेळीं नोकर धावत आला आणि म्हणाला

" साहेब ! त्या खालीं उतरतांना मी पाहिल्या होत्या. "

" कुठें? "

" जोगकडे ! " त्यानें बोट दाखविलें. जोगच्या तळाकडे जाण्याचा तो रस्ता होता. मी तसाच निघालों. भराभर पायऱ्या उतरत; उतरण पार करीत मी जात होतों. धुकें विरळ होत. होतं प्रत्येक वळणावर मी पहात होतों. हाक मारीत होतों. अगदीं दरीच्या तळाशीं मी पोंहोचलों. जोगच्या उसळत्या तुषारांनीं मी भिजत होतों. त्या दाट धुक्यांतून मी निरखत होतों. मध्येंच धुकें एकदम विरळ झालें. मी पाहिलें-तों समोरच्या दगडावर ललिता उभी होती. ती वर पहात होती. मी मान वर केली. आकाशांतून फेंसावत येणारा तो ओघ एकदम माझ्या नजरेंत आला. त्याची रुद्रता एकदम दिसतांच मनाचा थरकांप झाला. पण त्या रुद्रसौंदर्यावरून डोळे बाजूला सरकत नव्हते. मंत्रमुग्ध होऊन मी तो प्रपात पहात होतों. भानावर येऊन मी पाहिलें. ललिता अजून तशीच उभी होती. मी तोल सावरत सावरत तिच्या मागें जाऊन उभा राहिलों तरी तिला भान नव्हतें. मी तिच्या खांद्यावर हात ठेवला. तिनें चमकून मागें पाहिलें. तिच्या नजरेशीं नजर देत मी हसलों. ती हसत हसत कांहींतरी बोलली. पण त्या धबधब्याच्या आवाजांत कांही ऐकूं आलें नाहीं तिनें माझ्या खांद्यावर मान टेकली. ती संपूर्णपणें ओली चिंब झाली होती. मी तिला मिठींत घेतली. ती कानाशीं कांहींतरी पुटपुटली. क्षणांत तिचें सारें अंग सैल पडलें. गडबडीनें मी तिला हातावर घेऊन मागें परतलों. जरा दूर अंतरावर येऊन मी तिला हिरवळीवर ठेवलें. तिनें डोळे उघडले. ती हसली व उठून बसत म्हणाली.

" रागावलांत? "

" काय? " ओरडून विचारलें.

" रागावलांत? " ती मोठ्यानें ओरडून म्हणाली.

नकारार्थी मान हालवत मी तिच्या कानाशीं मोठ्यानें म्हणालों " पण ह्या पुढें तुला एकटी जातां येणार नाहीं "

" कां? " ती मिस्कीलपणें हसत म्हणाली. तिचे ओलेचिंब झालेले केस, भिजलेला चेहरा, तिचें सारें सौंदर्य आगळें वाटत होतें. तिला मिठींत घेत मी ओरडलों

" मी लग्न करणार आहें. "

" कुणाशीं? " तिनें मोठ्यानें विचारलें.

मारण्यासाठीं हात उगारतांच ती मला बिलगली. तिच्या मिठींत मी सुखावलों. मी तिच्या कानाशीं म्हणालों

" होशील ना माझी? "

" उंहूं ! " म्हणत ती पटकन् उठली आणि धावत सुटली. मी तिला पकडण्यासाठीं धावलों. भिजल्यामुळें वस्त्र अंगाला चिकटत होतें. त्यामुळें तिला पळतां येत नव्हतें. मी तिला पकडलें. ती प्रसन्नपणें हसत होती मी म्हणालो

" चल वर अशानं आजारी पडशील. " मी तिचा हात पकडला. ती पट्टकन पुन्हां बसली आणि तिनें वर बोट दाखवलें. मी मान वर वळविली. जोगचें एक निराळेंच वैभव तेथून दिसत होतें. धुकें संपूर्णपणें निवळलें होतें. नकळत मी बसलों. ललिता म्हणाली

" तो वीरभद्र पाहिलास ?"

" कोणता ? "

" राजाच्या अलिकडचा. त्याचा शुभ्र जटाजाल मन मोहून टाकतो नाहीं ? हा जोग पाहिला कीं मला गंगावतरण आठवतें. "

" पण मला आवडतें ती राणी. बघना किती शांत आहे ती ! ह्या वीरभद्राचा प्रचंड नाद, रुद्र रूप, त्याच्या प्रपातांतून उंचवळणारे हे फवारे, त्यापेक्षां किती वेगळी आहे ती. मी तिचं नांव शुभांगी ठेवलं असतं. मला तीच आवडते. "

" कां ? "

" तुझ्यासारखी आहे म्हणून. "

" चल उठ ! " म्हणत ती उठली आणि चालूं लागली.

" ललिता ऽ ऽ " मी हांक मारली. " ललिता.........

........................ "

...... मी डोळे उघडले. माझा जीव कासावीस होत होता. श्वास घ्यायला जड जात होतें. सर्जनचा चेहरा घामानें डवरला होता. त्याचे हात वेगानें हालत होते.

" ऑक्सिजन " आवाज आला.

नाकामध्यें शिरलेल्या नळ्यांची जाणीव झाली. क्षणांत गार फवारे नाकांत उडत असल्याचा भास झाला. डोकं थंडावत होतं. डोळे मिटूनही डोळ्यांच्या कडांतून पाणी ओघळत होतें......

जोगच्या कड्यावर मी उभा होतों. नजिकच पाण्याचा प्रवाह वेगानें उडी घेत होता. वरून खालीं पडणारा प्रवाह पहात असतां त्याच्या झेपेची धाव मनाला वेडें करीत होती. एकदां ह्या ठिकाणीं मी व ललिता उभे होतों. ललितेचा हात माझ्या हातांत होता.

" केवढी सुंदर जागा ! आयुष्य संपायचें झालेंच तर माणसानें येथें यावें. आणि सरळ आपलें अंग त्या प्रवाहांत झोंकून द्यावें. केवढाही पातकी असो त्याच्याइतकें सुंदर मोक्षद्वार त्याला शोधून सांपडायचें नाहीं.

" असं बोलूं नकोस. अद्याप आपला विवाह व्हायचा आहे. संसार होणार आहे. सारें जीवन आपण घडविणार आहों. आज मृत्यूबद्दल विचार करायला सवड नाहीं. "

" मृत्यूबद्दल एवढी भीति वाटते तुला ? "

" हो ! जीवनाबद्दल ज्याला आसक्ति आहे; त्याला मृत्यूबद्दल भय हें रहाणारच. "

" खुळा आहेस अरविंद ! मृत्यूबद्दल भय जेव्हां नाहींसें होईल तेव्हांच खरें जीवन उपभोगतां येतं. "

मी आवेगानें ललितेला मिठींत घेतलं. तिच्या कपाळाचीं, गालाचीं चुंबनें घेत कानाशीं म्हणालों " मला तें माहीत नाहीं. मला तूं हवीस तूं ! "........

तीच ही जागा. तोच हा प्रवाह पण येथें ललिता नाहीं. संसाराचं वचन देऊन संसार करण्याआधींच ती निघून गेली. ज्याची तिला भीति वाटत नव्हती त्याला मिठी मारण्यांत तिनें संकोच कां बाळगावा ? राहिलों तो मात्र मी ! एकटा. एकटा आणि दुबळा..... .. •

..." त्रास होतो का ? "

" हं ! "

" त्रास होतो का ? "

" नाहीं कष्टानें डोळे उघडले. नर्स माझा घाम टिपत होती, मी नकारार्थी मान हलवली- सारं शरीर थकलं होतं. आयुष्यांत हें ऑपरेशन संपेल असं वाटत नव्हतें. सर्जनकडे पहाण्याचें धैर्यही अंगांत नव्हतें. मी परत डोळे मिटले.

त्याच वेळीं सर्जनचा आवाज आला. lengthen the period...

नाकांतल्या नळ्या काढल्या गेल्या. नाकावर कांहींतरी ठेवलें गेलें. उग्र आंबट वास नाकांत शिरला. डॉक्टर सांगत होते. आंकडे मोजा एक...

मी म्हणालों, एक...दोन...तीन...

" मोजा. "

" चार...पांच...दहा...बारा...एक...दोन...

मी डोळे उघडले तेव्हां; कांहीं क्षणीं भेत नव्हतें. मस्तक जडावलें होतें. सारं बळ एकवटून मी आजूबाजूला पाहिलें. दवाखान्यांतल्या माझ्या खोलींत मी होतों. पलंगाला लागूनच एक स्टँड होता. त्याला उलटी टांगलेली बाटली दिसत होती. घाऱ्या डोळ्यांची नर्स जवळच उभी होती. माझ्या उघडणाऱ्या डोळ्याकडे पहात होती. पाठोपाठ सर्जनचा चेहरा माझ्या नजरेंत आला. ते माझ्याकडे पहात हसत होते. माझा हात दाबत तें म्हणाले.

" My boy you are saved, congratulations "

" थँक्यू " मी पुटपुटलों. माझे डोळे भरून आले. माझा हात थोपटत सर्जन म्हणाले.

" No No, you shouldn't " ●●●





अनुक्रमणिका

( पान १२७ वरून चालू )

बसणें नको होते. सणसणणाऱ्या पाठीला कुठेंतरी आधार, ताण मिळेल असें मऊ‍स्थ‍चे होते. त्यानें कांहीं न बोलतां आशाळभूतपणानें बाजल्याकडे, शकीकडे पाहिले. शकीनें निर्विकारपणें त्याच्या नजरेला नजर भिडवली, पण ती हलली नाहीं. एक सुस्कारा सोडून दाजी फळीवर बसला. त्यानें पाठीनेंच भिंत चांचपली, व त्यांतल्या त्यांत बरी जागा पाहून तो टेकला, व त्यानें गुडघ्याभोंवतीं हात गुंडाळले. " दुर्गी बाहेरच बसलेय. " जणू स्वतःशीच तो म्हणाला, " डांस आहेत तिथं. "

दुर्गी अद्याप बाहेर कट्ट्यावर होती. समोरील औटहाऊसमध्यें दिवा लागल्यावर तिला शकीचा, डांसांचा, चुरचुरणाऱ्या डोळ्यांचा विसर पडला. तिचा जीव गोळा होऊन उठला, व ती अगदीं कावरी-बावरी झाली. लक्ष्मण घरीं परत आला होता. तो त्या इमारतींत रातपाळीचा पहारेकरी होता. दिवसभर तो जवळ जवळ खांद्यापर्यंत वर केलेल्या हातांचे गडद निळ्या रंगाचे शर्ट, उजव्या हातांत झगझगीत पट्ट्याचे घड्याळ घालून गांवांत हिंडत असे. तास न् तास आपल्या खोलीबाहेर उभा राहून डोक्यावर तुऱ्यासारखे केस आणण्याचा तो प्रयत्न करत असे. दुर्गी गलबलली. आत्तांच्या आत्ता त्याच्याकडे जावे व धरणें धरून बसावें असें तिला वाटूं लागले. पण तिनें तो मोह आवरला. पण आतां तिला तेथें बसवेना. असेंच जर आपण येथें बसून राहिलों तर झोपेंत असल्याप्रमाणें आपण आपल्याला न कळतच तिकडे चालत जाऊं असें वाटून ती पटकन् उठली व आंत आली.

कृष्णा नव्हता तरी देखील ती जागा माणसांनीं गच्च झाल्यासारखी वाटूं लागली. दुर्गी हलकेंच बाजल्याच्या कडेला बसली. शकीची पावले तेथेंच होती. तिनें नखे रंगवायला कधीं सुरवात केली होती कुणास ठाऊक. पण त्या रुंदाड टांचफुटक्या पावलांवर तो रंग गांवढळ वाटत होता. ते जणूं रक्तांचे डाग असल्याप्रमाणें दुर्गीनें शकीकडे पाहिलें व तिला शकीचा फार राग आला.

बाहेर कसलीतरी गडबड ऐकूं आली, व कुणीतरी लाथेनेंच दरवाजा उघडला. कडी खळखळां हलली व चौकटींतून मूठभर माती घरंगळली. मागून कुणीतरी ढकलल्याप्रमाणें कृष्णा आंत आला. त्याच्या मागें शेजारच्या वकीलाचा गडी मारुती होता.

" चोर कारटं ! पोलीसांच्या ताब्यांतच द्यायला पाहिजे होतं. चामडीच काढली असती बेरडाची. " तो खेकसला. वारणाई चटकन उठली, व तिनें कृष्णाला जवळ घेतलें. त्याचा चेहरा लालसर झाला असून त्यावर बोटें उठलीं होतीं.

" काय केलंय त्यानें ? " तिनें विचारले. शकी एका अंगावर वळली व तिनें मारुतीकडे पाहिले. मारुती तिच्याकडे पाहून हळूच हंसला, पण लगेच वारणाईकडे पाहून तो चिडून म्हणाला " विचार कीं तुझ्याच कारट्याला ! गेले पंधरा दिवस परसांतील दुधी भोपळे, दोडकीं चोरीला जात. मी म्हणायचा, कोण बरं इथं यायला सोकावलंय ? आज पण बेरडाला नेमका पकडला. चार दिवस पाळतीवर आहे, आणि आज हा येतोय साला— "

कृष्णानें चोरी केली या गोष्टीवर वारणाईचा विश्वास बसेना. ती एकदम तापल्यासारखी झाली. " आग लाव तुझ्या भोपळ्या दोडक्यांना ! त्याला काय करायची आहेत तुझीं दोडकी घेऊन ! काय रे कृष्ण्या, तू घेतलीस यांची भाजी ? "

" नाहीं ग, मी कशाला घेऊं यांची भाजी ? " हुंदके देत कृष्णा म्हणाला " मला काय करायची आहेत याची दोडकीं घेऊन. "

" मी कशाला घेऊं ? " वेडावत मारुती म्हणाला " मग आमच्या परसांत काय तुझ्या बापाचें गांठोडें होतं ? "

दाजीनें निर्जिव डोळ्यांनीं वर पाहिलें. हें सारें दुसरीकडे कुठेंतरी, निराळ्याच भाषेंत चालल्याप्रमाणें तो सारे निर्विकारपणें पहात होता.

त्याचा चेहरा एकदम सुरकुतल्यासारखा झाला, व त्यानें दांत आवळून धरले. डाव्या बाजूला सुई सर्र लागली होती. ती खोलखोल जाऊं लागली. वारणाई, कृष्णा, मारुती या सगळ्याभोंवती जाळाची थरथरती लाल कड असल्याप्रमाणें त्याला दिसूं लागले आणि त्यानें छातीवर हात दाबून खालीं मान घातली.

पुन्हां सांपडला तर तंगडीच मोडून देईन अशी तंबी देऊन मारुती निघून गेला. वारणाईनें कृष्णाकडे पाहिलें. अस्वस्थपणें चुळबुळ करत तो एका पायावरून दुसऱ्या पायावर होत होता.

"मी तिथं गप्प उभा होतो. आणि दुधी भोपळ्याचा वेल आंगावर पडला" कुणी विश्वास ठेवणार नाहीं हें माहित असूनहि तो आवेशानें सांगू लागला.

"पण तूं त्यांच्या परसांत कशाला गेला होतास मरायला?" शकीनें शरमून विचारलें.

कृष्णा गप्प बसला. वेल कोसळला नव्हता. भोपळा तोडत असतां मांडव मोडला होता. गिरणीच्या बाजूला भटाचे दुकान आहे, तेथें भाजी देखील मिळत असे. त्या दुकानांत मागच्या बाजूनें गेलें कीं भट दुधभोपळे दोडकी यांना दोनचार आणे देत असे. परवां दिवशीं दोडक्यांवर आलेल्या दोन आण्याचे कृष्णानें बटर बिस्किटें घेतली होती. आणि दोनच्या सुट्टीनंतर सारा वेळ शाळा सुटेपर्यंत तो बाहेर चिंचेखालीं बसून ती कुरकुरीत समाधानानें खात होता.

वारणाईनें तर एकदम हबकाच खाल्ला. ती ताडकन् त्याच्या दिशेनें उठली, पण लगेच तिनें भिंतीचा आधार घेतला. खोकल्यानें असहाय होऊन ती मटकन खालीं बसली. पण खोकत असतांहि बटबटीत ओलसर डोळ्यांनीं ती त्याच्याकडे पहात होती. त्या डोळ्यांतील रागानें तिला जे कांहीं सांगायचे होतें तें सांगितले.

वारणाईनें दणादणां चार ताटल्या आदळल्या, व वाट्या मांडल्या. भाकऱ्या दुपारच्याच, त्यांतल्या त्यांत पातळशी भाकरी बघून तिनें एका ताटलींत घातली. व ती दुर्गीकडे सरकवली. "चल ग दुर्गी, घ्या खाऊन" ती सगळ्यांनाच उद्देशून म्हणाली. वांग्याच्या फोडी असलेलें लालसर पाणी तिनें चुलीवरूनच सगळ्यांना वाढले. डांगराच्या पातेल्यांत काळसर ताक ओतून तिनें ते पातळसे केले, व

........................................................



# त्या लुकलुकणाऱ्या तारा

— *शां. शं. रेगे*

चित्रगुप्ताच्या सचिवालयीं मानवी दिनक्रमाची पुरी नोंद
आत्मा जन्म नवा घेई वासांसि जीर्णानि विहाय
त्याची नोंद--जन्म कधीं, केव्हां, कुठें ?—
सिंगलरूम कीं प्रासाद, अथवा शुभ्र सुतिकागृहाच्या शुभ्र मंचकावरि
शुभ्र मातेच्या उदरीं असहाय, करि ट्यँहा, कधीं बा-बा, कधीं श्रीग
कधीं व्ह. फा.—कशी शिक्षा, कधीं दीक्षा ? उरे रक्षा आकांक्षांची मग.
करावी कारकुनी, निळीतांबडी, धावाधावी चक्रनेमिक्रमेण
शुभमंगल गृहितागमेशी तारावलं चंद्रबलं तदेव.
जोडीनें करिती धर्मसंचय—खाउनी शिळ्या पोळ्या
सदनीं टाकिती धापा, लोटती देहा शिणलेल्या कष्टागमाजीं—
—अशा परार्ध आत्म्यांची कणाक्षणाची हालचाल
चित्रगुप्ताचे नोंदिती अब्ज दक्ष कारकून मांडुनी पसारा
शोधिती सांधिती संदर्भ पापपुण्याचा आत्म्यांच्या
—पुनर्जन्म कीं ब्रह्मस्वरूपीं चिरमीलन
असंख्य दस्त भरलेले—छिद्रें पाडुनी पाडुनी
त्या त्या आत्म्याच्या फायली भरुनी भरुनी
कंटाळला, कातावला चित्रगुप्ताचा पट्टेवाला
रित्या करी प्रतिदिनीं कारकुनांच्या पंच-मशीनी
खाल्याळ पत्रन, खेळती, विखरती, हाडवी कागदी टिकल्या
सचिवालयाच्या पारदर्शक भूमीवरती
वेडे इहलोकचे सज्जन—त्या लुकलुकणाऱ्या तारा म्हणती.

पानांत थोडेथोडें ओतले. आणि ती भिंतीला टेकून बसली. थोडा वेळ कुणी बोललें नाहीं. बाजूच्या घरांतील लोक फिरायला जाऊन परत आले असावेत, कारण रेडिओ सुरू झाला होता. त्याबरोबर आवाजसुद्धां ऐकूं आला, "बाबा, बाळाला न्हाणींत न्यायचं आहे." "आलों" लगेच कुणीतरी तत्परतेनें म्हणाले. शकी खिस्सदिशीं हंसली, व वारणाईलाही गंमत वाटली. "त्यांच सगळंच अरिष्ट काम," ती म्हणाली.

बाजूच्या घरांत आपटे नांवाचा वजन मापें तपासणारा इन्स्पेक्टर रहात होता. नवराबायको, दोघेहि अगदीं त्याच उंचीचे, तसेंच लठ्ठ. ही दोघे नसून घरांत आल्यावर पातळ नेसणारी, बाहेर जातांना पँट घालणारी एकच व्यक्ती आहे असें शेजाऱ्यापाजाऱ्याच्या मोलकरणी खिदळत एकमेकीला सांगत. पण बहुधा तें तसें नसावे. कारण घरांत दीडदोन वर्षांचा मुलगा होता. त्याचे खाणेंपिणें, कपडे घालणें झोपणें या साऱ्याची पांचपांच मिनिटांनीं सगळ्या बिऱ्हाडांना वर्दी मिळे. आणि तीं सारी कामें बाबाला करावी लागत. "अहो बाबा, बाळाला आंघोळ घालायची आहे!" स्वयंपाकघरांतून लठ्ठ थुलथुलीत, लाडिक हांक यायची. मग हातांतील वर्तमानपत्र सिगरेट तशीच टाकून बाबा धांवत स्वयंपाकघराकडे येई. "पण बाबा, बाळाचा टॉवेल सोप्यालाच राहिला." पुन्हां सोप्यापर्यंय धांवपळ. "आणि तो बेबी सोप? माडीवरून नाहींच का आणला?" जिन्यावर धडपड, धाडधाड आवाज व मग न्हाणीघरांत हजरी. फार सुखी कुटुंब होते ते! त्या घरांत भांडणें झालेली कधीं कुणी ऐकली




नव्हती. बाई गोल नेसून शेपटा सोडणारी, व पुस्तक समोर ठेवून वजन मापानें स्वयंपाक करणारी. एकदां तिनें थालीपीठ करायचें ठरवलें. पीठ मळून पातेल्याला लावावें असें बिचाऱ्या पुस्तकानें सांगितले. मग बाबानें डब्यांतून पीठ काढून मापून दिले, पातेलें विसळले, कांदे चिरले, स्टोव्ह पेटवला, स्पिरीटची बाटली कपाटांत ठेवली, थालीपीठ झाल्यावर काढण्यासाठीं उलथनें सज्ज ठेवलें व 'बशा मांड' शब्दांची वाट पहात तो बसला. पण तो प्रसंग कांहीं आला नाहीं व त्याचें बशा विसळण्याचें काम वांचले. बाई कपबशांच्या बाबतींत अत्यंत काळजीपूर्वक वागत असे. चांगल्या बशा मोलकरणींकडे दिल्या कीं त्यांचा चक्काचूर व्हायचाच, त्यामुळें त्या घरींच धुण्याबाबत तिचा कटाक्ष होता. बाईनें स्टोव्हवर पातेलें पालथें घातलें व वर त्याच्या बूडावर सारें पीठ गिलाव्याप्रमाणें थापलें. मोलकरणीनें नंतर तें खरवडून काढतांना पुस्तकांत सांगितल्याप्रमाणें उलथनें न वापरतां खापरीच्या तुकड्यावरच काम भागवले.

ती मंडळी घरीं आली, व लगेच रेडिओ सुरू झालाच. "या अलाला दिलहि गया," असलें कसलेतरी हुच्च गाणें सुरूं झाले. शकीनें लगेच त्यावर ताल धरला. जेवण झाल्यावर तर ती तेंच गाणे मोठमोठ्यानें गुणगुणूं लागली. दुर्गीनें वचावचा एक चूर भाकरी संपवली व ती उठली. कृष्णा भुकेनें वखवखला होता त्यानें पटकन तिची भाकरी उचलली, व एका सुरळीनें तोंडांत कोंबली. दाजी प्रथम आपल्या ताटलीकडे पहातच राहिला. तीच भाकरी, तेंच लालसर पाणी पाहून त्याच्या पोटांत उमळून आले. त्या जून वांग्याच्या वियांची तुरट चव त्याच्या जीभेंत कायमची रुतून बसली होती. मऊमऊ ऊन भात असावा, त्यावर तूप, बरोबर लिंबाचे लोणचे आणि वर कांकडीच्या फोडी तरंगत असलेली, खूप जिरें घातलेली कढी. हें त्याला हवे होते. त्यानें अर्धी भाकरी कशीबशी खाल्ली, व वर पाणी ढोसून तो उठला.

वारणाईला आज कांहीं नको होते. आतांच तिची छाती भरून आल्यासारखे तिला वाटूं लागले होते. रात्र झाली कीं पोटांतून दडपत वरवर येत असे. आणि त्यांतून श्वास ओढून घेतांना तिच्या बरगड्या तळमळत. तिनें ताटल्या रचून कोंपऱ्यांत ठेवल्या. पचापचा पाणी मारून चुलीतील निखाऱ्याचा तुकडा न तुकडा विझवला. ती तेथेंच झोंपत असे, आणि तिचें अंथरुण चुलीपर्यंत येत असे. एकदां चुकून निखारा राहिला व चटई अर्धी जळून गेली. तेव्हांपासून राख डिवचून डिवचून कुठें लाल कण दिसतो कीं काय हें पहाणें तिचें त्या दिवसाचें शेवटचें महत्त्वाचें काम होऊन बसले होते.

आतां सगळ्यांनीं बाजल्यावरील कपड्याच्या ढीगाजवळ गर्दी केली. दाजीनें जाजम व चादर उचलली व तो बाहेर कट्ट्यावर आला. त्यानें जाजमानेंच कट्टा झटकला, व तेथें तो आंग आंखडून पडला. हजार ठिकाणीं त्याला ठणक्याच्या वेदना होत होत्या. आंगाचे कांहीं भाग काढून टाकून द्यावे असें त्याला त्यांचे ओझें वाटूं लागले. खालची जमीन तर ओल्या गोणपाटासारखी होती. त्यानें आंग अगदीं आंखडून घेऊन डोक्यावरून चादर ओढून घेतली. थोड्या वेळानें त्याला ग्लानी आली. ठिकठिकाणीं ठसल्यानें चमकणारी वेदना अस्पष्ट झाली, व तो चाऱ्याच्या गजबजाटानांत हरवला.

वारणाईनें निर्जीव हातानें एक गोणपाट अंथरलें. तिनें उशाला जुन्या कापडाचे एक मोठें गांठोडे घेतले. पालथी पडूनच ती जवळ जवळ त्याला टेकूनच बसली. छातीवर थोडा दाब पडल्यानें तिला थोडें बरें वाटलें. आतां या जागेवरून थोडेदेखील हालूं नये असें तिला वाटलें. परंतु अद्याप लांबलचक, काळी रात्र समोर ढकलायची आहे, आणि आंतडीं तोडणारी खसखस हळूहळू जास्त चिवट होत आहे.

"शके, दिवा घालव ग झोंपतांना," घोगऱ्या आवाजांत ती म्हणाली.

कृष्णानें आपलें जाजम उचलले, तों ते त्याच्या हाताला ओलसर लागले "आई, माझ्या अंथरुणावर गळलंय. मग कशावर झोंपू मी ?" तो ओरडला. "घे कीं रे दुसरे कांहींतरी. मी तर काय सांगणार माझी हाडं अंथर म्हणून ?" अगदीं त्रस्त होऊन वारणाई म्हणाली, "माझी चादर घे ही, आणि पड आतां." कृष्णानें तिच्या बाजूची चादर घेतली, पण तो उगाचच चुळबुळत राहिला. वारणाई आडवी झाल्यावर तो फळीजवळ गेला, व त्यानें पत्र्याचा डबा उघडून पाहिला. खरेंच चुरमुरे संपले होते, व खालीं फक्त तिखडाची पूड उरली होती. त्यानें डबा आदळला, व चादर अस्ताव्यस्त पसरून तो कुशीवर पडला. दुर्गी नेहमीं दरवाजाजवळ झोपत असे. तेथें दोन फळ्या टाकून त्यावर चटई टाकली कीं त्यावर चांगले झोंपतां येत असे. ती आपली चटई, व पांघरण्यासाठीं एक जुनेरे घेऊन दरवाजाकडे चालली, तोंच शकीनें तिला थांबवले.

"दुर्गी; तुला ताप येतोय, तूं झोंपू नकोस दाराजवळ," ती प्रेमळपणें म्हणाली मी झोपते इथं आजपासून" दुर्गी चमकली व संशयानें तिनें शकीकडे पाहिले, तोवर शकीनें फळ्या टाकल्या, दुर्गीच्या हातांतील चटई घेऊन त्यावर पसरली, आणि त्यावर बसली.

हातांत जुनेरे घेऊन असहायपणें दुर्गी तशीच पहात राहिली. ती एकदम अस्वस्थ झाली. ती शकीजवळ आली आणि म्हणाली. "मला तापबीप कांहीं येत नाहीं. मी माझ्या जागेवर झोंपणार" जणूं जीवनमरणाचा प्रश्न त्यावर अवलंबून असल्याप्रमाणें पाय आपटत ती हट्टानें म्हणाली.

"पण इथंच काय आहे एवढं. तूं झोंप कीं बाजल्यावर." तिच्याकडे पहात निश्चयानें शकी म्हणाली. फार असहाय वाटल्यामुळें तर दुर्गीचा संताप वाढला. शकीच्या भरदार चेहऱ्यावर चांगली बोटें उमटतील असा प्रहार करावा असें तिला वाटलें. परंतु तिचे दुबळे हात तसेच शिवशिवत राहिलें पुन्हां कानशिलें तडतडूं लागली. सारा रचलेला बेत एकदम उधळल्यामुळें ती घाबरली व काय करावें हें तिला समजेना.

"असं काय करतेस शेकून्, " ती अगदीं अजीजीनें म्हणाली "दर बाबतींत कसला ग तुझा हट्ट! ऊठ, मला झोंपू दे माझ्या जागेवर !".

शकीनें उशी व्यवस्थित केली, व ती पसरली देखील." जा ग आतां झोंप जा. रात्र झालेय." ती जांभई देत म्हणाली, व कुशीवर वळली.










•संतापाचे अश्रू आवरत, पाय आपटत दुर्गी बाजल्याजवळ आली. व तिनें दण्दिशीं आंग टाकले. तोंडाखालीं जुनेऱ्याचा गोळा ठेवून ती हुंदके देऊं लागली.

" शके, दिवा काढलास कां ? " वारणाईनें पालथे पडूनच विचारले, तिला कुणी उत्तर दिलें नाहीं. कृष्णा हलकेंच कुशीवर वळला. खोकत वारणाई उठली, कृष्णाच्या पायाला ठेंचाळून पुढें गेली, आणि शकीच्या उशाजवळ खांबाला असलेला दिवा तिनें घालवला. व पुन्हां येऊन ती गांठोड्याला टेकून बसली.

आतां तेथें सारे शांत झाले. थोड्या वेळानें दुर्गीचा उमाळा ओसरला व उष्ण कोरड्या डोळ्यांनीं आढ्याकडे पहात पडून राहिली. कृष्णाच्या पोटांत अजून भूक मांजराप्रमाणें हिंडत होती. त्यानें पाठीवर झोंपण्याचा प्रयत्न केला तो साधत नाहीं म्हणून तो डाव्या कुशीवर वळला. पण भूक कांहीं केल्या आवरेना. वारणाईनें उपवासाचे दाणे कुठल्या तरी डब्यांत ठेवले होते. व सारे डबे बाजल्याखालीं होते. त्यानें अंधारांतच हात पुढें केला, तों एक लहान डबा धक्क्यानें कोसळला व त्याचा खडखडाट एकदम फार मोठा वाटला. त्यानें पटकन् हात मागें घेतला, व तो आंग चोरून पडला.

" सुरूं झाले जळ्ळे उंदीर, " वारणाई स्वतःशींच मोठ्यानें म्हणाली.

तिचा डोळा थोडा लागू लागला, तों कृष्णाला तहान लागली. पाणी वारणाई झोंपली होती त्या कोंपऱ्यांत होते. कृष्णानें भांडे बुडवून घटांघटां आवाज केला व परततांना तो वारणाईला ठेंचाळला.

" कारटं तरी ! " विव्हळत वारणाई म्हणाली.



शेजारच्या रेडिओचे ओघळ अद्याप वहात होते. दूर तालमीमध्यें सोंगट्या खेळणाऱ्यांचे ओरडणें मधूनच ऐकूं येत होते. पण अंधारांत एकेक आवाज बुडूं लागले. सगळ्यावर झोंपेची झांपड येऊं लागली. तोंच एकदम धडाल्कन् आवाज झाला, व वारणाई दचकून उठून बसली. कुणीतरी पत्र्यावर दगड मारला होता. मागल्या गल्लींतील आचरट कारटीं दररोज हा खेळ करत. त्या आवाजाबरोबर दोनचार कुत्रीं वचांवचां ओरडूं लागली, आणि रात्र फाटल्यासारखी झाली. पण सुदैवानें आज चारपांच दगडावरच भागले, व कुत्रीहि कंटाळून गप्प झाली. पण वारणाईची झोंप मात्र थोडा वेळ पूर्ण उडाली. मग्रांची ती सुखकारक जागा शोधत ती गांठोड्यावर सरकूं लागली, व मध्यें मध्यें पाठ दाबूं लागली.

त्या आवाजानें बाहेर दाजी उठून बसला. जागा झाल्यावर त्याला थंडीची शिरशिरी एकदम जाणवली, व साऱ्या आंगावरून चाकूचे पाते हलकेंच सरकल्याप्रमाणें तो थरथरला. त्यानें उशाला ठेवलेले शर्ट आंगांत घातले, व विडी पेटवण्याचा प्रयत्न केला पण चांफा समोर राक्षसाप्रमाणें उभा राहून आपल्या पानांनीं काडीवर फुंकर टाकत होता. दाजीनें तोंडावरून चादर घेतली व आंत काडी ओढून विडी पेटवली. कुसकरल्यासारखा वेडावांकडा बसून तो झुरके घेऊं लागला.

रेडिओ अद्याप चालू होता. स्टेशनचे कार्यक्रम बंद होईपर्यंत तो चालूच असे. पण संवयीनें दाजीला त्यांतहि झोंप येत असे. पण आतां डाव्या बाजूची वेदना साऱ्या शरीरभर पसरली होती. हें सारें आकारहीन दुःख कुठें अडवावें, कुठें त्याला थांबवावें हें त्याला समजेना. त्यानें उसें बदलले, व विरुद्ध दिशेला डोकें करून तो झोंपला. गाण्याच्या कडा असलेल्या वाऱ्याच्या लाटा त्याला बडवत राहिल्या, आणि त्याला अस्वस्थ झोंप लागली.

दुर्गी त्या चांफ्याच्या अखंड सळसळण्याकडे कान देऊन पडली होती. त्याच्या फांद्या अतृप्त तळमळत असल्याप्रमाणें सारख्या हलत होत्या आणि सारखा कोरडा पाऊस पडत असल्याप्रमाणें पानांचा आवाज होत होता त्यांच्या आवाजामुळें तिचें मन जडावले व डोळे अर्धवट मिटूं लागलें.

मग्रां तिला वाटलें त्याप्रमाणें ती हळूच लक्ष्मणकडे गेली. नुसताच गंजीफ्राक घालून तो खोलींत बसला होता. ती आंत गेली, व एकदम त्याच्या गळ्यांत हात घालून रडूं लागली. " आतां कसं रे व्हायचं माझें ? " ती अस्पष्टपणें म्हणाली. त्यानें हळूवारपणें तिच्या केसावरून हात फिरवला. " दुर्गी तूं वेडी आहेस कीं काय ? " तो म्हणाला " मी असतांना तूं घाबरतेस ? मी तुला फसविण्यासाठीं कां हें सारं केले ? अग, मी मध्यंतरी पंधरा दिवस गांवाला गेलो होतो म्हणून भेटलो नाहीं. मी काय इतका वाईट, खाटीक आहे ! " त्यानें तिच्या डोळ्यांत पाहिले व तिचा हात आपल्या हातांत घेतला. " पाहिलंस ? काळजीनें तूं अगदीं वाळल्या भेंडीसारखी झाली आहेस. आतां डोळे पूस आणि हांस बघूं ! "

दुर्गी ओल्या डोळ्यांनीं हंसली व त्याला जास्तच बिलगली. तसं नव्हे रे. तूं वाईट नाहींस. आहेस म्हटलं मी केव्हांतरी ? " ती गहिंवरून म्हणाली " पण मला फार भीति व [illegible] आपण ल[illegible] करून मोकळे होऊं. "



अनुक्रमणिका

" म्हणजे बाईला स्वतंत्र घर, दार मिळेल, होय कीं नाहीं ? आणि सहासात महिन्यांत हेंहि झालं कीं काय, मग मी कुठल्या झाडाचा पाला ! आईमूल एकीकडे व आम्ही एकीकडे ! " तो हंसला. ती देखील पूर्ण समाधानानें हंसली. नेमकें याचसाठीं तिला स्वतःचा संसार हवा होता.

तृप्तीची पंधरा मिनिटें. सुख तोडतां तुटत नाहीं. पण ती प्रयत्नानें निघाली. " पण केव्हां ? " तिनें हलकेंच विचारले.

" अग तूं ठरव दिवस आईला विचारून. आतांच करूंया कां त्या चांपयाखालीं ? " त्यानें हंसून विचारले, व ती तरंगत परत आली. तिनें हळूच दरवाजा उघडला व आंत येऊन झोंपली...

दुर्गीचे डोळे खाडकन् उघडले. ती बाजल्यावरच तळमळत होती. लक्ष्मणला भेटल्यावर सारें अगदीं यासारखें व्हावे असें तिला वाटले. पण होईल कां ? होईल कां ? तिला तगमग असह्य होऊं लागली. तिने कान देऊन ऐकले. वारणाईचा श्वासोच्छ्वास जाळींतून वारें निसटल्याप्रमाणें होत होता, पण ती झोपली होती. कृष्णा अद्याप चुळबुळत होता. शेजारच्या घरांतील रेडिओ बंद झाला होता, पण त्या मंडळींची हालचाल सुरू होती.

" बाबा, बाळाला झोंपवायचं आहे माडीवर नेऊन, " तो लाडिक आवाज आला.

" आलों, " मागून नम्र उत्तर, व त्या मागोमाग पावलांचा आवाज स्वयंपाकघरापर्यंत आला.

" खीर खीर ,म्हणून बाळानें हट्ट धरला, म्हणून केली कपभर-पण त्यानें बोट देखील लावले नाहीं. शिवाय ही बटाट्याची भाजीसुद्धां उरली. काय करायच आतां ? " बाई म्हणाली. बाबोला विचार पडला असावा कारण तो लगेच बोलला नाहीं.

" आतां असं कर, " तो म्हणाला, " भाजी एका चपातींत गुंडाळून ठेव. व सकाळीं खीर चपाती देऊन टाक शेजारीं. " त्यानें मुलाला उचललें असावें कारण तें एकदम रडूं लागले.

त्या आवाजानें वारणाई जागी झाली व शरमली. तिला एकदम वाटले दाजीनं ते शब्द ऐकले नाहींत ना ? शेजारचें अन्न त्याला न कळत येत असे व मुलांतच वाटले जात असे. तिनें काळजीपूर्वक ऐकले. दाजी झोंपला होता. तिला त्यांतल्या त्यांत समाधान वाटलें व ती पुन्हां झोंपली.

कृष्णा मात्र एकदम खुलला. दडपून ठेवलेली भूक एकदम जागी झाली आणि ती रागेंत मांडून ठेवलेल्या चपात्या व खिरीची भांडी यावर खुशाल चरूं लागली. हें सारें सकाळीं देण्याऐवजीं आत्तांच का देत नाहींत ? मी स्वतः जाऊन आणतो हवं तर ! तो अर्धवट उठलाहि. पण शेजारच्या घरांतील दिवे एकेक जात असल्याचा बटनाचा आवाज आला, दरवाजे बंद होऊं लागले व अखेर जिन्या-वर पावलें वाजली. इतका वेळ रेडिओ असल्यामुळें कंपित होत असलेलें घर गोठल्याप्रमाणें शांत झाले. कृष्णानें अखेर निराशेनें चादर तोंडावरून घेतली, पण तेथें फाटलेल्या जागेंतून नाक बाहेर ठेवून तो उजाडण्याची वाट पाहूं लागला. ती खीर शेवयाची होती.

तिचा रंग केशरी होता, व मधूनमधून वेदाणे येत. आणि बाईला वाटलें त्याप्रमाणें ती खीर कपभर नव्हती, चांगली पातेलेंभर होती; मोठें पातेलेभर! मग ती शकीनें घेतली नाहीं, दुर्गीनें नको म्हटले आणि आईचा तर उपवासच होता. केशरी दाट खीर...

आतां कुठेंतरी कुरकुर आवाज सुरूं झाला. सारें शांत झाल्यावर घुशीनें आपलें काम सुरूं केले होते. आवाज कुठून येत होता कुणास ठाऊक, पण तो साऱ्या घरांत पसरल्यासारखा वाटत होता. वारणाईचा खोकला सुरूं झाला कीं तो पांच पांच मिनिटें टिके. अयो, अयो म्हणत ती चेहरा इकडे तिकडे टेके, व थोडा वेळ धांपा टाके. त्या अवधींत तटकन् दोरा तोडल्याप्रमाणें तो कुरकर आवाज थांबत होता. त्या आवाजानें आपलें मन सारखे कुरतडत आहे असें दुर्गीला वाटूं लागले. ती हलकेंच उठली, व पुढच्या दाराजवळ आली. दुसऱ्या दाराकडून पलीकडे जायला वाट होती, पण आतां तेथें शकी आहे. जर का तिला पाय लागला... पुढच्या बाजूला विहीरीजवळ भिंत कोसळली होती तेथून तिनें जायचें ठरवलें. तिनें हळूच दाजीकडे पाहिलें, कांकणें वर चढवली, व ती पलीकडे उतरली. भिंतीवरून मातीचा एक ढिकला घसरला व दुर्गी वितळल्यासारखी झाली. ती झपाझपां पावलें टाकत लक्ष्मणच्या खोलीजवळ आली. आंत दिव्यावर दरवाजाच्या बाजूनें काळा कागद लावला होता. आणि आंत कुणीतरी हलक्या आवाजांत बोलत होते. मध्येंच कुणीतरी हंसले, आणि दुर्गीचें आयुष्य फाटून गेले. तिनें फटींतून पाहिले, व तिचें आंग बधिर झाले. अद्याप तिचा विश्वास बसेना, पण दुसऱ्यांदा हसण्यानें तिची खात्री झाली. तो शकीच होती, व लक्ष्मणला बिलगून बसली होती. अर्धवट झोंपेंत असल्याप्रमाणें दुर्गी परतली. तिला वाटूं लागले. मघाप्रमाणें आपले झोंप उडणार, डोळे उघडणार. मग आपण बाजल्यावरच आहों हें पाहून आपले मन ओझ्याखालून निसटेल. पण तसें कांहीं झाले नाहीं. येतांना ती विहीरीजवळ क्षणभर रेंगाळली. आंधळ्या डोळ्याच्या खोबणीप्रमाणें ती विहीर दिसली. पण तिचा ओलावा अंधारांत झांकला होता. आई, तूं म्हटलस ना कीं तूं जिवंत असेपर्यंत मला विहीरीकडे पाठवणार नाहींस म्हणून! मग आतां मला पदराखालीं घाल. आतां मला आयुष्य नाहीं. तीं आंत आली, व तिनें मुद्दाम पाहिलें. शकीचें अंथरुण रिकामे होते.

दुर्गी अंथरुणावर पडली. एकदम मर्मस्थलीं प्रहार झाल्याप्रमाणें ती बधिर, असहाय होऊन गेली. कुरकुर, ओरबडण्याचा पोखरण्याचा आवाज जास्त स्पष्ट होऊं लागला. वारणाईला दहा मिनिटाची उसंत मिळेना व खोकून खोकून बरगड्या बाहेर फेकल्या जातात कीं काय असा त्यांच्यावर ताण पडूं लागला. ही रात्र केव्हां संपेल असें तिला होऊन गेले.

"दुर्गी, उजाडलं काय ग?" धांपा टाकतच तिनें विचारलें. दुर्गीच्या कानावर ते शब्द चिंध्याप्रमाणें पडले. पण एक शब्द उच्चारायचा म्हणजे ओझें ढकलल्यासारखे असें तिला वाटलें व ती गप्प राहिली. कशाला उजाडायला हवें! रात्र अशीच लांब, कधीं न संपणारी, आपला चेहरा इतरांना न दाखवणारी, रहावी. ती मनांतल्या मनांत म्हणाली. कृष्णाचीहि झोंप चाळवल्यासारखी झाली. तो डोळे चोळत उठून बसला "उजाडलं, आई?" त्यानें विचारलें परंतु वारणाई पुन्हां गुदमरून टाकणाऱ्या जाळ्यांत अडकली होती. चिमूटभर श्वास संथपणें घ्यावा यासाठीं धडपडत होती. कृष्णानें इकडेतिकडे पाहिले व कांहींतरी पुटपुटत तो पुन्हां झोंपला.

शकी केव्हां आली कुणास ठाऊक, पण ती शांत झोंपली होती. सारे शरीर उष्ण उबदार झाल्याप्रमाणें सुखावली होती. तिथें पांघरूण पायांजवळ तसेंच गोळा होऊन पडले होते. तें पांघरूण दाजीला चालले असते. थंडीनें त्याचे आंग थरथरत होतें. खालच्या जमिनीला हजार टेंगळे आहेत, आणि तीं नेमकी दुसऱ्या भागांना डिवचत आहेत असें त्याला वाटत होते. त्यानें आंतील शब्द अस्पष्ट ऐकलें. तोंडावरून पांघरूण काढून त्यानें समोरील छपरावर पाहिलें. पण तेथें गडद अंधार होता. त्याला त्यांतल्या त्यांत समाधान वाटलें. निदान येथें पडतां तर येते. उजाडलें कीं पुन्हां खांद्यावर भारे, ते उचलतांना दाभणासारख्या रेघा जळत आंत चमकणार आणि डोळ्यांत पाणी येईपर्यंत खोलखोल जाणार. इतक्यांत नको उजाडायला!

घुशीचें कुरकुरणे आतां अखंडपणें चालू झाले. वारणाईचें खोकणें हें सतत चालायचेंच हें तिनें सुद्धां ओळखले. समोरील घराच्या छपरावरून मंजूचे अधीर, कर्कश ओरडणें सुरू झाले. सारी रात्र आपल्या अणकुचीदार नखांनीं फाडून चिंध्या करत असल्याप्रमाणें ती ओरडत होती, व त्यामुळें दुर्गीच्या मनावर ओरबडल्यासारखे होत होते.

पहांट व्हावी, पहाट होऊं नये या तालांत रात्र आपल्याच गतीनें सरकत होती. मंजूला पहाटेची उत्सुकता नव्हती. सारी रात्र तरी एक विशाल काळें मांजर असते, तरी ती त्याच्याशीं खेळली असती, त्याला तिनें झुलवलें असते, व क्रूर आनंदानें ती ओरडत राहिली असती. घूशीला रात्र हवी होती. गुलबासाची फुलें मात्र डोळे उघडण्यासाठीं प्रकाशाची वाट पहात हिरव्या पानांत थरथरत होती. पहाट व्हावी, पहाट होऊं नयें. कुरकूर, खोकल्याचा आवाज, कर्कश ओरडणें, संवेदना बधिर झालेले कोरडे, जळणारे डोळे, लाल सुईसारख्या वेदना, आणि उफाड्याचें, शांतपणें झोपी गेलेले रसरशीत तृप्त मांस. पहांट व्हावी, पहांट होऊं नये...

पहांट झाली काय न झाली काय, याची परवा नव्हती फक्त दोघांना. सतत हलणारा चांफा, आणि त्या खालीं सांचलेले, कधीच न हलणारे हिरवट काळे पाणी. पहांट काय, रात्र काय, न शमणारी अखंड अस्वस्थता, कधींच न जळणारी चिरंतन मृतकळा. आणि पहांट?

दूर कुठेंतरी, ही जर्जर असहाय भुकेली म्हातारी रात्र जाण्याची वाट पहात ती सज्ज होऊन राहिली होती. तिला येण्याची घांई नाहीं, परंतु मागें रेंगाळत रहाण्याचीहि तिची तयारी नाहीं.

आणि हवी असो अगर नसो, पहांट ही होणारच.

अनुक्रमणिका








# माफ करा हं, कांहींतरी गैरसमज होतोय

गैरसमज ही आमच्या दैनंदिन जीवनांतील अटळ घटना आहे कीं काय नकळे ! या गैरसमजामुळें केव्हां केव्हां गोड घोटाळे, नाट्यमय प्रसंग आणि गमतीदार घटना उद्‌भवतात, तर केव्हां कांहीं तापदायक असे अनर्थ निर्माण होतात.

पण सामान्य माणसांच्या जीवनांत वैयक्तिकरीत्या गैरसमज घालवणं किंवा दूर करणं सुलभ असतं. पण मोठ्या माणसांच्या जीवनांत असे गैरसमज सदैव पसरत असतात, त्यांतील कांहीं कालांतरानें विलीन होतात तर कांहीं शेवटपर्यंत कायम राहातात. तात्कालिक महत्त्वाच्या घटनांबाबत पत्रक काढण्याची प्रथा असली तरी व्यक्तिगत गैरसमजुतींबाबत खुलासा करावयाची सवडहि मिळत नाहीं आणि जरुरीहि भासत नाहीं.

त्यामुळें यंदा दीपावलीतर्फे महाराष्ट्रांतील तमाम बड्या लोकांना आवाहन करण्यांत आलें कीं आपल्याबाबत जे कांहीं खरेखोटे गैरसमज आहेत त्याबाबत दीपावलीच्या व्यासपीठावर येऊन त्यांचें निराकरण करा. राजकारण, समाजकारण, नाट्य, संगीत, शिक्षण, वृत्तपत्रीय जीवन इत्यादि विविध आघाडींवर चमकणाऱ्या अनेक श्रेष्ठींना या अभिनव परिसंवादांत भाग घेण्याची विनंति केली. त्यांतील कांहींनीं "आधीं आहेतच त्यांत आणखी हें लिहून भर कशाला" तर कांहींनीं—झाला गैरसमज तर झाला—मला काय त्याचें—इत्यादि सोयीस्कर सबबी सांगून सौम्य नकार दिला. मात्र कांहीं जणानीं तत्परतेने, तर कांहीं जणानीं आमच्या सततच्या आग्रहाला आणि तगाद्याला बळी पडून लेख पाठविले. त्यांच्या परिश्रमांबद्दल मनःपूर्वक आभार.

न. वि. गाडगीळ • डॉ. खरे • न. र. फाटक • बालगंधर्व • बाबुराव पटेल • स्नेहप्रभा प्रधान

मोतिरामशेठ टोपीवाले • प्रबोधनकार ठाकरे • दत्तु बांदेकर • पॉली उमरीगर •

• वसंत लाडोबा म्हापणकर • आणि किणीकर









अनुक्रमणिका



# स्पष्टवक्तेपणा नडला

— न. वि. गाडगीळ

—महाराष्ट्राच्या गेल्या अडीच तपांतील राजकारणांतील एक प्रभावी व्यक्ति. काकासाहेबांनीं पुढारीपणाचे सर्व सोहळे उपभोगले, अखेर मध्यवर्ति मंत्रिमंडळांत मंत्रिपद भूषविलें. पण काकांची महाराष्ट्रनिष्ठा तशीच ज्वलंत राहिली. फर्डे वक्ते, मनमोकळे, गप्पिष्ट आणि एक दर्जेदार लेखक ही काकांची वेगळींच वैशिष्ट्यें !

---

सर्व धर्मांचा उपदेश, वाणीवर संयम असावा व व्यक्ति जें बोलेल त्यायोगें दुसऱ्याच्या भ वना दुखावल्या जाऊं नयेत, असा आहे. अर्थात् हा उपदेश सामान्यपणें बरोबर असला तरी धकाधकीच्या राजकारणांत आणि सार्वजनिक जीवनांत पुष्कळवेळां अपवादात्मक प्रसंग निर्माण होतात आणि अशा पेंचप्रसंगाच्या वेळीं अप्रिय पण अंतिम पथ्यकारक असें बोलण्याची गरज असते आणि नेहमीं त्यामुळेंच गैरसमज निर्माण होतात आणि वाढतात. सामान्य व्यक्तींच्या जीवनांतील असे प्रसंग केव्हांच विसरले जातात, पण ज्या व्यक्ति सामाजिक कार्यक्षेत्रांत अगर राजकारणाच्या रंगमंचावर येतात त्यांना मात्र या अशा अप्रिय सत्याच्या उच्चारामुळें सहन करावा लागणारा टीकेचा प्रवाह पुनःपुन्हां राजापुरी गंगेप्रमाणें वाहूं लागतो . हे गैरसमजाचे ढग लवकर वितळत नाहींत–मनुष्याच्या कर्तृत्वावर त्याचा परिणाम होतो, त्याचा कस उतरतो, धैर्य विचलित होतें–याला अपवाद फक्त जे मनस्वी आहेत, महान् आहेत त्यांचाच होय...

हे सर्व विचार सुचण्याचें कारण अलीकडे संयुक्त महाराष्ट्राच्या बाबतींत घडलेल्या घटना होत. अर्थात् याच्या अगोदरहि गैरसमज झाले नाहींत असें नाहीं. कारण पुण्यांतील नागरिक जन्मजात राजकारणी. फर्ग्युसन कॉलेजमध्यें शिकतांना तो पुढारीपणाची सीमा गांठतो व राजकारणांत पडल्यावर साडेतीन मुत्सद्यांत आपली गणना करतो. प्रत्येक विषयावर त्याचें असें मत असतें. या दृष्टीनें माझी पात्रता इतरांनीं कशीहि लेखली असली तरी माझें स्वतःचें असें स्वतंत्र मत होतें आणि आहे. पुण्यांत असूनसुद्धां सामान्यपणें मला विचार करून बोलण्याची संवय जडली आहे... परंतु जें बोललों तें कालांतरानें सत्य ठरल्याचा अनुभव आला आहे ! 'वाचम् अर्थोनु धावति' याचा प्रत्यय आलाय्. यांत सांक्षात्काराचा भाग नाहीं, पण मनुष्य सहज जरी बोलला तरी त्यामागें दीर्घ काळ प्रस्फुरण असलेली एक मानसिक प्रक्रिया असते

## केळकरांशीं मतभेद

या संदर्भातील एक जुन्यांतला जुना ठळक प्रसंग आढळतो. १९२७ च्या दिवाळींत माझे एक मित्र धापा टाकीत आनंदानें नाचत आले आणि म्हणाले, तात्यासाहेबांनीं, तांबे हे मध्यप्रांताचे कार्यकारी सभासद नेमले म्हणून, अभिनंदनाची तार ठोकली आहे. मी तात्काळ म्हणालों, " He will rue the day–याबद्दल त्यांना पुढें निश्चित वाईट वाटेल. अर्थात् पुण्यांतील अनुभवाप्रमाणें हें वाक्य केळकरापर्यंत जाऊन पोंचलें. वर्तमानपत्रांतून टीका प्रतिटीका होऊं लागल्या. केळकरांनीं थोड्या दिवसांत आपल्या घरीं प्रमुख कार्यकर्त्यांना बोलावलें व प्रत्येकाला स्पष्ट मत सांगण्यास सांगितलें. उपस्थित ५० जणांपैकीं बहुतेक, ठीक केलेंत, असें म्हणणारे निघाले. दोघां–तिघांनीं तर भाटासारखी त्यांची स्तुति केली. मी मात्र एकटाच निराळा निघालों. मी म्हणालों, " तुम्ही तार धाडलीत ही मोठी चूक केली आहे. एक प्रयत्नाची दिशा निश्चित होत होती. तिच्यांत द्विजाभाव निर्माण केला आहे. तथापि आपली ही भूमिका निश्चित राहाणार असेल, तर विचार तरी करीन. पण मंगळवारच्या मंगळवारीं बदलणार असेल, तर प्रश्नच नाहीं." बैठक संपली तेव्हां सर्वांनीं एकाद्या अपराध्याकडे पाहावें, तसें तुच्छतेनें माझ्याकडे पाहिलें. गैरसमज किती झाला, याचा अनुभव त्या दिवसापासून पुढें कित्येक वर्षें पुण्यांतील विशिष्ट पक्षानें तीव्रतेनें पक्षातीत राजकारणांतसुद्धां जो विरोध केला, त्यांत प्रतीत झाला. पण तात्यासाहेबांना त्यांचें कृत्य कसें वाटलें, याचा पुरावा 'गतगोष्टीं'त आहे. मी ज्यावेळीं बोललों, त्यावेळची भावना प्रसंगाचें महत्त्व जाणून स्पष्ट सांगणें हीच होती.

## वल्लभभाईंचा गैरसमज

वृथा गैरसमजाचा हा एक आणखी अनुभव १९३४ अखेर मध्यवर्ति कायदे मंडळांत मी निवडून आलों. १९३५ च्या जानेवारींत पहिलें अधिवेशन सुरू झालें होतें. जॉईंट पार्लमेंटरी रिपोर्टावर ६ फेब्रुवारी १९३५ ला चर्चा सुरू झाली. कॉंग्रेस पक्षाचा मी प्रतोद होतों. पहिल्या दिवशीं कॉंग्रेस पक्षातर्फें चार भाषणें व्हायचीं होतीं. पहिलें भाषण आमचे नेते श्री. भुलाभाई देसाई यांचें झालें. त्यांचें वक्तृत्व अतिशय आर्जवी, लाघवी आणि मनमोहक. पण स्वातंत्र्य हें देणगी म्हणून मागितलें जात आहे असा त्यांचा भाषणाचा भावार्थ आणि त्याच अनुरोधाने इतरांनीं आपले विचार मांडले. शेवटचा वक्ता मी. मी आपल्या भाषणांत म्हणालों कीं माझ्या नेत्याच्या दृष्टिकोनाशीं मी समरस होऊं शकत नाहीं. माझें सर्व भाषण प्रखर विशेषणांनीं, तीव्र भावनांनीं, प्रक्षोभक असें झालें. प्रेक्षकांच्या गॅलरींत सरोजिनी नायडू, राजाजी, वल्लभभाई आदि मंडळी होती. भाषण संपतांच जीना वगैरेंनीं तसेंच वर्किंग कमिटीच्या सभासदांनीं अभिनंदन केलें. फक्त वल्लभभाईंनीं टीका केली कीं भुलाभाईबद्दल उल्लेख गाळला असता तर बरें झालें असतें. तें वाक्य उच्चारण्यापूर्वी कौन्सिल प्रवेश करतांनाच हेतुत आणि संतत विरोध करण्यासाठीं निवडून आलों असतां सह-





कार्याची भावना सुरू झाली होती म्हणून मी तें बोललों व पक्षामध्यें अनेक लोकांना आनंद वाटला व कठोर विरोधाची भावना दोन तीन वर्षें तरी राहिली. वल्लभभाईंचा गैरसमज झाला पण कालांतरानें तोहि दूर झाला. तो इतका कीं मंत्रिमंडळांत समाविष्ट करण्याबाबत माझ्याबाबत जास्तीत जास्त आग्रह त्यांनीं धरला. तथापि गैरसमजाच्या गढूळ वातावरणांतून मी अजिबात सुटलों असें नाहीं—

**आचार्य अत्र्यांचा गैरसमज**

बोलण्याच्या भरांत एखादें वाक्य चुकून निसटतें. १९३७ च्या रत्नागिरीच्या प्रांतिक कायदे कौन्सिलच्या प्रचारसभेतील माझ्या २॥ तासांच्या प्रभावी वक्तृत्वांत पुण्यांतील एका दैनिकाच्या संपादकाबाबत किंचित् असंसदीय नव्हे पण अभिरुचीला न शोभणारें वाक्य बोलून गेलों. समारोपाच्या भाषणांत अध्यक्ष आबासाहेब शेटे यांनीं या वाक्याबद्दल प्रतिकूलता व्यक्त करतांच मी तात्काळ उभा राहिलों आणि म्हणालों 'ते शब्द मी परत घेतले आहेत. जनतेनें आणि संबंधित व्यक्तीनें क्षमा करावी. 'माझ्या मनावरचा बोजा कमी झाला पण त्या व्यक्तीच्या मनांतील रुजलेला गैरसमज अजूनहि कायम आहे हें अनुभवास येत आहे.

पण १९४५ चा एक प्रसंग मोठा ठसठशीत आहे. १९४५ च्या नोव्हेंबरमध्यें मी आणि हिरे मध्यवर्ति निवडणुकीच्या दौऱ्यांत गांवोगांव हिंडत होतों. पुण्यांतील एका सभेंत श्री. बाबूराव अत्रे यांनीं कांहीं अभिरुचिशून्य आणि अश्लील अशा हिंदुस्तानाला चिडविणाऱ्या कोट्या केल्या. सभेंत मला प्रश्न विचारले जात होते. संयमपणें उत्तर देत होतों. निवडणूक जिंकल्यावर पुण्यांतील मंडईंत सत्काराची सभा ठरली होती. त्यांत अत्रे बोलणार हें जाहीर झालें होतें. पण मला त्याची दखल सभेच्या दिवशी सकाळीं मिळाली. अत्रे यांच्यावर राष्ट्रीय स्वयंसेवक मंडळी, बहुतेक शिकलेला समाज व कॉंग्रेसचे गांधीवादी कार्यकर्ते चिडले होते. अनेकांनीं ही सभा रद्द करा किंवा तुम्ही जाऊं नका, असें सांगितलें होतें. सहानुभूति असणाऱ्या पोलीस अधिकाऱ्यांनीहि जवळ जवळ तीच सूचना दिली होती. सभेच्या जागीं मी व हिरे पोहोंचलों तों अफाट जनसमुदाय उपस्थित होता. मंडईतील स्नातक लाठी बंद होते. पलीकडील चिंचेजवळील बटाट्याच्या गाळ्यांत राष्ट्रीय स्वयंसेवक शेंकडोंनी जमा झाले होते. एकंदर जनसागर अस्थिर दिसत होता व आंतील वडवानल केव्हां बाहेर पडेल याचा नेम नव्हता. तेवढ्यांत टांग्यांतून अत्रे आणि काका लिमये आले. मी काका लिमयांना परिस्थितीची थोडक्यांत कल्पना









दिली व अन्यांना म्हणालों कीं तुमचें भाषण व माझा सत्कार दोन्ही एकाच वेळीं होणार नाहीं. सत्कार केव्हांहि होईल पण आज डोकीं फुटणें इष्ट नाहीं. त्यावर अत्रे म्हणाले—"तुम्ही प्रांतिकचे अध्यक्ष अहांत तुम्ही सांगाल तें मला मान्य आहे." मी म्हणालों, "तुम्ही व काका माझ्या घरीं जा व १०–१५ मिनिटांतच मी सभा संपवून येतों. व त्याप्रमाणें ते गेले— त्यांच्या टांग्यामागें कित्येक लाठीवाले धावले पण स्वयंसेवकांनीं त्यांना आवरून धरलें. भाषणांत मी सांगितलें कीं अत्रे हे एक शिस्तप्रिय कॉंग्रेसजन आहेत. त्यांनीं माझें ऐकलें व ते परत गेले आहेत." सभा संपली व लोक शांतपणें परतले. कित्येकांनीं, व्हायलाच पाहिजे होती हो, असें बोलून दाखविलें. दोन दिवसांनीं तटणीस भेटले असतां त्यांनीं सांगितलें कीं "टेलिफोनवर कांहींतरी गरमागरम बातमी मिळेल म्हणून आम्ही वाट पहात होतों. आम्हाला पोलिसांकडून तशी कुणकुण लागली होती..." ही वस्तुस्थिति येथें दिली आहे. पण अन्यांनीं एवढा गैरसमज करून घेतला आहे कीं अजूनहि माझ्या बाबतींत विपर्यास करून विकृत शब्दांत विडंबन करण्याचा मोह त्यांना आवरत नाहीं. मीहि तें शांतपणें ऐकून घेत असतों व त्यांना एकदां लिहिलेल्या पत्रांतील शेर पुढें देत आहे.

रफीकोसे रफीद अच्छे जलनें में
वो नाम लेते है।
गुलोंसे खार अच्छे दामन को
पकड लेते है।

[ मित्रापेक्षां शत्रू चांगला. कारण द्वेषानें कां होईना पण सतत नांव घेत असतो. फुलांपेक्षा कांटे चांगले. कारण ते पदर तरी धरतात. ]

### पं. नेहरूंचा गैरसमज

१९५५ च्या १६ डिसेंबरला लोकसभेंत राज्यपुनर्रचना रिपोर्टवर मी तासभर भाषण केलें. भाषणाच्या अखेर लोकसभेंतील अनेक लोकांच्या डोळ्यांतून अश्रू आले असें केसरीच्या खास बातमीदारानें लिहिलें आहे. त्या भाषणांत मीं म्हणालों कीं तुम्ही मला विचारविनिमय करून जमवून घ्या असें सांगतां. ज्याला या रिपोर्टानें मिळालें आहे तो तें सोडणार नाहीं. तुम्ही ब्रिटिश नीतीचा अवलंब करूं नका. मक्डोनल अवार्डनंतर ब्रिटिश असाच उपदेश करीत होते व त्यावेळीं जें झालें तसेंच आज होईल. जनतेनें तो प्रश्न रस्त्यावर सोडविण्याचा प्रयत्न केला तसेंच आज होईल. हे शब्द उच्चारलेले लघुलेखकानें टिपून घेतले. त्या भाषणांत मी कांहींहि दुरुस्ती केली नाहीं व तें भाषण आजहि लोकसभेच्या कागदोपत्रीं आहे. तथापि महाराष्ट्रविरोधी व्यक्तींनीं कांही वर्तमानपत्रांना हातांत धरून विपर्यास करून गाडगीळ रस्त्यांत प्रश्न सोडवूं इच्छितात अशी बातमी देवविली. आणि मी भविष्य केल्याप्रमाणें घडून आलें आणि त्याची गुन्हेगारी माझ्यावर आहे असें सर्वत्र प्रतिपादिलें जाऊं लागलें. बातमींतील खोटेपणा १७ तारखेलाच संध्याकाळीं निवेदन प्रसिद्ध करून जाहीर केला. पण पं. नेहरूपासून तों फाटक्या तुटक्या राजकारणांतील धुळाक्षरें न जाणणाऱ्या वाचकापर्यंत हा गैरसमज मुद्दाम पसरविण्यांत आला होता. आणि अमृतसर कॉंग्रेसमध्यें मी भाषण करूं नये अशी विनंति हरिभाऊ पाटसकर, गोविंदराव देशपांडे आदि अनेक मराठी मित्रांनी केली. मी त्यांना सांगितलें कीं महाराष्ट्राची नालस्ती होत असतांना मी भ्याडच नव्हे तर पापीहि ठरेन. आणि अमृतसरच्या विषयनियामक कमिटींत भाषणांतील उतारा वाचून दाखविला, मुंबईतील अत्याचाराचा उल्लेख केला व पंडितजींनासुद्धां आपली चूक झाली असें सांगावें लागलें. अजूनहि जाणूनबुजून सदरहू भाषणांतील रस्त्याबद्दलचा उल्लेख विपर्यस्तपणें करण्यास अनेक मराठी वृत्तपत्रांना आनंद वाटतो. अमृतसरमध्यें मी म्हणालों कीं भूकंपाचें भविष्य करणाऱ्या भूगर्भशास्त्रज्ञावर झालेल्या भूकंपाची जबाबदारी टाकण्यासारखाच हा प्रकार झालाय— पण ज्यांनी गैरसमज पसरवायचे ते पसरवलेच !

**द्विभाषिकाला विरोध**—तरीपण गैरसमज !

५ ऑगस्ट १९५६ ची गोष्ट अनेक उपद्व्यापी लोकांनीं द्विभाषिक, मोठें द्विभाषिक व्हावें म्हणून लोकसभेंतील सभासदांच्या सह्या गोळा केल्या. आणि पंडितजींनीं प्रथम गुजराती सभासदांना बोलावून त्यांचें मत विचारलें. ते म्हणाले, हाय कमांडला जर हें योग्य वाटत असेल तर आमचा विरोध नाहीं. नंतर एक तासानें पार्लमेंट गृहांतील कॅबिनेट रूममध्यें नेहरूंनीं महाराष्ट्रीय सभासदांना बोलावलें. प्लेगची लागण होऊन ज्याप्रमाणें पटापट उंदीर मृत्यू पावतात त्याप्रमाणें एका मागून एक —'जें होत आहे तें उत्कृष्ट आहे—परमेश्वराचा त्यांत हात आहे' येथपर्यंत त्यांची पक्षनिष्ठा व नेतृत्वनिष्ठा गेली. पंडितजींनी मला विचारलें—"आपकी राय क्या है ?" मी त्यांना उत्तर दिलें कीं, "हा फॉर्म्युला मी सुचविला होता. शंकरराव देवांनीं तो तुमच्यासमोर मांडला होता. प्रयोग म्हणून आम्ही तो सुचविला होता. पण मला अप्रामाणिक म्हणून मेमदाबाद येथें भरलेल्या गुजरात प्रांतिक सभेनें तो धिक्कारला आणि आज तुम्ही तो स्वीकारत आहांत, शिफारस करीत आहांत त्यावेळीं हें शहाणपण कोठें गेलें होतें !"








पंडितजी मध्येंच म्हणाले, "गलती तो आदमी से होती है।" मी म्हणालों-"प्रदेशा-त्मात प्रदेश ठेवण्यानें एकीची भावना उत्पन्न होत नाहीं. राजकारण म्हणजे मानसशास्त्र आहे. लोक मानणार नाहींत. तुमची गाडी चुकली आहे." लागलीच दोन तासांनीं झालेल्या पक्षसभेंत तसेंच सांगितलें आणि म्हणालों-"पक्षाच्या लोकांना हें व्हावें असें वाटत असेल आणि नेतृत्व त्यांतील धोका पत्करावयास तयार असेल आणि पार्लमेंट हें सर्व स्वीकारणार असेल तर मला कांहीं म्हणा-वयाचें नाहीं. मी माझें विरुद्ध मत नोंदवतों." तसें मी नोंदवूं नये म्हणून अनेकांनीं अनेक तऱ्हेनें सांगितलें पण मी मानलें नाहीं-माझें विरुद्ध मत नोंदवलें. होणारा गैरसमज टळला नाहीं-ज्यांच्यासाठीं राजकीय भविष्यावर अग्नि ठेवला त्यांचाहि गैरसमज झाला ही दुर्दैवाची गोष्ट. पण सद्सद्विवेक बुद्धीचें ऋण विरुद्ध मत देऊन मी फेडलें. पक्षाचें ऋण शिस्तभंगाबद्दल जी शिक्षा मागाल ती घेण्याची सिद्धता दर्शवून फेडलें व देशाचें ऋण जो निर्णय झाला आहे तो मनदशीर व शांततेच्या मार्गानें फिरवून येईपर्यंत पांचामुखीं परमेश्वर या न्यायानें स्वीकारला पाहिजे असें विधानसभेतील तिसऱ्या भाषणांत सांगून फेडलें.

गेल्या तीन वर्षांत काय झालें तें सांगत नाहीं आवश्यक तें सत्य सांगितलें. अजून संपूर्ण सत्य कथन करण्याची वेळ आलेली नाहीं तोंपर्यंत गैरसमज राहील तो मला आतां अपरिचित नाहीं—

> आणि जीवनांत कांहीं मौलिक श्रद्धा असतात—कांहीं मौलिक सिद्धांत या श्रद्धेशीं समरस झालेले असतात-आणि असें असलें कीं कितीहि विरोध कितीहि गैरसमज होत असले तरी मन शांत असतें आणि प्रसंगीं मिष्कीलपणें ढोंगी लोकांच्या लीला पाहात असतें. • • •



# मोडेन पण वांकणार नाहीं~

— डॉ. ना. भा. खरे

विदर्भाचे कर्तबगार आणि कणखर पुढारी. मध्यप्रांताचे मुख्यप्रधान असतांना—काँग्रेसश्रेष्ठींशीं झालेल्या मतभेदामुळें काँग्रेस आणि मुख्यप्रधानकी यांचा त्याग केला. कांहीं काळ व्हाईसरॉयच्या एक्झीक्युटिव्हचे सभासद.

---

मी मागें वळून पाहातों तेव्हां असं दिसतं कीं माझ्या आयुष्यांत आतांपर्यंत अनेक स्थित्यंतरें झालीं. सरकारी नोकरी स्वाभिमानानें करतां येईना म्हणून सोडली. अगदीं भांडून सोडली. त्यावेळचे मध्य प्रदेशचे चीफ कमिशनर यांच्याशीं झगडा करून सोडली आणि खाजगी धंदा सुरू केला व काँग्रेसचा सदस्य झालों. अनुक्रमे कारावास भोगला व १९३७ मध्यें मध्यप्रदेशाचा काँग्रेसपक्षीय पंतप्रधान झालो.

एक वर्ष पंतप्रधानकी उपभोगल्यावर 'खरे प्रकरण' उद्भवलें आणि त्याबद्दलच पुष्कळसे गैरसमज झाले. या खरे प्रकरणांत शेवटीं गांधीजींशीं झगडा झाला याचें कारण त्यांची दुटप्पी वागणूक. मंत्रिमंडळांतील माझ्या कांहीं सहकाऱ्यांच्या सचोटीबद्दल शंका व्यक्त करणारीं पत्रें मला आलीं व कानावर अशाच प्रकारच्या कांहीं अफवाही पडल्या होत्या. या अफवांचा खरेखोटेपणा पडताळून पाहाण्याची मला जरूरी भासली. कारण सगळ्या अफवा जर खोट्या असतील तर माझ्या सहकाऱ्यांनाहि डाग लागूं नये असें मला वाटलें. म्हणून मी या सर्व प्रकरणाची अनौपचारिक चौकशी सुरू केली.

माझें हें करणें त्यावेळीं पार्लमेंटरी कमेटीचे अध्यक्ष सरदार पटेल यांना आवडलें नाहीं. म्हणून मी गांधीजींशीं पत्रव्यवहार करून त्यांना प्रत्यक्ष चौकशीचे कागदपत्र दाखविण्यासाठीं मुलाखत मागितली. या मुलाखतींत गांधीजींनीं सर्व कागदपत्र पाहिले आणि ते म्हणाले कीं, अशा तऱ्हेचे संशयित इसम मंत्रिमंडळांत असूं नयेत. तुझ्याबद्दल माझी पूर्ण सहानुभूति आहे. हें ऐकून मी गांधींचे आभार मानले आणि पंधरा दिवसांनीं पुन्हां येऊन भेटण्याची परवानगी मागितली. ती त्यांनीं खुशीनें दिली. त्याप्रमाणें २९ जुन १९३८ या दिवशीं मी पुन्हा गांधीजींना भेटलों आणि पुन्हां कांहीं नवीन कागदपत्र त्यांना दाखविले. त्याबरोबर ते एकदम रागावले आणि चिडून म्हणाले, "तूं घडी घडी आके इस मामलेमें हमकू क्यूं सताता? तूं जानता नहीं की मैं कांग्रेसका चार आने का सभासद भी नहीं हूं. तूं सरदार पटेल के पास जा. जमनालाल बजाजके पास जा. मेरे पास क्यों आता?" गांधीजींच्या या कोलांटी उडीनें त्यांच्या महात्म्याचा पारा एकदम उतरला व मीहि त्यांना तडाखून जबाब दिला. मी म्हणालों "मैं जानता हूँ की आप चार आनेके सदस्य नही है लेकिन मैं यह भी जानता हुँ की आप कांग्रेस कार्यकारिणीके चालक, मालक, उत्पादक सबहि है. आपने ऐसा ठुकरा दिया तो अब मैं किसीके पास भी नहीं जाऊंगा. इस मामलेमें अब



अनुक्रमणिका

अपनी अंदरकी आवाजसेही काम लूँगा" या-नंतर मी दिव्य केलें तें ख्यातनामच आहे आणि त्याचे सर्व परिणाम मी भोगलेहि.

यामुळे एकंदर मला गांधीवादाचा वीट आला. पुढें लौकरच दुसरें महायुद्ध सुरू झालें. आणि गांधीजींचें इंग्रजाबद्दलचें दुटप्पी धोरण स्पष्ट झालें. म्हणून मी अखिल भारतीय गांधी विरोधी आघाडी उघडावी म्हणून २ जानेवारी १९४१ ला कलकत्त्याला गेलों. व तेथें माझ्या-प्रमाणें कांग्रेसमधून ज्यांना गांधींनीं हांकून दिलें त्या सुभाषचंद्र बोसांची गांठ घेतली. तेव्हां तेथील वातावरण एकंदरींत रहस्यमय दिसून आलें. कारण सुभाष बोसनें दाढीमिशा राखून परमार्थात व्यग्र होण्याचें बेमालूम सोंग घेतलें होतें. आमचें दोघांचें पुष्कळ बोलणें झालें. त्यांत स्पष्ट झालें कीं सुभाषचंद्र बोस हिंदुस्तानच्या बाहेर जाऊन कांहीं तरी भयंकर घाडस करण्याच्या विचारांत आहे. (मला मागाहून मुंबईत कळलें कीं मुंबई येथें २२ जून १९४० रोजीं सावरकरांनीं इंग्रजांचे शत्रु जर्मनी व जपान यांची मदत घेऊन इंग्रज युद्धाच्या अडचणींत असतांना हिंदुस्तानवर सशस्त्र स्वारी करण्याचा मंत्र दिला होता.) याच संदर्भात सुभाषनें मला आग्रह केला कीं, ८ ऑगस्ट १९४० च्या व्हाइसरॉयच्या घोषणे-प्रमाणें जर हिंदुस्तान सरकारचें कार्यकारी मंडळ वाढविण्यांत आलें आणि दैववशात् मला त्यांत जागा मिळाली तरी मी ती नाकारूं नये. बोस म्हणाले, "तुझ्यासारखीं कट्टर विरोधी माणसं हिंदुस्तान सरकारच्या उच्च अधिकार-पदीं पाहिजेत. बाहेरून आलेल्या उठावणीला अशा माणसांची आंतून मदत होऊं शकते." अत्यंत चमत्कारिक रीतीनें पुढें हा बनाव घडून आला. पण दुर्दैवानें अमेरिकेनें ऑग-स्टच्या दुसऱ्या आठवड्यांत हिरोशिमावर अॅटम बॉंब टाकला त्यामुळें जपान हतबुद्ध आणि हतबल झालें आणि सुभाषबाबूला परागंदा व्हावें लागलें. हें जर झालें नसतें तर हिंदु-स्तानच्या स्वातंत्र्याचा इतिहास कांहीं निराळा झाला असता व मिळालेलें स्वातंत्र्यहि वेगळ्या प्रकारचें असतें.

मला वाटतें माझ्यासंबंधींच्या गैरसमजाचें एवढें निराकरण पुरें आहे.

• • •



# मी मूर्तिभंजक नाहीं

— न. र. फाटक.

चालता बोलता ज्ञानकोश असें ज्यांचे वर्णन करावें असे एक प्रखर पंडित. संपादन, अध्यापन यांतील कर्तबगारी मोठी. जुनें मराठी वाङ्मय, आणि इतिहास यावरील फाटकांसारखी अधिकारी माणसें आजकाल दुर्मिळ.

सार्वजनिक जीवनांत एखाद्या चळवळीचा पुढारी म्हणून किंवा ज्ञानामध्यें नवीन विचारांची भर घालूं इच्छिणारा अभ्यासी म्हणून प्रवेश करणाऱ्याला आरंभीं लोकांच्या गैरसमजाशीं झगडावें लागतें. हा जणुं काय निसर्गाच्या अटळ नियमांपैकीं एक नियम आहे. गोष्ट कितीहि साधी व सरळ असो—तिच्या पोटीं कांहीं तरी वरून दिसतें त्यापेक्षां निराळें कपट झांकलेलें असावें, असें भय उत्पन्न करणारा कोणी ना कोणी निघतोच. आपल्याला जगांतल्या अबाढव्य पसाऱ्यापैकीं पुष्कळ विषय माहीत नाहींत, याची जाणीव शेंकडा नव्याण्णव माणसांमध्यें असत नाहीं. यामुळें नवीन विषय पुढें आला, कीं तो पूर्वीच्या रूढ व परिचित विषयाहून किंचित् भिन्न आहे, एवढ्यासाठींच त्याबद्दल चटकन् विपरीत ग्रह करून घ्यावयाचा, ही माणसाच्या व्यवहारांतील सामान्य रीतच आहे.

या सामान्य रीतीचा मला अनेक वेळां अनुभव आलेला आहे. स्वामी रामदास यांचा व शिवाजी महाराजांचा संबंध केव्हां आला व महाराजांच्या उद्योगांत स्वामींचें अंग कितपत होतें, या दोन प्रश्नांवरून महाराष्ट्रांत कांहीं वर्षें वाद माजला होता. सध्यां तो थांबलेला आहे. मिटलेला नाहीं. या वादांतील एका पक्षाचे मोठे धुरीण दिवंगत झाले आहेत. त्यांचें नांव सांगण्याची गरज नाहीं. नांवाची वाच्यता केली नाहीं यासाठींदेखील गैरसमज करून घेणें शक्य आहे. जे दिवंगत झाले ते आपल्या परीनें अभ्यासी होते; निधनानंतर त्यांचें नांव न उच्चारण्याचा हेतु उदार व एक प्रकारें आदराचा असला तरी त्या हेतूकडे लक्ष न देतां नांव लपविण्यांत कांहींतरी डाव असला पाहिजे, नांव उच्चारण्याइतक्याहि किंमतीचे ते नाहींत वगैरे; या गैरसमजाला कसलीच आडकाठी नाहीं. गैरसमज कसा उद्भवतो व कसा स्वीकारला जातो याचा ओघानेंच आला म्हणून एक मासला दाखविला.

रामदास व शिवाजी यांच्या भेटीचा प्रसंग दोघांच्या आयुष्यांत फार उशीरा घडला, असें मत ५० वर्षामागें पुढें आलें व तें पुराव्यासह पुढें आलें, त्यासरशीं या दोघां महापुरुषांची भेट लवकर झाली, असें मानणाऱ्या पक्षाच्या पुढाऱ्यांनीं पुराव्याचें परीक्षण करण्याऐवजीं नव्या मताचा संशोधक पुरस्कर्ता वारकरी संप्रदायाचा अभिमानी असल्यामुळें त्यानें हा भेटीचा वाद काढला, याप्रमाणें त्यावर आरोप लादला. वस्तुतः वारकरी पंथाचा व संशोध-नाच्या परिणामीं हातीं आलेल्या कागदपत्रांचा कांहीं संबंध नाहीं. परंतु वारकरी पंथानें देशाचा घात केला असें समजणाऱ्या अर्वाचीन शिक्षितांची संख्या अतिशय मोठी आहे. त्यांच्यांत नवें मत वारकरी पंथाच्या पुढ्यांतले असा पुकारा करतांच त्या मताच्या पुराव्याची योग्य रीतीनें पहाणी केल्यावांचून सहज तें मत गाडलें जाईल

















अनुक्रमणिका

अशी रूढ मतांच्या भक्तांची कल्पना होती व ती कांहीं प्रमाणांत सफल झाली. पुढें ज्या गृहस्थानें नव्या मताला वरीच वर्षे लोटल्यावर उचलून धरलें, त्यानें विजातीय स्त्रीशीं लग्न केलें होतें, अर्थात् तो भ्रष्ट, या समजुतीचा फायदा घेऊन त्यांच्या तोंडाला खीळ घालण्याचा यत्न झाला पुनः या वादाचें डोकें वर निघालें तेव्हां नव्या मताच्या वक्तयावर त्याचा रामदासी वाङ्मयाचा अभ्यास कोता आहे, त्यानें दासबोधाचें वाचन केलें नसावें, अशा तऱ्हेच्या मनसोक्त आरोपांनीं त्यांची लोकांत विटंबना साधण्याचा खटाटोप करण्यांत आला.एकमेकांशीं झुंजणाऱ्या व्यक्तींमध्यें एकमेकांबद्दल खऱ्या अर्थानें गैरसमज नव्हते. गैरसमज दुरून वादाचा अर्धवट आवाज ऐकणाऱ्यांमध्यें पसरतात आणि त्यांची संख्या मोठी असते.

प्रस्तुत लेखकानें गैरसमजाच्या अशा अनेक वावटळी अनुभवल्या आहेत. आणि वर उल्लेखिलेल्या वादांतून निर्माण करण्यांत आलेला एक मोठा आक्षेप म्हणजे मूर्तिभंजनाचा. परंतु टिळक चरित्र वाद – अथवा चिपळुणकर वाद बारकाईनें अभ्यासिणाऱ्यांच्या ध्यानीं हें येईल कीं त्यांतील संशोधनामागें मूर्तिभंजनापेक्षां वस्तुस्थितीच्या ज्ञानाचा आग्रह अधिक होता. मूर्तीच्या भोंवतीं स्तुतीचीं जीं पुटें चढलेलीं असतात तीं काढून टाकून पर्वतप्राय भासणारी मूर्ति कोणत्या मापाची आहे हें दिग्दर्शित करण्याचा हेतु होता.

प्रा. फाटक हे Established म्हणजे दीर्घकाळ रूढ असलेल्या-मूल धरून बसलेल्या मतांचा उच्छेद करण्यांत आनंद मानतात, असा एक आक्षेप. असा आक्षेप घेणारे अंतिम ज्ञानवृद्धीच्या आड येणारे ठरतात. कारण रूढ मताला उराशीं बाळगणाऱ्यांना रूढ मताची स्थापना कोणी केली असा प्रश्न विचारल्यास त्याचें उत्तर देतां येणार नाहीं. त्यांच्या मतानुसार जें Established तें जणूं काय अनादि व अपौरुषेय असतें. आणि याचमुळें 'संत्तावनची शिपाइ गर्दी' असें सत्य निर्भीडपणें उच्चारतांच तें स्वातंत्र्ययुद्ध आहे हें रूढ मत उराशीं बाळगणाऱ्यांनीं मोठें काहूर उठविलें.

सत्य हें निर्भयपणें,कशाचीहि तमा न बाळगतां सांगितलें गेलें कीं त्यामागोमाग येणारा ठराविक आक्षेप म्हणजे श्रद्धाहीनतेचा. अमुक एका विद्वानाला चांगलें असें दिसत नाहीं; तो अश्रद्ध आहे हा आरोप प्रस्तुत लेखकालाहि सहन करावा लागलेला आहे. पण न्या. रानडे चरित्र आणि तुकाराम, रामदास आणि ज्ञानेश्वर यांच्या वाङ्मयावरील त्याचे ग्रंथ वाचल्यास हे आरोप गैरलागू आहेत असें सिद्ध होईल. अर्थात् भोळ्या भावड्या भाविकाची श्रद्धा आणि प्रत्येक गोष्ट पारखून स्वीकारणाऱ्या अभ्यासकाची श्रद्धा यांत फरक असणारच.

या आरोपामागोमाग, फटकळ, अहंकारी असेहि आरोप केले जातात. अर्थात् या वैयक्तिक आरोपाबाबत उत्तरें देण्याची फारशी गरज नाहीं. या संदर्भात प्रस्तुत लेखकानें जे अनेक मित्र जोडले आणि त्यांतील कांहीं जणांवर निःस्वार्थी प्रेम केलें, याचा उल्लेख करावयास हरकत नसावी. कारण भावनाशून्यता असती तर जिवलग मित्रांचा हा परिवार जोडला गेला नसता. अर्थात् कोमल्यादि भावनेचें जाहीर आणि अनाठायीं प्रदर्शन करण्याची सवय नाहीं. तसेंच आतांपर्यंतच्या जीवनांत अश्रू उमाळे आणि आरडा-ओरडा यांनाहि स्थान मिळालेलें नाहीं. शिवाय अत्यंत जिवलगांशीं अथवा जवळच्या नातेवाईक अथवा मित्रांच्या मृत्युसमयींहुद्धां मनाची ही शांति कधीं ढळली नाहीं; किंवा अंतर्यामी दडलेल्या भावनेनें संयमाचें बंधनहि तोडलेलें नाहीं. मात्र दुसऱ्यांच्या भावनांना अथवा श्रद्धेला आपला उपसर्ग पोंचणार नाहीं अशी सदैव खबरदारी घेण्याचा प्रयत्न चालू असतो. • • •








# आतां फक्त मधुर स्मृति राहिल्या

— बालगंधर्व

बालगंधर्व म्हणजे मराठी रंगभूमीचे राजराजेश्वर. आपल्या अभिनयानें आणि स्वर्गीय गायनानें त्यांनी महाराष्ट्राला अक्षरशः वेडें केलें होतें. असा कलावंत पुन्हां निर्माण होणें कठिण !

गैरसमज हे मोठ्यांच्याच काय पण सर्वसामान्य व्यक्तींच्या जीवनांतहि निर्माण होत असतात आणि पदोपदीं त्याला नडत असतात. मला वाटतं अत्यंत लोकप्रिय व्यक्तीच्याहि आयुष्यांत गैरसमज भरपूर असतात. याचं कारण असं कीं माणूस सर्वांनाच सारखं खूष ठेवूं शकत नाहीं आणि त्यामुळें नाखुष माणसं गैरसमज पसरवीत असावींत.

पण रंगभूमीचा एक सेवक या नात्यानें मी जेव्हां मागें वळून पाहातों तेव्हां माझ्या टीकाकारांप्रमाणें, भक्तांनीहि माझ्याबद्दल पुष्कळ गैरसमज पसरविलेले आहेत. माझ्या भक्तांच्या मतें मी एक असामान्य नट असून शतकांतूनच अशी एखादी व्यक्ति निर्माण होते असें अतिरेकी मत ते प्रकट करतात; तर कांहीं टीकाकारांच्या मतें माझ्यासारख्या सामान्य गायक नटाचें वाजवीपेक्षां फार कोडकौतुक केलें गेलें आहे. म्हणजे माझ्या भक्तांनीं आणि टीकाकारांनीं, दोघांनीं माझ्याबद्दल खूप गैरसमज पसरविले आहेत. जेव्हां कांहीं रसिक ' नटसम्राट ' सारखीं विशेषणें मला बहाल करतात तेव्हां मला खरोखरच संकोचल्यासारखें होतें. नटसम्राट हा किताब माझ्याबद्दल, आणि माझ्या अगोदर होऊन गेलेल्या कै. गणपतराव भागवत, गणपतराव जोशी, केशवराव भोसले आदि थोर अभिनयधुरंधरांबद्दल गैरसमज निर्माण करणारा आहे. या थोर नटसम्राटांची आठवण झाली कीं आपण किती लहान आहोंत आणि होतों याची जाणीव होते. आजच्या तरुण पिढीला मी कोण होतों हें जर माहीत नाहीं तर हे थोर नट कसे होते हें कसें कळणार ! पण आज नाटकांच्या जाहिरातींतील नटसम्राट हीं विशेषणें फार स्वस्त झाल्याचें जेव्हां दिसतें, तेव्हां आजकाल विशेषणेंहि अर्थशून्य झालीं कीं काय असा संशय येतो.

माझ्यावरचा एक मोठा आरोप म्हणजे मी गायनाचा अतिरेक करून मराठी प्रेक्षकांना वाईट संवयी लावल्या. हा आरोप दोन्ही अर्थी खरा आहे मराठी प्रेक्षकांना मी वाईट संवयी लावल्या आणि प्रेक्षकांनींहि या माझ्या वाईट संवयीला उत्तेजन दिलें. खरोखर त्या काळांत आमच्या अन्नदात्याच्या वन्समोअरच्या आग्रहाला बळी पडलों नसतों तर देवा, फार फार बरं झालं असतं. या चुका आमच्या हातून नकळत घडल्या, लोकप्रियतेच्या धुंदींत घडल्या, याचा आतां खेद होतो. तो जमाना स्वास्थ्याचा होता. नाटकं पहांटेपर्यंत चालायचीं. त्यामुळें काळाच्या दृष्टीनें तें विपरीत नव्हतं. तरी तें ठीक नव्हतं हेंच खरं. मात्र हा आरोप करतांना माझ्या अभिनयाला जें गालबोट लावलं जातं तें कै. देवल आणि कै. खाडिलकर यांच्यासारख्या थोर नाट्याचार्यांच्या तालमींवर अन्याय करणारं आहे. गणपतराव बोडसांनींहि मला खूप शिकवलं. विशेषतः खाडिलकरांच्या ' स्वयंवर ' नाटकाची गंमत औरच. कथानक आणि संगीत ज्याच्यांत एकजीव झालें आहे असें स्वयंवरसारखे प्रभावी नाटक देशी रंगभूमीवर विरळा !

माझ्याबाबतचा आणखी एक गैरसमज म्हणजे आम्ही जुन्या नाटकांवरच अवलंबून राहिलों तसं पाहिलं तर ' एकच प्याला ' हा एक नवा प्रयोगच होता. १९२८ सालीं वसंत शांताराम देसाई यांच्यासारखा त्यावेळीं पोरसवदा असणारा नाटककार आमच्या रंगभूमीवर अवतीर्ण झाला









हें कशाचं द्योतक ? वसंतरावांच्या 'अमृतसिद्धी' नाटकाच्या वेळीं वास्तवाचा आग्रह म्हणून मी मारवाडी वस्त्रभूषेचा हट्ट धरला आणि त्याचं प्रेक्षकांनीं मुळींच कौतुक केलं नाहीं (आज ती एक मोठीच चूक झाली असं वाटतं) हा कुणाचा दोष ? १९२२ ते ३३ या काळांत एकूण प्रमुख ४५ नाटकांपैकीं नवीं अशीं नाटकं दहा-बाराच. त्यांतील 'श्री' हें नाटक १९२९ सालीं कै. बापू पेंढारकरांनीं रंगभूमीवर आणलं. 'आंधळ्याची शाळा' व 'साष्टांग नमस्कार' हीं आणखी दोन यशस्वीं नाटकं सोडल्यास या बारा वर्षांत बापू पेंढारकरांचा सन्मान्य अपवाद सोडतां कोणत्या मातबर मंडळींनीं नवीं नाटकें आणण्याचें धाडस केलें ! शिवाय गंधर्व नाटक मंडळी-सारख्या कंपनीला गडकरी, खाडिलकर यांच्याच तोलामोलाचा प्रभावी नाटककार हवा होता. आणि मला वाटतें अजूनहि त्यांच्या मागोमाग त्यांची जागा भरून काढील असा नाटककार कुठें निर्माण झालाय ? रंगीत छपाई हाच ज्यांचा धंदा, त्यांना साध्या छपाईचें काम कसें जमणार ! त्याप्रमाणें गंधर्व कंपनीची जी बैठक त्या बैठकीला अनुरूप असा नवा प्रभावी नाटककार मिळता, तर खात्रीनें त्याचें नाटक मी आणलें असतं.

मी अवाढव्य पैसा मिळविला आणि त्याचं केलं काय, असाहि प्रश्न कित्येकांना पडतो. १९२१ ते ३२ पर्यंतच्या काळांत गंधर्व कंपनीला दरसाल सरासरी पावणे दोन लाख रुपये उत्पन्न होत होतं. या पैशाचं मी केलं काय तर त्याचा उपयोग रंगभूमि सजविण्यासाठीं केला. अगदीं प्रेक्षकांच्या डोळ्यांचं पारणं फिटेल अशी रंगदेवता सजवली. रंगभूमीवर वावरत असतांना मी अत्तर खोबरेलासारखं वापरलं, पण नाटक-गृहाच्या बाहेर पडल्यावर अत्तराच्या थेंबाचाहि माझ्या शरीराला स्पर्श झाला नाहीं. वैयक्तिक अशी चैन मी कधींच केली नाहीं हें माझ्या शत्रूंनीहि मान्य करावं. रंगभूमीच्या कोडकौतुका-साठीं मी जेवढे पैसे खर्च केले त्याचा एक शतांशहि जरी माझ्या स्वतःच्यासाठीं खर्च केला असता तर आज मी अनेक बंगले नी वाडे आणि मोटारी यांचा धनी झालों असतों. माझ्या गायनावर वेडे झालेले लुब्ध झालेले अनेक लखपति माझे मित्र होते. पण पैशाचा मोह मला कधीच झाला नाहीं आणि त्यामुळें आज माझ्याजवळ स्वतःचं असं उरलंय तें वार्धक्य आणि जुन्या मधुर स्मृति.

कंपनीच्या व्यवहारावर मी फार लक्ष ठेवलं नाहीं असा एक आरोप. पण माझं लक्ष नव्हतं हा गैरसमज. कांहीं गोष्टीकडे मला जाणून-बुजून दुर्लक्ष करावं लागलं. कारण अखेर कला हेंच माझं सर्वस्व होतं. आणि त्यामुळें हिशेबी-पणा माझ्या वृत्तीला झेंपण्यासारखा नव्हता. हें चूक असेल; पण खरं आहे तें लिहितोंय.

माझ्या दुसऱ्या विवाहामुळें गैरसमजाचे अनेक ढग निर्माण झाले आणि अजूनहि ते कायम असतील. पण एक काळ असा होता कीं मोठमोठ्या राजकन्या सुद्धां माझ्या स्मित-हास्यासाठीं वाटेल तें दिव्य करायला तयार होत्या ! पण मी कोणत्याच स्त्रीकडे आकृष्ट झालों नाहीं. आणि शेवटपर्यंत निर्मळ राहिलों.

गोहरबाईबरोबर मी लग्न केलंय हीच गोष्ट माझ्या तिच्याबद्दलच्या भावना व्यक्त करतील. तिनें मला साथ दिली आणि अजूनहि त्याच निष्ठेनें देतेय. मात्र या प्रकरणांत माझ्या प्रथम पत्नीनें फार हाय खाल्ली. त्याचं मला आजहि दुःख होतं.

अर्थात् वैयक्तिक घटनांना माझ्या आयुष्यांत मोठें स्थान मी कधींच दिलं नाहीं. वैयक्तिक दुःखाचे अश्रू पुसून मी तोंडाला रंग लावून लाखों प्रेक्षकांचें रंजन केलेंय. त्यामुळें गंधर्व कंपनीच्या असामान्य यशामुळें मत्सरी बनलेल्या टीकाकारांचें मला कांहींच वाटत नाहीं.

रसिकांची सेवा हेंच माझें समाधान व त्यांत कसूर कधींच झाली नाहीं. • • •

# मलाहि महाराष्ट्राचा ज्वाज्वल्य अभिमान आहे



—बाबुराव पटेल

फिल्म इंडिया आणि श्री. बाबुराव पटेल या अभिन्न वस्तु आहेत. त्यांच्याइतकं सफाईदार, खुसखुशीत आणि चुरचुरीत इंग्रजी लिहूं शकणारा दुसरा महाराष्ट्रीय सांपडणें कठीण. चित्रपट नियतकालिकांत त्यांच्या फिल्मइंडियाची कर्तबगारी आणि दर्जा फार मोठा.

---

गेलीं तीस-पस्तीस वर्षें मी सारखे कष्ट करतोय. या कष्टांचें फलित काय, तर गैरसमज. त्यामुळें दीपावलीच्या संपादकांनीं माझ्याबद्दलच्या गैरसमजाचें स्पष्टीकरण करण्याची विनंति केली, तेव्हां मी क्षणभर दचकलोंच. कारण आपल्या यशाची गुरुकिल्ली सांगून टाकण्यासारखाच हा प्रकार आहे. शिवाय माझ्याबद्दल गैरसमज कोणते आहेत, तेंहि मला पूर्णपणें ठाऊक नव्हतें.

माणसाच्या डोळ्यांची रचनाच ईश्वरानें अशी केली आहे, कीं त्यानें सदैव समोर दृष्टि टाकावी. आपण एखादें कृत्य केल्यानंतर त्याच्या प्रतिक्रिया काय झाल्या, हें पाहाण्यासाठीं मी मागें वळून कधींच पाहिलें नाहीं. आयुष्यांतील प्रत्येक कृत्य मी जाणून बुजून आणि स्वतःच्या सद्विवेक बुद्धीला स्मरून केलें आहे. त्यामुळें अशा तऱ्हेनें मागें वळून पाहाण्यानें माणसाची प्रगति क्षणभर खुंटते कीं काय, असें मला वाटतें. आयुष्य हें अति अल्प आणि कालाची गति वेगवान असल्यामुळें असे मोलाचे क्षण वांया घालविण्यांत तरी काय अर्थ आहे!

पण आमच्या महाराष्ट्रीय संपादकानें एखादी गोष्ट मनांत आणली, तर त्याला नकार देणें कुणालाहि जड जाईल. विशेषतः दीपावलीच्या संपादकांनीं माझे स्नेही श्री. बाळ सामंत यांना मध्यस्थ करून मला मोठ्या पेंचांत टाकलें. प्रत्येक व्यक्तीचें एखादें तरी मर्मस्थान असतेंच आणि त्यामुळें सामंतांच्या विनंतीला मान देणें मला भागच पडलें.

माझ्याबद्दल काय काय गैरसमज आहेत याची एक यादी द्या असें मी त्यांना म्हटलें. त्या यादीनुसार माझ्यावर पहिला आक्षेप म्हणजे नांवाचा! नांवांत काय आहे असें शेक्सपीयरनें म्हटलें आहे. पण आमच्या मराठी माणसांना पटेलपेक्षां पाटील हेंच नांव अधिक पसंत पडणें साहजिक. कारण पटेल नांवांत गुजरातीपणाचा वास येतो. पण मी बाबुराव पटेल हें नांव कां लावतों? तर मी खरोखरच ठाणें जिल्ह्यांतील पालघर तालुक्यांतील बोयसर






गांवचा पाटील आहे. आजहि मला वार्षिक ७५ रु. तनखा मिळतो. पोलीसपाटीलकी हें माझें वतन आणि बोयसर हें गांव गुजरातच्या सरहद्दीपासून जवळ असल्यामुळें व तेथें बरेच गुजराती राहात असल्यामुळें पाटीलचें पटेल असें नामांतर झालें. त्यामुळें पटेल या नांवाला आक्षेप घेण्याचें मला कांहींच कारण नव्हतें. शिवाय देशाच्या राजकारणांत संयुक्त महाराष्ट्राच्या प्रश्नाचा उदय होई-पर्यंत महाराष्ट्रीय आणि गुजराती यांच्यांतील वितुष्टाची मला मुळींच जाणीव नव्हती. आणि माझ्या बाबतींत तर मराठी आणि गुजराती या पैकीं कोणतीच भाषा माझी मातृभाषा नव्हे. वयाच्या १८ व्या वर्षानंतर या दोन्ही भाषा मी आत्मसात् केल्या. तत्पूर्वी आमच्या वडिलांना आम्हाला आय सी. एस. करावयाचें असल्यामुळें मला लहानपणापासून इंग्रजीच शिकावें लागलें आणि इंग्रजीच ही माझी खरी मातृभाषा. आजच्या राष्ट्रीयतेच्या काळांत हें लिहिणें कदाचित् विचित्र भासेल; पण ५६ वर्षांपूर्वीचें आमचें आयुष्य इंग्रजी वळणावर आंखलें जावें. यांत आश्चर्य वाटण्यासारखें कांहींच नाहीं. तुम्ही मला पाटील म्हणा अगर पटेल म्हणा, पण ज्या छत्रपती शिवाजी महाराजांच्या प्रतापी भूमींत माझ्या आईनें माझ्या पाळण्याला झोंके दिले त्या भूमीचा मी पाईक अस्सल महाराष्ट्रीय आहे.

मी मुसल्मानद्वेष्टा आहे, असा माझ्यावर आरोप केला जातो. हें खोटें आहे. कडव्या हिंदूला अकारण कडवा मुस्लिमद्वेष्टा बनण्याची गरज नाहीं. पण मला हिंदु म्हणवून घ्यावला मोठा अभिमान वाटतो. कारण त्यामागें हजारों वर्षांची उज्ज्वल परंपरा आहे. आणि त्या परंपरेचा मी अभिमान का बाळगूं नये ? परंतु हिंदुत्व मला इतर धर्मांबाबत सहिष्णुता शिकवितें. आणि स्वधर्मरक्षणासाठीं सावध राहाण्याचाहि इशारा देतें.

हिंदुत्वाचें पावित्र्य नष्ट करण्याचा इतर धर्मीयांकडून प्रयत्न झाला तर आपल्या श्रद्धेचें संरक्षण करण्याची गरज आहे हें जगाला पटवून देणें माझें पवित्र कर्तव्यच ठरतें. आणि हें कर्तव्य मी केलें नाहीं तर जिनं मला जन्म दिला तिच्याशीं प्रतारणा केल्यासारखे होईल. इस्लामचा इतिहास मला सावधानतेचा इशारा देतो मी हिंदुत्वाचा स्वयंप्रेरित शिपाईगडी आहे धर्मातीतपणाच्या ध्येयवादामुळें आज केवळ एका माणसाच्या गुन्ह्यासाठीं ३२ कोटी हिंदु अल्पसंख्यांकांसारखे वागवले जाऊं लागले आहेत याची मला जाणीव आहे. पण हिंदुत्वाला असली धर्मातीतपणाचीं अनेक ओझीं शिरावर घेऊन पुढचा मार्ग आक्रमावयाचा आहे. कांहीं सिने निर्मात्यांकडून माझ्यावर ब्लॅकमेकिंगचा आरोप करण्यांत येतो. मला 'ब्लॅकमेकर' कोण म्हणतं याचा कुणी विचार करीत नाहीं. यश हें काय ब्लॅकमेकिंगचें प्रतीक आहे ? गेलीं २५ वर्षे चाललेल्या माझ्या मासिकाचीं पानें तुम्ही चाळलींत तर मी लिहिलेल्या एकूण चित्रपट परीक्षणांपैकीं फक्त दोन टक्के परीक्षणें अनुकूल आहेत असें आढळेल; केवळ हीच गोष्ट मी ब्लॅकमेकींग करीत नाहीं हें सिद्ध करावयास पुरेशी आहे. मला अनेक प्रलोभनें दाखविण्यांत आलीं; पण मी माझी लेखणी कधींच विकली नाहीं. आणि त्यामुळें माझ्या टीकाकारांना मी असें आव्हान दिलें कीं, हा आरोप सिद्ध करून दाखविल्यास मी २५०००

रु. रोख बक्षिस द्यायला तयार आहे! पण भेकड टीकाकारांपैकीं कोणींच पुढें आलें नाहीं. चित्रपटसृष्टींत ज्याला विकत घेतां येत नाहीं त्याला बदनाम करावयाचें अशी प्रथाच आहे.

मी महाराष्ट्रापासून फटकून वागतो, असा आरोप माझ्या या मित्रानें केला. मी त्याला विचारलें – मी. ज्यांना भेटावं अशा दहाबारा मराठी माणसांचीं नांवं सांग. "पण त्या विचाऱ्याला एकहि नांव पटकन् सांगतां येईना. ज्याच्याशीं सुखदुःखाच्या मनमोकळ्या गप्पा माराव्या आणि आनंदी व्हावं अशा २१ मराठी माणसांचीं नांवं सांपडणं खरोखरच कठीण आहे. अथांग सागरांत विहार करीत असतांना मी विहिरींत कशाला उड्या मारूं! मराठी माणूस हा बुद्धिमान् खरा, पण संकुचित विचाराचा -- एखाद्या मुसलमानासारखा. त्याला वैयक्तिक स्वार्थाखेरीज सुचत नाहीं आणि राजकारणांत व धर्मांत तो जातीयतेच्या आहारीं जातो. पूर्वग्रहांना बगल देऊन विचार करणें मराठी माणसाला जमत नाहीं. त्यामुळें तो केवळ व्यक्तिवादी बनतो; मोकळ्या विचारांचा नव्हे. प्रा. फडके, विश्राम बेडेकरांसारखे व्यापक विचारसरणीचे माझे कांहीं मित्र आहेत हें खरें—पण फार थोडे—बेडेकर मला नेहमीं आग्रह करतात कीं महाराष्ट्रीय माणसांत मिसळावं. पण स्वतःचं अस्तित्व मासविण्यःपेक्षां ज्ञानाचा व्यासंग करणं मला अधिक प्रिय आहे.

मी अश्लील लिहितों, असा एक आरोप पण अश्लील म्हणजे तरी काय? एखादा नग्न माणूस मी रस्त्यांत पाहिला आणि त्याचें यथार्थ चित्रण केलें तर तें अश्लील ठरेल कीं वास्तववादी ठरेल? लेखकाच्या वास्तव चित्रणाकडे वाचक अश्लील नजरेनें पाहूं शकतो हा लेखकाचा दोष नव्हे. सत्य हें केव्हां केव्हां अश्लील असतें; पण प्रामाणिक लेखकाला सत्य हें सांगावेंच लागतें. माझ्या 'फिल्मइंडिया' मासिकांत चित्रपटांखेरीज इतर विषयांचें भारूड कां, असा एक प्रश्न नेहमीं विचारला जातो. २५ वर्षांपूर्वीं हें मासिक सुरू झालें. पण सुदैवानें ज्यानें हें मासिक सुरूं केलें त्याची महति मासिकापेक्षां अधिक वाढली. वाचकांना चित्रपटाखेरीज इतर विषयांबाबत संपादक काय म्हणतों हें जाणण्याची उत्सुकता होती आणि त्यामुळें वाचकांना ज्यांत आस्था आहे अशा अनेक विषयांना फिल्मइंडियांत स्थान द्यावें लागलें. आजचें मासिक हें एका व्यक्तिमत्वांतून विकसित झालें आणि त्यामुळें मी याला उद्यां बाबुराव पटेल मासिक असें नांव ठेवलें तरी तें खपेल. तें फिल्मइंडिया म्हणून खपत नसून त्यांत मी लिहितों म्हणून खपतें. जगांतील फारच थोड्या संपादकांना ही प्रौढी मिरवितां येईल.

कदाचित् वाचकांना ही प्रौढी उद्धटपणाची वाटेल. पण दीपावलीच्या वाचकांनीं हें लक्षांत ठेवलें पाहिजे. हा लहान माणूस महाराष्ट्रीय असून त्याला आपली बुद्धिमत्ता, परंपरा, संस्कृति, यांचा फार मोठा अभिमान आहे. आणि त्यामुळें ज्याच्याबद्दल फार गैरसमज आहेत अशा या व्यक्तीबद्दल त्यांना थोडें ममत्व वाटूं लागेल अशी आशा.

गैरसमज हा लेखकाचा दोष नसून तो वाचकांचा दोष आहे. आज महाराष्ट्रीयांना आपलें स्वतःचें राज्य लवकरच मिळत आहे. अशा वेळीं त्यांनीं आपल्या लेखकांना जवळ करणें अगत्याचें आहे. आईला आपलीं मुलें दूर कशी लोटतां येतील?—त्यामुळें गैरसमजाचें मोहोळ उठविण्यापूर्वीं महाराष्ट्रीयांनी याचें उत्तर द्यावें.

# आभाळाला ठिगळं किती लावणार ?



— स्नेहप्रभा प्रधान

नाट्यसृष्टि आणि चित्रपटसृष्टी यांत सारख्याच तेजानें तळपणारी अभिनेत्री. झेविअर्स कॉलेजांत असल्यापासून फर्डे इंग्रजी वक्तृत्व आणि दर्जेदार इंग्रजी लेखन करण्यांत पटाईत. वाङ्मयीन अभिरुचिहि चोखंदळ.

सार्वजनिक जीवनांत आघाडीवर असणाऱ्या व्यक्तींनीं आत्मसमर्थनपर खुलासे करण्याच्या उपद्व्यापांत पडूं नये असें माझें वैयक्तिक मत असलें तरी 'दीपावली'च्या संपादकांच्या विनंतीला मान देऊन या परिसंवादांत भाग घ्यावा लागत आहे. कारण आधींच अनेक गैरसमज–त्यांत आणखी एकाची भर नको ! बाकी माझ्याबद्दलचे गैरसमज पांच-पन्नास ओळींचा खुलासा केल्यानें दूर होऊं शकतील असें निदान एका तरी व्यक्तीला वाटतें ही समाधानाची गोष्ट आहे.

आभाळ फाटलं म्हणजे ठिगळं कुठं कुठं लावायचीं असा प्रश्न पडतो. त्याप्रमाणें माझ्या बद्दलचे कोणते कोणते गैरसमज दूर करीत बसायचं याचा प्रश्नच पडतो. कलावंत म्हणून माझ्या भूमिकेबाबत कांहीं शंकाकुशंका असल्या अगर माझ्या एखाद्या व्याख्यानानंतर, आचार-विचारांतील विसंगति कुणी दाखवून देण्याचा प्रयत्न केला तर तो गैरसमज दूर करण्याचा अवश्य प्रयत्न करीन. परंतु माझ्या खाजगी जीवनांतील व्यक्तिगत घटनांबाबत ज्यांचा यत्किंचितहि कांहीं संबंध नाहीं अशा लोकांसमोर आपल्या अंतःकरणाचे कप्पे उघडे करण्याची कल्पनाच मला असह्य वाटते.

कारण जे आपल्या आयुष्याचें दुरून अवलोकन करतात आणि ज्यांच्या कुतुहलांत 'छिद्रान्वेषी' वृत्तीचेंच अधिक प्राबल्य, आणि दुसऱ्यांच्या अधःपातांत सहानुभूतिऐवजीं ज्यांना समाधान वाटतें अशा लोकांना आपण सत्य सांगितलं तरी त्याला असत्याचा शिक्का बसेल.

मी नुकताच चित्रपटसृष्टींत प्रवेश केला होता. कॉलेज शिक्षण घेतलेली मोठ्या घराण्यांतील तरुणी सिनेसृष्टींत येत असल्यामुळें माझ्या कलात्मक जीवनाला बऱ्याच गाजावाजानें सुरवात झाली. एका मामुली मासिकाच्या संपादकानें खप वाढविण्यासाठीं—" स्नेहप्रभा खूप धूम्रपान करते, खूप मद्यपान करते " असें खळबळजनक वृत्त छापलें. या मजकुरावर मी कांहीं खुलासा करावा, असें त्याच मासिकाच्या संपादकानें कुणाकडून तरी मला सुचवलें. उद्देश केवळ मासिकाचा खप वाढावा. अर्थात् या खुलाशाला मी नकार दिला. कारण जे मला जवळून ओळखतात, त्यांना माझ्या स्पष्टीकरणाची आवश्यकता नव्हती व जे मला दुरून ओळखत होते, त्यांना माझ्या खुलाशापेक्षां संपादकाचे चटकदार आक्षेपच अधिक सत्य वाटणार होते.

दुष्काळ वेळां स्वार्थ साधतां आला नाहीं, म्हणजे जवळचीं माणसेंसुद्धां अधिक गैरसमज पसरवतात आणि लोक म्हणतात– " अमुक एक व्यक्ति स्नेहप्रभा प्रधानच्या जवळच्या नात्यांतली आहे. ती खोटं कशं सांगेल ! "

भिंतीवर चेंडू आपटला, तर तो तेवढ्याच वेगानें परत येतो. त्याप्रमाणें गैरसमजाचें स्पष्टीकरण करूनहि गैरसमज तितकेच वाढतात. कारण स्पष्टीकरणानें गैरसमज दूर होतो, तर व्यक्ती–व्यक्तींत, गांवा–गांवांत, राष्ट्रा–राष्ट्रांत होणारे गैरसमज कधींच विलयाला गेले असते.

आपल्या ठरीव चाकोरीच्या बाहेर वावरणाऱ्या व्यक्तीबद्दल लोक अढी बाळगून त्याच्याबद्दल गैरसमज पसरवितात. पण हीं नीतिमान माणसं सुद्धां त्यांच्या चाकोरीच्या रेषेबाहेरच वावरत असतात. मात्र ते जगजाहीर होऊं न देण्याची खबरदारी घेतात !

आणि तसं नसतं तर विश्वाची गति खुंटली असती. आज जागतिक नीतीच्या दोन बाजू आहेत. शिपायाच्या ऐटबाज पोशाखांत समोरील सैन्यांतील दहा जणांचा मुडदा पाडला तर त्यांत राष्ट्रप्रेम व्यक्त होतं. पण स्वतःच्या अन्यायाच्या दुःखानं बेभान होऊन दुसऱ्याचा गळा दाबणाऱ्या माणसाला फांसावर चढावं लागतं.







अनुक्रमणिका

कांहीं व्यवसायाबद्दल फार समाजांत गैरसमज दृढमूल झालेले आहेत. नटींचीं लग्नं मजेकरितां (!) असतात आणि त्यांचे घटस्फोट प्रसिद्धीकरितां असतात असा एक सर्वसामान्य गैरसमज. आर्थिक स्वातंत्र्य उपभोगणाऱ्या आणि केव्हांही चार पुरुषांच्या सहवासांत येण्याची संधि मिळत असतांना एखादी स्त्री मजेकरितां लग्न करते असं म्हणणं किती पोरकटपणाचं आहे !

नटीच्या सौन्दर्याचं प्रदर्शन करून संस्थेसाठीं, समाजकार्यासाठीं तिच्या नांवावर गोळा केलेले पैसे लोकांना हवे असतात. तिच्या सौन्दर्याचें उत्तान प्रदर्शन पाहून 'काय सेक्स अपील आहे' म्हणून मिटक्या मारणारे लोक आहेत. थोडक्यांत इतर अनेक बाबतींत नटीकडून जगावेगळ्या अपेक्षा असतात. परंतु खाजगी जीवनांत मात्र तिनं सती सावित्रीसारखं रहावं असा त्यांचा अट्टाहास असतो ! परंतु नटीला ज्या जगांत वावरावं लागतं त्या जगांत सावित्रीला वावरावं लागलं असतं तर ती देखील सती राहिली नसती.

संसाराच्या चाकोरींत पडलेली स्त्री, अगतिकता आणि दौर्बल्य यामुळें आपली ठराविक मर्यादा सोडूं शकत नाहीं. त्यामुळें दारुड्या, व्यसनी, बाहेरख्याली आणि रोगी अशा नवऱ्यांना देव मानून ती स्वतःच्या शरीराचं विडंबन मोठ्या अभिमानानं सहन करते. अशा 'आदर्श' स्त्रियांची संख्या जास्त हें कबूल केलें पाहिजे. या कुंपणांतूनसुद्धां कांहीं अस्सल पतिव्रता बाहेरच्या जगाचं दर्शन घेत नाहींत असं नाहीं; परंतु जगाला दाखवायचे दांत निराळे आणि खायचे निराळे असें असलें म्हणजे पुष्कळ गोष्टी सुरळीतपणें पचवितां येतात.

चित्रपटसृष्टींत वावरणारी स्त्री सुरवातीपासून रुढीच्या विरुद्ध गेलेली असते. पुरुषांच्या सहवासांत आल्यामुळें त्यांच्या देवपणावरचा तिचा विश्वास उडालेला असतो. या पुरुषांची खरी किंमत आणि त्यांची नीतिमत्ता तिला नीट ठाऊक असते. "नटीशीं लग्न !" असा नाकाला मुरडा घालून समाजांतील माता-भगिनी आपल्या मुलां-भावांना जपत असल्यामुळें नटीला आपल्या वर्तुळांतीलच एखाद्या पुरुषाची निवड करावी लागते. त्यांतील बहुतेक तिच्या बँक अकाऊंटवर फिदा असतात. एकलेपणाची जाणीव, मातृत्वाची हांक, संरक्षणाची वाटणारी गरज यामुळें ती लग्न करते. परंतु स्त्रीच्या संपत्तीवर पोसायला तयार होणाऱ्या पुरुषाचा कधीही मर्द होऊं शकत नाहीं हें तिला उशीरा कळतं !

पण आपल्या चाकोरीबाहेर जाऊन लग्न केलं तर तिला कलासंन्यास घ्यावा लागतो. आपल्या पत्नीच्या गुणांना वाव देऊन सुखाचा संसार करणारा खरा मर्द करोडों पुरुषांत एखादाच असतो. पत्नीचं यश म्हणजे स्वतःचा पाणउतारा नव्हे हें समजून घेणारा पुरुष विरळाच. असाधारण स्त्रीच्या व्यक्तिमत्वामुळें खेचला जाऊन, पुरुष तिच्याशीं लग्न करायला जातो, परंतु तिला साधारण पातळीवर आणल्याशिवाय तो तिला सुख द्यायला नालायक ठरतो.

आज ही परिस्थिति घराबाहेर पडलेल्या बहुतेक मुलींच्या बाबतींत आढळते. आर्थिकदृष्ट्या स्वावलंबी असलेल्या स्त्रीबाबत कालचे पडताळे निरुपयोगी ठरले आहेत.

हें सारं खरं आहे तर मग आमच्या खाजगी जीवनांतील जखमा लोकांपुढें उघड्या ठेवून त्यांची सहानुभूति आम्ही कां मिळवीत नाहीं ? कां ? कशासाठीं ? उघड्या जखमेवरच अधिक हल्ला होत असतो. नटीचं दुःख—अश्रू-सारं कांहीं नाटकी असतं असा लोकप्रिय समज ! माझ्या घरांतील देवघर पाहून, "(अगबाई-अरे बापरे !) तुम्ही हें पण करतां का ? छान, छान !" असं निर्लज्जपणें म्हणणाऱ्या स्त्री-पुरुषांना मी जर खवचटपणें म्हटलं कीं, "छे हो, हे तर नाटकांतले देव आहेत." तर माझं काय चुकलं ? "आम्ही हें पण करतों." हें दाखविण्यासाठीं अलीकडच्या बहुतेक नटी आपल्या देवपूजेचे फोटो मासिकांतून छापायला देऊं लागल्या आहेत.

लोकांचे माझ्याबद्दलचे गैरसमज ऐकले कीं, कधीं कधीं माझा सुद्धां स्वतःबद्दलच गैरसमज होऊं लागतो. एका विलक्षण लोकप्रिय झालेल्या गाण्याची ओळ आठवते, "जो आवडतो सर्वांना, तोची आवडतो देवाला !" जिथं देवसुद्धां जनमतापुढें मान वांकवतो, तिथं या पामराची काय कथा ?

*







# आयुष्याला मी क्रीडांगण मानलें

—श्रीमंत मोतीरामशेट टोपीवाले

एकेकाळचे मुंबईचे लखपती. आजपर्यंत १५ लाखांहून अधिक रक्कम शेंकडों संस्थांना देणगी म्हणून दिली आहे. मोतीरामशेठ हे अव्वल दर्जाचे खेळाडू. टेनीस आणि बॅडमिंटन यांतील त्यांचे नैपुण्य ख्यातनाम!

श्रीमंत माणसाच्या श्रीमंतीबद्दल आणि व्यक्तिमत्वाबद्दल नेहमींच गैरसमज असतात. सर्वसामान्य लोकांच्या मतें श्रीमंत म्हटला कीं चैनी, उधळ्या, व्यसनी आणि बेफिकीर असतोच किंवा असला पाहिजे. त्यामुळें कदाचित् माझ्याबद्दलहि असे अनेक प्रवाद असण्याचा संभव आहे.

पण ज्यांना टोपीवाल्यांचं घराणं पूर्ण माहीत आहे त्यांच्या मनांत हा गैरसमज असण्याचें कारण नाहीं. माझे आजोबा कै. अनंत शिवाजी हे तर स्वतःच्या कर्तृत्वावरच पुढें आले आणि 'अल्युमिनियम किंग' अशी सार्थ पदवी त्यांनीं मिळविली. त्यांच्या कडक शिस्तींत माझे वडील कै. नारायणराव वाढले व त्यांनीहि शिस्तीची तीच परंपरा चालू ठेवली. या संदर्भात माझ्या लहानपणचा एक प्रसंग मला वारंवार आठवतो. त्यावेळीं मी शाळेंतील विद्यार्थी होतों व मला कोट शिवायचे होते. आमचा एक हौशी नोकर मला मार्केटांत घेऊन गेला आणि मी पन्नास पन्नास रुपये किंमतीचे दोन कोट शिवले. श्रीमान् आईबापांचा मी एकुलता एक मुलगा. लक्ष्मी दोन्ही हातांनी पाणी भरतेय अशी स्थिति. पण ते उंची कोट पाहून माझे वडील माझ्यावर फार रागावले. ते म्हणाले, " अजून तूं कॉलेजमध्यें सुद्धां गेला नाहींस—आणि हे नसते ढंग कशाला! शाळेंत जाणाऱ्या मुलाला पन्नास रुपयांच्या कोटाची काय गरज? हीं भिकेचीं लक्षणं आहेत. जेव्हां मोठे व्हाल, स्वतः कर्तबगारीच्या क्षेत्रांत पडाल, तेव्हां अल्ली चैन केलीत तर कोणी कांहीं बोलणार नाहीं."

माझ्या वडिलांचे ते शब्द अजून माझ्या कानांत घुमतात. आयुष्यभर मी त्यांची शिकवण विसरलों नाहीं. त्यामुळें पुढील आयुष्यांत धंद्याचीं सूत्रें जेव्हां माझ्या हातीं आलीं तेव्हांहि संपत्तीची नशा मला कधींच चढली नाहीं, आणि पैसा जेव्हां मला सोडून गेला तेव्हांहि मला कसलेंच दुःख झालं नाहीं.

याचं मुख्य कारण म्हणजे लहानपणापासून माझ्या अंगी बाणलेली खिळाडू वृत्ति. याचं खरं श्रेय माझ्या वडिलांना दिलं पाहिजे. माझी शरीरप्रकृति चांगली असल्यामुळें त्यांनीं शाळेंत असतांनाच मला हिंदु जिमखान्यांत दाखल केलें. त्या काळांत अमरनाथ, नायडू, यांच्यासारख्या आंतरराष्ट्रीय कीर्तीच्या खेळाडूंचा परिचय झाला आणि त्याचें रूपांतर पुढें स्नेहांत झालें. मला क्रिकेटची सुरुवातच आवड पुढें आमची एक छोटी टीम घेऊन मी रत्नागिरी जिल्ह्याचा दौरा काढला होता. तेव्हां बरोबर अमरनाथला नेलं होतं. एक दिवस माझ्या मित्रानें सहज बोलतां बोलतां मला क्रिकेट सोडून बॅडमिंटन टेनीसप्रमाणे खेळ खेळणं येणं अशक्य आहे असें मत प्रकट केलें. तेव्हां मी जिद्दीनें बॅडमिंटन आणि टेनीस खेळू लागलों. शेवटीं बॅडमिंटनचा मला एवढा नाद लागला कीं त्या खेळांतील उत्तमोत्तम खेळाडूंशींहि माझा स्नेह जमला. पुढें एक वर्ष देवेंद्रमोहन आणि प्रकाशनाथ यांच्यासारख्या खेळाडूंना स्वखर्चानें परदेशीं पाठविण्याची संधि मला मिळाली आणि परदेशांतहि भारतीय बॅडमिंटन खेळाडूंच्या खेळाला कांहीं विशिष्ट दर्जा आहे ही गोष्ट सिद्ध झाली.

या निवेदनांत कदाचित् आत्मप्रौढीचा वास येईल. पण हें विस्तारानें अशासाठीं लिहिलें, कीं या कालखंडांत मी क्रीडाजीवनांत पूर्ण तन्मय झालों. माझ्या रक्तांत खेळ सर्वस्वी भिनलेला खेळांत जशी हारजीत होते, तशी आयुष्याच्या क्रीडांगणांतहि हारजीत होते. पण मी कांहींशा अभिमानानें सांगूं शकेन कीं मी व्यसनांत पैसा मुळींच घालवला नाहीं. व्यसनांत मी कधींच बुडालों नाहीं. त्यांपासून सदैव सावध राहिलों. मद्यपान केलें, पण त्याचा अतिरेक केला नाहीं. त्याची लज्जत घालवली नाहीं. धूम्रपान मी सातत्यानेंहि केलें आहे, तर केव्हां निश्चयानें दिवसानुदिवस सिगारेटला स्पर्शहि केलेला नाहीं.

मी वायदेबाजारांत पैसा मिळवला, तसा घालवलाहि; पण ज्या दिवसापासून मी माझ्या मनाशीं निश्चय केला, कीं बस्स, आजपासून सट्टा-कशाचाच खेळायचा नाहीं, त्या दिवसापासून वायदेबाजाराचा मोह अजिबात






टाळला. एकदां मी एक बॅडमिंटनची मॅच खेळत होतों. त्या मॅचच्या सुरुवातीपासून वायदेबाजारांतील व्यवहार माझ्या विरुद्ध जात होते. कांहीं तासाभरांतच मार्केट जर आपल्या विरुद्ध गेलें, तर आपले बरेच पैसे जाणार, याची खात्री होती. पण त्यामुळें माझ्या मॅचवर कांहीं परिणाम झाला नाहीं.

मी एकदांहि रेस खेळलों नाहीं ही गोष्ट आश्चर्यजनक पण सत्य आहे. मांझ्या वाडवडिलांची सढळ हातानें देण्यग्या देण्याची परंपरा मी कायम ठेवली. नव्हे, ती चालू ठेवणं माझं पवित्र कर्तव्य होतं. टोपीवाल्यांच्या या वृत्तीमुळें महाराष्ट्रांतील —विशेषतः कोंकणविभागांतील—शिक्षणक्षेत्र उजळलं. तें कसं उजळलं हें विस्तारानें सांगायला गेलों तर विनयातिक्रमाचा दोष पदरीं येईल म्हणून नको.

मग अशा निश्चयी, कणखर, व्यसनापासून अलिप्त अशा व्यक्तीचे पैसे गेले कसे, असा प्रश्न अनेकांना पडतो. या प्रश्नाचं जाहीर आणि सविस्तर उत्तर देणं इष्टहि नाहीं आणि उचितहि नाहीं. त्याचं थोडक्यांत उत्तर असं कीं, माणसांबाबतचे माझे आडाखे चुकले. मी माझी कंपनी आणि धंदा यांची गणना एका कुटुंबासारखी केली. आणि त्यांतील घटकांना कुटुंबियांप्रमाणें वागवलं. त्यांना त्यांच्या इतमामाला साजेसं वेतन दिलें. सवलती दिल्या. या घटकांनींहि आपणहि अशा थोर संस्थेचे घटक म्हणून जिद्दीनें कष्ट करावे अशी माझी अपेक्षा. आणि त्यांच्यावर मी विश्वास टाकला. हा विश्वास टाकतांना माझ्या ज्या अपेक्षा होत्या त्या अपेक्षा सफल झाल्या नाहींत. उतारावरून गाडी घसरली. आणि एकदां घसरल्यावर तें माझ्या नंतर ध्यानीं येऊनहि पुढचा 'अपघात' मला टाळतां येणं अशक्य होतं. आणि तसंच घडलं.

मात्र या अपयशाच्या कालखंडांत मला एक अनुभव आला तो नमूद करण्याचा मोह आवरत नाहीं. आपण वैभवाच्या शिखरावर असतांना–अशा सुस्थितींत असतांना आपले आप्तस्वकीय अथवा नातेवाईक यांच्यासाठीं कांहींहि केलं तरी ही मंडळी आपण जें करतोंय तें तें स्वार्थी हेतूनें अगर कर्तव्य म्हणून करीत आहोंत अशा भावनेनें त्याच्याकडे पाहात असतात. अर्थात् आपले हे आचार त्यांच्या मनासारखे असतील तोंपर्यंत सारं ठीक असतं. पण यांत त्यांच्या मनाविरुद्ध कांहीं घडतंय असं त्यांना वाटलं तर तें आपण मुद्दाम केलं अशा दृष्टीनें ते त्याच्याकडे पाहूं लागतात. त्याउलट एखाद्या मध्यस्थाशीं आपण सहानुभूतीचे चार शब्द जरी बोललों तरी त्याला त्याबद्दल केवढी कृतज्ञता वाटते...! आणि जर का त्याचं आपलं पटलं नाहीं तर त्याचे नी आपले मार्ग निराळे असल्यामुळें त्याचा आपल्याला तसा उपसर्ग होत नाहीं. पण स्वकीयांचं तसं नाहीं. त्यांना टाळणं शक्य नसल्यामुळें त्यांच्याकडून होणाऱ्या अपमानाचे आणि अवहेलनेचे प्रसंग आले तरी ते सहन करावे लागतात.

पण आमचं वालावलीचं जागृत देवस्थान श्रीनारायण आणि माझ्या वाडवडिलांची पूर्वपुण्याई माझ्या मागें आहे अशी माझी श्रद्धा होती. आणि त्यामुळें विपत्तीच्या शिखरावर असतांना माझं मन विचलित झालं नाहीं. आणि त्यामुळेंच मी आज यांतून मुक्त झालों आहे.

After all life is a game of chance! या आयुष्याच्या क्रीडांगणावर कांहीं अल्पकालच का होईना पण नेत्रदीपक खेळ खेळून मी आउट झालोंय. तो कां आउट झालों याची चिकित्सा मी करीत नाहीं. या संदर्भात मला विजय मर्चंट आणि रांगणेकर यांचा खेळ आठवतो. २५० धांवा काढून मर्चंट आउट झाला तरं हि आपण अशा बॉलला आउट व्हायला नको होतं अशी हळहळ मर्चंटच्या मनाला लागते पण सेंचुरी काढो अगर पहिल्याच बॉलला आऊट होवो रांगणेकर कधींच हळहळत नाहीं. प्रेक्षकांचा निरोप घेतांना त्याच्या चेहऱ्यावरलं निर्भर हास्य कधींच मावळत नाहीं.

त्यामुळें आयुष्याकडे मागें वळून पाहातांना मला फारशी खंत वाटत नाहीं. अपयशाची फारशी चिकित्सा मी करीत नाहीं. कारण माझ्यापाशीं आणखी एक मोठं समाधान आहे अन् तें म्हणजे माझ्या कल्पनेप्रमाणें तरी मी कुणाचं नुकसान, विश्वासघात आणि तसं कांहीं अपकृत्य केलेलं नाहीं. आणि हें समाधान का कमी मोलाचं आहे?



# मी, संयुक्त महाराष्ट्राचा पहिला प्रचारक !

—प्रबोधनकार ठाकरे

प्रबोधनकार ठाकरे म्हणजे एक खणखणीत आणि फटकळ व्यक्तिमत्व. महाराष्ट्राच्या समाजकारणांत सदैव आघाडीवर राहाणाऱ्या ठाकऱ्यांची वाणी आणि लेखणी तितकीच ज्वलंत आणि निर्भीड.

माझ्या जीवनांतलीं कधींहि न सुटणारीं व्यसनें दोन. एक, महाराष्ट्राचा दुर्दम्य अभिमान आणि दुसरें, तपकिरीची चिमूट. दुसऱ्या व्यसनाबद्दल घरादारांतली फारशी कोणाची तक्रार नसली, तरी पहिल्या व्यसनाबद्दल गेल्या पन्नास वर्षांत मला फारसें कोणी बरें म्हटलेलें नाहीं. तसें म्हटलें, तर पिंडानें मी समाज-सुधारणावादी. या वादाचीं मूलतत्त्वें मी पुस्तकांवरून शिकलों नाहीं. प्रत्यक्ष निरीक्षण आणि अनुभवांच्या काळीजतोड्या दंशांनीं मला तो ध्यास लागला. या क्षेत्रांतहि सामाजिक अन्यायांचा, विषमतेचा आणि क्रूरतेचा निषेध धिक्कार करतांना, वरचेवर मला प्रतिकारांचे, शिव्याशापांचे आणि बहिष्कारांचे प्रहार सहन करावे लागले. त्या कथांचा संग्रह माझ्याजवळ रगड आहे. माझी गुरुपरंपराहि माझ्या पिंडाला अनुरूप अशीच लाभली. विद्यार्थी दशेंतच सरदार लोकहितवादी यांच्या शतपत्र दि ग्रंथांचा स्वाध्याय आणि आगरकरांचे लेख व ‘सुधारक’ साप्ताहिक यांचें नियमित वाचन मनन नि पठण माझ्या मातोश्रीनें करून घेतल्यामुळें, कोंवळ्या वयांतच चारित्र्याला नि विचारांना एक निश्चित बैठक लाभली. तशांत पुढें ‘केरळ-कोकिळ’ मासिकाचे एडिटर ‘महाराष्ट्र-भाषा-चित्रमयुर’ कृष्णाजी नारायण ऊर्फ दादा आठल्ये यांचा एक तपाचा सहवास लाभल्यामुळें, ‘निस्पृहस्य तृणं जगत्’ चा स्वभावाला भक्कम पीळ पडला.

वयाच्या सोळाव्या वर्षी देवास येथील व्हिक्टोरिया हायस्कुलांत शिकत असतांना, माझे आजोबा कै. राजारामपंत गडकरी, वकील, यांनीं महाराष्ट्राभिमानाचें पहिलें जबरदस्त इंजेक्शन दिलें. या साऱ्या प्राथमिक आणि निकट-सहवासी गुरुजनांच्या निस्पृह आणि बेडर चारित्र्याचा ठसा माझ्या जीवनांत खोल उमटला, तो अद्यापि कायम शिरजोर आहे. कोणत्याहि विषयाबद्दल कोणाचीं कांहींहि मतें असलीं तरी त्यांना यत्किंचित्‌हि न भाळतां सहजासहजीं त्यांच्या पचनीं न पडतां, स्वतंत्रपणें विचार करून, जें मला वाटतें, त्यालाच अखेरपर्यंत चिकटून राहण्याचा माझा स्वभाव बनल्यामुळें, आजवर मी एकाहि संस्थेचा, संघाचा, संप्रदायाचा अथवा पक्षांचा पाईक अथवा नाईक झालों नाहीं.

देशांत मोठमोठी आंदोलनें झालीं. चळवळी झाल्या. मोठमोठे पुढारी चमकले. लाखो लोक त्यांच्या भजनीं लागले. माझ्या सद्‌सद्विवेक बुद्धीला त्यांतला जेवढा भाग पटायचा, तेवढा मला मान्य असायचा. बाकीच्याबद्दल बेडरपणें मी धिक्कार करायचा. एकच आठवण सांगतो. १९२१ सालीं गांधीजींची असहकारी चळवळ चालू झाली. नाक्या-नाक्यावर मिठाचा सत्याग्रह आणि विलायती कापडांच्या होळ्या होत होत्या. सारी जनता एकदिल, एकजीव होऊन त्यांत रात्रंदिवस श्रमत, कष्टत होती. सारी मुंबई खादीनें आरपार पांढरीफेक मढविली गेली

होती. महाराष्ट्र आणि मराठे त्या काळीं राजकारणांत मागे पडून, अहमदाबादी पुंजीपति नि त्यांचे तागडीतुकाप्पा सहप्रवासी, भारताचा उद्धार करायला सामान्यांच्या खांद्याला खांदा लावून लढा देत होते. अशा वेळीं विरोधी ब्र काढण्याची कोणाचीहि शहामत नव्हती. खुद्द लोकमान्यांचे बोलके चेलेसुद्धां मूग गिळून बसले होते. त्या आंदोलनाच्या कांटेकोर निरीक्षण परीक्षणानंतर **प्रबोधन** पाक्षिकाच्या १६ **नोव्हेंबर १९२१** च्या अंकांत : “**गांधीजींच्या खटाटोपानें चुकूनमाकून मिळणारें स्वराज्य म्हणजे मूठभर मोठ्या माशांना बाकीच्या अनंत मासोळ्यांना बिनपरवाना गिळण्याचा राजरोस सनदपट्टाच ठरणार आहे.**” असे स्पष्टोद्गार काढतांच, माझ्या कित्येक निकटवर्ति स्नेह्यांनीहि ‘प्रबोधन’ वाचण्याचें बंद केलें. प्रत्यक्षानुभवानें पुढें त्यांना विवेक सुचला, ही गोष्ट न्यारी. चालू घडीला जें दिसत आहे, त्यावरून तरी इतक्या वर्षांनीं माझा कयास अचूक बिनचूक होता, याची जनतेला खात्री पटो वा न पटो, माझ्या समाधानाची किंमत मीच जाणतों.

राजकारणांत काय किंवा समाजकारणांत काय, खरी वस्तुस्थिति लिहूं बोलूं नका, बोलायची असेल तर आडपडद्यानें हळूच बोला, असा दण्डक असलेला आढळतो. आजवर मला हा सिद्धान्त पटला नाहीं आणि परवडलाहि नाहीं. जें लिहायचें बोलायचें, तें खूप विचार करून, जुन्या नव्या अनुभवांच्या दगडांवर कसाला लावून, स्पष्ट लिहिणार बोलणार. कोणी कितीहि छोटा मोठा असला तरी त्याची बिलकूल पर्वा करणार नाहीं, हा माझा खाक्या. या बाबतींत माझी आणि भालाकार भाऊसाहेब भोपटकर यांचें सांटेंलोटें छान जमायचें. अस्ली वृत्ति समाजांत ‘मुर्दाड’ म्हणून समजली जाते.

मागासल्यांनीं साक्षर सुशिक्षित व्हावें आणि अस्पृश्यांना आपण माणुसकीनें वागवावें, या दोनच हेतूंनीं मी ब्राह्मणेतर चळवळींत हिरिरीचा भाग घेतला होता. त्याचा परिणाम काय झाला? तर म्हणे, ठाकरे ब्राह्मणद्वेष्टे! कां? त्या काळीं वर्तमानपत्रांची शक्ति एकमेव हातांत असलेल्या ब्राह्मण क़लमकसायांना वरचेवर मी त्यांच्या ब्राह्मण्याभिमानाच्या फाजील नाळगुदाला ठोकरा देत होतो. ब्राह्मणी प्रतिकाराची शीग कमाल वाढली असतां, “हिंदूंचें प्रेत हिंदूंच्या खांद्यावर जाईल इतके तरी ब्राह्मण्य शिल्लक ठेवा.” असा इशारा एकदां मला द्यावा लागला. एक नवलाचा चमत्कार म्हणजे, त्या वेळीं काय किंवा आतां काय, माझ्या अवतिभवति जिवाला जीव देणाऱ्या ब्राह्मण स्नेहीजनांचाच गराडा अखंड पडलेला असतो. स्वजातियांचा किंवा इतर कोणाचा मुळींच नसतो.

ब्राह्मणेतरी चळवळींत जेव्हां मला आढळून आलें कीं ब्रामणतर म्हणजे आम्ही फक्त वरघाटी मराठे, सरकारी नोकऱ्या अधिकार सारे आम्हालाच मिळाले पाहिजेत, अशा दंभाने चळवळीचे नेते भडकले, तेव्हा त्यानाहि खर-








पूस चमकावून, मी त्यांचा संबंध सोडला. त्या चळवळींत अस्पृश्यांचा उपयोग केवळ निवडणुकांच्या मतदानापुरताच ब्राह्मणेतर करतात, नंतर त्यांच्या उद्धारासाठीं लेक्चरबाजीपेक्षां फारसे कांही करीत नाहींत, असा अनुभव आला तेव्हा १९२३ च्या निवडणुकीच्या हंगामात सातारा रोड (पाडळी) येथें वृद्ध खानबहादुर कूपरच्या छावणींत असतांना, "अस्पृश्यांनो, स्पृश्यांपासून सावध रहा" असा लेख लिहिला. मग हो काय विचारता! सगळ्या ब्रामणेतरी पुढाऱ्यांनीं, 'ठाकरे आपले नव्हत हो आपले नव्हत" असा जोरदार पुकारा केला.

माझ्या संयुक्त महाराष्ट्रवादाबद्दल हीच कहाणी. महाराष्ट्राचेंच काय, सर्व प्रांतांचीं भाषिक स्व-राज्यें झालीं पाहिजेत,. महाराष्ट्राचें मऱ्हाठभाषी राज्य झालें पाहिजे, तीन भाषी मिसळीचा मुंबई इलाखा तीन भाषावार राज्यांत विभागला गेला पाहिजे, अशी ज्या काळीं लेखन भाषणांत मी-हाकाटी करीत असे, तेव्हां आजकालचे एकजात सारे संयुक्त महाराष्ट्रवादी महाजन "हिंदुस्थान एक राष्ट्र" मानून अखिल भारतीयत्वाच्या दिमाखांत मश्गुल वावरत होते आणि "संकुचित एकांडा प्रांतीयवादी" म्हणून माझी मनसोक्त टर टिंगल करीत होते. 'ठाकरे आजहि आबासाहेबाच्या (शिवाजीच्या) काळांत वावरत असतात" असा माझे एक 'प्रेस्टिज' स्नेही बकवा करीत असतात. काय म्हणे, ता. १० मे १९४६ ला बेळगांवच्या मऱ्हाठी साहित्य संमेलनांत संयुक्त महाराष्ट्राच्या संकल्पाचा प्रथम जन्म झाला. लेखीच पुरावा द्यायचा तर त्याच्या आधीं ९ वर्षें मुंबईच्या **'प्रतोद'** साप्ताहिकांत **१४-२१ नोव्हेंबर १९३७ च्या** अंकांत **प्रांतिक स्वायत्ततेची चिकित्सा** हे दोन अग्रलेख लिहून मी केलेला शंखध्वनि गेला विस्मरणाच्या कचरापेटींत. त्यावेळींहि पक्षीय बजबजपुरीचा निषेध करून "शुद्ध महाराष्ट्रीय पक्षाची आवश्यकता" मी अट्टाहासानें लोकांपुढें मांडली. सं. म. समिति हा एकच एक महाराष्ट्रवाद्यांचा पक्ष व्हावा, या सध्याच्या माझ्या आग्रहाचा पाया १९२७ सालाइतका जुना आणि ठाशीव आहे. नवथर नव्हे. (१) उत्तर भारतीय कांग्रेसवाले मराठ्यांची जूट फोडण्याचे प्रयत्न गेली वीस वर्षे करीत आहेत आणि (२) भाषावार प्रांतरचनेचा प्रश्न प्रथम घसाला



लावून, त्या त्या राष्ट्राचा (म्ह० प्रांताचा) स्वतंत्र स्वायत्त घटक बनविला पाहिजे. ..... मऱ्हाठ्यांचा 'महाराष्ट्र' गुजराथ्यांचा 'सौराष्ट्र' आणि कन्नड मातवाल्याचा 'कर्नाटक' एकभाषी एकजिनसी घटकसंघ बनविले पाहिजेत. " याच लेखांतला शेवटचा भाग येथें उद्धृत करून हा लेख मी संपवितो.

**" अशी राष्ट्रीय स्वायत्तता लाभल्याशिवाय अखिल भारतीय सर्वांगीण क्रांतीच्या युद्धांत प्रत्येकाला मोकळ्या मनानें भाग घेतां येणार नाहीं. गुजराथ्यांनीं मंत्र म्हणावे नि मऱ्हाठ्यांनीं पाणी सोडावे, कानड्यांनीं शुद्धलेखन सांगावे नि मऱ्हाठ्यांनीं तें निमूटपणें काढावे आणि उत्तरी पंडितजींनी 'अमुक पानावर मुकाट्यानें बसा' असा हुकूम सोडावा आणि मऱ्हाठ्यांनीं खालीं माना घालून मिटल्या तोंडीं घास गिळावे, ही शिराळशेटी यापुढें साफ कोणी जुमानणार नाहीं. "**

शेवटीं, " हिंदुस्थान हे एक राष्ट्र आहे " आणि " हिंदुस्थान हिंदुओंका, नहीं किसीके बापका " या सोवळ्या घोषणांचाहि माझ्या विवेकाच्या दरबारांत कवडीचाहि भाव नाहीं, एवढें लिहून दीपावलीच्या रसिक वाचकांची रजा घेतों.



# केवळ नाइलाजानें लेखक झालों

— दत्तू बांदेकर

महाराष्ट्राचे एक लोकप्रिय विनोदी लेखक. त्यांच्या आकस्मिक निधनानंतर आचार्य अत्र्यांनीं त्यांचें 'कारुण्याचा विनोद शाहीर' असें जें वर्णन केलें तें यथार्थ !

**मी** एक उत्तम विनोदी लेखक आहे असा माझ्याबद्दल अनेकांचा गैरसमज झालेला आहे. अनेक वेळां कांहीं लोकांनीं माझे लेख मलाच वाचून दाखवून बेफाम हास्याचें प्रदर्शन केलें आहे. अर्थात् त्यामुळें मी विनोदी लेखक आहे यावर माझा विश्वास बसला नाहींच. पण माझ्या मित्रांनीं विनोदी लेखक म्हणून माझ्यावर जो शिक्का मारलाय तो पुसला जाणें शक्य नाहीं अशी माझी खात्री झालो. एकदां कानफाट्या नांव पडलं कीं तो जन्मभर कानफाट्याच, त्या प्रमाणें माझ्या विनोदी लेखनाचें झालें आहे. आतां मी कितीहि भयंकर आणि रटाळ लेख लिहिले आणि कितीहि गंभीर चेहरा केला तरी लोक तो एक विनोदाचाच प्रकार मानणार अशी माझी खात्री आहे.

लेखक माणसाबद्दल असा एक गैरसमज असतो. मुलाचे पाय लहानपणापासून पाळण्यांत दिसतात त्याप्रमाणें लेखकाचेहि पाय (नव्हे हात) लहानपणापासूनच वाङ्मयाच्या पाळण्यांत दिसत असावेत. पण लोकांचा विश्वास बसणार नाहीं कीं लेखक होणें हा माझ्या आयुष्यांतील एक चमत्कार आहे म्हणा किंवा अपघात. माझें बरेंच लिखाण छापून आलें म्हणून मी लेखक बनलों. वास्तविक पाहतां प्रतिभेपेक्षां छापखान्यानें मला लेखक बनविलें. अर्थात् कांहीं लोक आपल्या वाङ्मयक्षेत्रांतील पराक्रमाची सतत जाहिरात करीत असतात, तर कांहीं शहाणे लोक आपण लिहिलेलें विसरून जातात. मलाहि काय लिहिलेंय याची आठवण नसते. आणि यांतच माझ्या सुखी जीवनाचा मंत्र दडलेला आहे.

माझ्या वाङ्मयावरून माझ्याबद्दल लोकांचे बरेच गैरसमज झाले आहेत. प्रथम मी कसा दिसत असेन ? यासाठीं मी उत्सवसमारंभापासून दूर पळतों. असली गर्दी मला पसंत पडत नाहीं.. त्यामुळें सख्याहरी निर्माण करणारा माणूस कसा आहे हें पाहाण्यासाठीं अनेक लोक दूरदूरच्या ठिकाणांहून येऊं लागले. पण माझा एकंदर 'अवतार' पाहून ते घाबरलेत्यांना धक्का बसला. माझ्या दर्शनापेक्षां माझे लेख वाचणें हेंच श्रेयस्कर असें अनेकांना कळून चुकलें. कांहीं 'जादा' मंडळींचा तर्क असा कीं बांदेकर म्हणजे साधी राहाणी आणि उच्च विचारसरणी यांना आदर्श, तर कांहीं समजूतदार,(त्यांच्याच मतें) "खऱ्या कलावंताला कपड्यांचे हो काय ? " असें म्हणूं लागले.

'सख्याहरी' प्रकरणावरून बांदेकर हा एक



अनुक्रमणिका

रंगेल गडी असावा असा अनेकांचा तर्क-अथवा गैरसमज. पण खरंच सांगतों मी गंभीर माणूस आहे. मी ललित लेखक असलों तरी माझ्या जीवनांत नाट्य नाहीं लालित्य नाहीं. माझ्या वाङ्मयांतील ' भानगडी 'पासून मी स्वतः मात्र अलिप्त आहे. मी एक भयंकर रुक्ष आणि अरसिक माणूस आहे. लेखकाचें जीवन वाङ्मयांत पाहायचें हा नियम मला लागू नाहीं. माझें चारित्र्य आणि शील फार चांगलें आहे. पण माझें लिखाण चावट आहे हें कबूल.

आणखी एक गोष्ट सांगतों—मला वाङ्मयाचें मुळींच प्रेम नाहीं. अर्थात् वाङ्मयप्रेमाचा आणि लेखनाचा कांहींच संबंध नाहीं. उलट लेखक म्हणून मिळविलेली कीर्ति कशी जाईल याच्याच खटपटींत मी असतों पण जमत नाहीं. अर्थात् माझ्या लिखाणाचा मला पश्चात्ताप नाहीं. तो लोकांनीं म्हणजे वाचकांनीं अवश्य करावा. मात्र व्यावहारिक दृष्ट्या मला फार पश्चात्ताप होतोय. या वेड्या लेखनानें माझी शांति ढळली. लेखन ही मला मानसिक विवंचना झालीय ! या भलत्या उपद्व्यापांत बारा वर्षें व्यर्थ घालविल्याबद्दल मला फार हळहळ वाटते. माझे शेंकडों लेख आठवले ( मुद्दाम ) म्हणजे झाल्या गाढवपणाबद्दल स्वतःचीच लाज वाटते.

आणखी एक गंमत सांगतों. स्फूर्ति नामक कोण्या वस्तूशी माझी ओळखहि नाहीं. प्रतिभा तर कांहींच नाहीं. या दोन गोष्टींशीं फारकत करून माझी ही नसती उठाठेव चाललीय आणि ती लोकांना पसंत आहे. आणि यांतच माझ्या यशाचें रहस्य. पण या भलत्या उपद्व्यापामुळें माझें डोकें साफ कामांतून गेलें आहे. त्यामुळें लिहितांना माझा तोल सुटतो—पाल्हाळ येतो.—कदाचित् त्यामुळेंच विनोद निर्माण होत असावा.

मात्र या लेखनव्यवसायापासून अजूनहि मी शहाणपणा शिकलों नाहीं. या भानगडींत मी एक तप घालवलें आणि न जाणों आणखी एकादें तप जातें कीं काय !—

त्यामुळें एकदां जो उद्योग पत्करला, तो अखेरपर्यंत चालू ठेवण्याखेरीज गत्यंतर नाहीं. कारण आतां दुसरे कोणतेहिं धंदे करण्याची माझी पात्रता उरलेली नाहीं.

अर्थात् माझा हा लेख म्हणजेच 'विनोद' आहे, असा गैरसमज दीपावलीचे वाचक करून घेणार नाहींत, अशी आशा आहे. खरोखर मी अगदीं गंभीरपणें आणि विचारपूर्वक लिहिलेला आहे. त्यांत विनोद औषधालासुद्धां नाहीं.

# जबाबदारीच्या ओझ्याखालीं केवळ चमकदार खेळतां येत नाहीं



—पॉली उमरीगर

पॉली उमरीगर म्हणजे भारतीय क्रिकेटमधील एक श्रेष्ठ खेळाडू हजारे यांच्यानंतर भारतीय संघाची खरी मदार यांच्याच तडफदार फलंदाजीवर. उमदी वृत्ति, आदर्श संघनिष्ठा आणि देवभक्तीपेक्षांहि ज्वलंत असें क्रिकेट प्रेम.

"तुम्हांला वेगवान् चेंडूचा एवढा बाऊ कां वाटतो ?" अनेक लोक हल्लीं हा प्रश्न विचारतात. मला असें विचारण्यांत आलेलें आहे कीं, "तुम्ही वेगवान् गोलंदाजीला खेळतांना इतके अस्वस्थ कां होतां ?"

पहिली गोष्ट अशी आहे कीं, वेगवान् गोलंदाजी कोणालाहि मनापासून आवडत नाहीं. वेस्ट इंडीजच्या फ्रँक वॉरेलनेंसुद्धां माझ्याजवळ ही नापसंती मोकळ्या मनानें बोलून दाखविली आहे. तुफान वेगाचे चेंडू उत्कृष्ट फलंदाजालाहि टोलवणें जड जातें. अगदीं ताजें उदाहरण द्यायचें तर एवढा बलाढ्य एम्. सी. सी. चा संघ, पण त्यांनाहि ऑस्ट्रेलियाच्या मेकिफ, डेव्हिडसन किंवा रोर्क या वेगाच्या गोलंदाजांपुढें काय स्थिति झाली ! इंग्लिश फलंदाजांना

तर या गोलंदाजीची नित्याची सवय, पण त्यांनाहि तें जड गेलें.

क्रिकेटच्या कोणत्याहि जाणत्या व्यक्तीला एक गोष्ट कबूल करावी लागेल, कीं अचूक माऱ्याचे आणि विलक्षण वेगाचे चेंडू सहजपणें टोलवीत जाणें जोखमीचें असतें. मागच्या 'लेगट्रॅप'चा धोकाहि लक्षांत घ्यावा लागतो. चेंडूचा अंदाज यत्किंचित् हुकला, आणि बॅटीच्या टोकाला निसटता लागून उडाला कीं तो घेण्यासाठीं मागच्या बाजूला क्षेत्ररक्षकांचें कडें अगदीं टपून असतें. त्यामुळें फलंदाजावर फार मोठें दडपण येतें; मनावर फार मोठा ताण पडतो; आणि या मनःस्थितींतच बऱ्याच वेळां फलंदाज चूक करतो. ह्या चुकीला क्षमा नसते. इंग्लंडमध्यें माझें बऱ्याच वेळा असें झालें.

या गोलंदाजीची भरपूर सवय असूनसुद्धां मोठमोठे फलंदाज या चेंडूंना लवकर बळी पडतात. आमची स्थिति तर या बाबतींत फार वेगळी आहे. आपल्याकडे उत्तम वेगाचे गोलंदाज नसल्यामुळें आपल्या ती अंगवळणीं पडत नाहीं, आणि प्रतिस्पर्ध्यांच्या फलंदाजांनाहि तिचा धाक आपणांला दाखवतां येत नाहीं. असें दुहेरी नुकसान होतें. नेहमींची सवय नसल्यामुळें बहुतेक कसोटीच्या वेळींच जास्त वेगाशीं आमची गांठ पडते. हा निचें पाहिलें तर, गेल्या दोन मोसमांतच आम्हांला या गोलंदाजीला तोंड देण्याची चांगली संधि मिळाली. त्यामुळें बऱ्याच वेळां वेगाच्या माऱ्यापुढें टिकून राहणें, ही गोलंदाजी अंगवळणीं पाडणें यांतच सुरुवातीचा उत्साह जातो. हे चेंडू दूर ठेवणें किंवा ढकलणें (Push) हेंच काम होऊन बसतें, आणि चेंडू टोलवणें किंवा फटकावणें कठीण होऊन बसतें. प्रतिस्पर्धी या परिस्थितीचा चांगला फायदा घेतात.

आरंभीं तीन गोलंदाजांच्या वेगाच्या माऱ्याखालीं दडपून गेल्यामुळें मध्येंच मिळणाऱ्या कमी वेगाच्या चारपांच ओव्हर्स खेळतांनाहि मानसिक दडपण एकाएकीं सैल पडत नाहीं. इंग्लंडमध्यें पहिल्या तीन कसोटी सामन्यांत मी फार लवकर गेलों. एकांत तर वीस धावा जमवून सेट झाल्यावर गेलों. मॅंचेस्टरच्या चौथ्या कसोटी सामन्यांत मात्र सर्व प्रतिकूल परिस्थितीवर मात करण्यांत यश मिळालें. बेग आणि मी आत्मविश्वासानें खेळायला लागल्यानंतर इंग्लंडच्या गोलंदाजांनी आपल्या वेगाच्या तोफा काढून घेतल्या. तिथें मिळालेला हा आत्मविश्वास शेवटच्या कसोटी सामन्यांत वाढवायला संधि मिळाली नाहीं.

पक्का आत्मविश्वास हें अत्यंत मोलाचें साधन आहे. त्याशिवाय खेळाला चांगली सुरुवात होऊं शकत नाहीं. विनसंवयीचे घोकेबाज वेगाचे चेंडू येऊं लागले, कीं हा आत्मविश्वास मुळांतच कमी होतो. असा आत्मविश्वास नसतांना खेळ चांगला कसा होणार? या गोलंदाजीची वर्षानुवर्षें सतत संवय असल्याशिवाय ती पक्की अंगवळणीं पडल्याशिवाय आत्मविश्वासानें खेळणारे फलंदाज निर्माण होणार नाहींत. आज आपली सर्वांत मोठी ही उणीव आहे आणि त्यामुळें फार नुकसान होत आहे.

आज आपल्या नव्या फलंदाजांची हीच मुख्य अडचण आहे चुकीच्या खेळावर टीका करणें योग्य आहे; पण प्रत्येक बाबीच्या मागची पार्श्वभूमि सर्व बाजूंनीं ध्यानांत घेतली पाहिजे.







अनुक्रमणिका

नव्यांनें पुढें येणाऱ्या आपल्या फलंदाजांना वेगवान गोलंदाजीचा सतत सराव मिळाला, तर त्यांचा खेळ जास्त खात्रीचा आणि चमकदार होत जाईल. बापू नाडकर्णी यांनीं इंग्लंडमध्यें दाखविलेली धडाडी आणि आत्मविश्वास लक्षांत घेण्यासारखा आहे. बोर्डेहि छान खेळतो आणि त्याच्याजवळ अशा कल्पनाही आहेत. नव्या फलंदाजांत आघाडीवरचा नरी कॉन्ट्रॅक्टर हा आत्मविश्वासानें आणि निश्चयानें खेळणारा आहे. दोनतीन डावांत सतत संधि मिळाली तर आपटेहि चांगला खेळू शकेल. देसाई–सुरेंद्रनाथ यांची गोलंदाजी चांगली आहे. त्यांच्याजवळ जास्त वेग नाहीं; पण सुरेंद्रनाथ चेंडू स्विंग चांगले करतो. देसाईचे बंपर्स इंग्लंडच्या फलंदाजांनाहि त्रासदायक वाटत होते. बंपर्सबद्दल एक गोष्ट सांगण्यासारखी आहे. इंग्लंडच्या मोठमोठ्या फलंदाजांनाहि ते मानवत नाहींत. कॉलिन काउड्रेसारखा फलंदाजहि देसाईच्या बंपर्सनीं विचलित होऊं शकतो.

सामना जिंकण्याच्या दृष्टीनें क्षेत्ररक्षण हें फार महत्त्वाचें अंग आहे. इंग्लंडमध्यें आमचें ग्राउंड फिल्डिंग चांगलें होत असे. कांहीं झेल आमच्या हातून सुटले हें खरें, पण घेण्यांत आलेले कांहीं झेल निःसंशय कौशल्याचे होते. नाडकर्णी आणि बोर्डे यांनीं अतिशय कठीण असे झेल पकडण्यासाठीं केलेले प्रयत्न कौतुकास्पद होते. आपल्याकडून इतके चांगले प्रयत्न पूर्वी झालेले माझ्या पाहण्यात नाहींत.

आपल्याकडे चांगलें टॅलेंट आहे. नवेंहि तयार होईल. पण मुख्य अडचण वेगवान गोलंदाजीची आहे. आजे आपल्या खेळांत त्यामुळें खरी चमक दिसत नाहीं. फलंदाजी संथ होते ती यामुळेंच. सावकाश धावा जमवीत बसणें कुणालाहि आवडत नाहीं. सुरुवातीसुरुवातीला मी भराभर आणि चौफेर टोल मारून खेळत असें. आता ती चमक दिसत नाहीं म्हणून लोक तक्रार करतात. खरें आहे. पण जबाबदारीचें फार मोठें ओझें मनावर आल्यावर केवळ चमकदार खेळतां येत नाहीं. हजारे यांचेहि पुढें पुढें हेंच झालें.

आतां डिसेंबरमध्यें ऑस्ट्रेलियाचा संघ आमच्या देशांत येणार आहे. त्यांच्याशीं खेळतांना सुद्धा आमच्या बहुतेक अडचणी कायमच आहेत. त्या काहीं एकाएकीं भरून निघणाऱ्या नाहींत. पाकिस्तानमध्यें कसोटी मोसमाच्या आधीं नेमके अठरा-वीस उत्तम प्रतीचे खेळाडू निवडून त्यांना महिनाभर कडक प्रॅक्टिस दिली जाते. आपल्याकडेहिं तसें केलें तर त्याचीं चांगलीं फळें पाहायला मिळतील. ह्या प्रॅक्टिस कॅंपमध्यें खेळाडू एकमेकांजवळ येतात; एकमेकांच्या कमीजास्त उणीवा, लकबी, किंवा वैशिष्ट्यें जवळून अनुभवतां येतात. आणि सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे संघभावनेची वृत्ति निर्माण होते.

ऑस्ट्रेलियन वेगवान् गोलंदाजांचीं कांहीं चलचित्रें (Films) आम्ही इंग्लंडमध्यें पाहायला मिळालीं. मेकिफच्या 'थ्रो अक्शन' साठीं त्या मुद्दाम घेण्यांत आल्या आहेत. गिलख्रिस्टहि थ्रो करतो हें आम्हीं पाहिलें आहे. त्याबद्दल अर्थात् अंपायर काय तें पाहून घेतील. आमच्या दृष्टीनें मेकिफ आणि रोर्क यांचा वेग फार महत्त्वाचा आहे पण इंग्लंडच्या अनुभवाचा फायदा आम्हांला सामन्यांत मिळाल्याशिवाय राहणार नाहीं.

एका मित्रानें आतुरतेनें मला विचारलें, "रोर्क आणि मेकिफ वगैरे लोक गिलख्रिस्ट-हॉलपेक्षां जास्त फास्ट आहेत का?" मी म्हटलें, "अरे आपणाला काय, थोडा जास्त काय नि थोडा कमी काय—मध्यम वेगाच्या वर गेला कीं आपले हाल!"

• •

# भविष्यासाठीं मीं भविष्य लिहीत नाहीं !

**— वसंत लाडोबा म्हापणकर**

हिटलर काय म्हणतो ? या चालीवर दर शनिवारी म्हापणकर काय म्हणतोय, हें वाचायला प्रत्येक महाराष्ट्रीय पूर्वी उत्सुक असे. भविष्यलेखनाचे म्हापणकरांचें स्वतःचे असें खास वैशिष्ट्य ! स्वतःबरोबर मार्मिकचीही ख्याति वाढविली.

'माफ करा हं! माझ्याबद्दल थोडा गैरसमज होतोय!' असं म्हणण्याची पाळी माझ्यावर अनेकदां आली आहे. माझा पहिला फोटो जेव्हां वृत्तपत्रांत प्रसिद्ध झाला त्यावेळीं माझ्या एका मित्राच्या आग्रहावरून मी डोक्यावर पगडी घातली होती,—कां तर मी ज्योतिषासारखा दिसलों पाहिजे म्हणून! पण या फोटोमुळें माझ्या एकंदर आर्थिक स्थितीबद्दल फारच गैरसमज निर्माण झाले. कित्येकांचा असा समज झाला कीं मी अगदीं ख्यालीखुशालीत राहात असून माझ्याकडे बरीच 'माया' असली पाहिजे. माझा स्वतःचा बंगला असून त्यांत माझें ज्योतिषकार्यालय थाटलेलें असावें असाहि अनेकांचा तर्क झाला. पण हा निव्वळ गैरसमज. श्रीमारुतिरायाच्या कृपेनें माझ्याकडे यापैकीं कांहींही नाहीं. हेवा करण्यासारखी माझी प्रसिद्धि असली तरी करुणा आणि कींव करण्यासारखी माझी सांपत्तिक परिस्थिति आहे. इतकंच काय, पण १९३५-३६ सालीं विविधवृत्त साप्ताहिकानें भविष्याविरुद्ध जी मोहीम उघडली त्यावेळीं माझ्या पगडीचा (दुसऱ्याच्या) उद्धार करण्यांत आला होता.

खरं पाहिलं तर माझं ज्योतिषकार्यालय आज अस्तित्वांतच नाहीं. माझी एकांतवासाची जागा आहे तेथें मी लिहायला बसतों. तीहि जागा भाड्याची आहे. मला खुर्चीटेबलाची सवय नसल्यामुळें मी जुन्या पद्धतीनें मांडी मोडून त्यावर 'पुष्टिपत्र' ठेऊन लिहीत बसतों. एका प्रशस्त अशा वृत्तपत्राच्या रद्दीच्या गठ्ठयावर माझें 'आसन' असून आजूबाजूस नाना प्रकारचीं पुस्तकें, वृत्तपत्रें, कात्रणें, कोळिष्टकें असा संच पडलेला असतो. आजुबाजूला झाडी असल्यामुळें अधूनमधून नागराजहि सोबतीला येतात. याशिवाय उंदीर, विंचू, पाली आहेतच. अशा खोलींत सकाळीं ७ वाजल्यापासून दुपारीं २ वाजेपर्यंत मी लिहीत बसलेला असतों.

माझी सांपत्तिक परिस्थिति मला समजूं लागल्यापासून तों आजपावेतों कधींच सुधारलेली नाहीं. मुलाची शाळेची फी सुद्धा वेळेवर दिली जात नाहीं माझीं दोन मुलं बेकार आहेत. पुढील शिक्षण देण्याची ऐपत नाहीं म्हणून त्यांच्या नोकरीसाठीं मी अनेक लोकांची पायधरणी केली तर लोक विचारीत, "तुमच्या





मुलांना कशाला हवी नोकरी ? तुमचा धंदा काय वाईट आहे ! ”

भविष्य लिहिण्यांतच माझा सगळा वेळ खर्च होतो. शिवाय भविष्याला साहित्याचा साज चढवीत असल्यामुळें मला अवांतर वाचन करावें लागतें. ही माझी व्यक्तिशः आवड आहे. यांत वाचकाचा आग्रह असेल असें म्हणवत नाहीं. अर्थात् यामुळेंहि कांहीं गैर-समज होतात. १९५७ सालीं 'धनुर्धारी'मधून प्रसिद्ध झालेल्या वर्षभविष्यांत मी संयुक्त महाराष्ट्राचा प्रश्न हिरीरीनें हाताळला होता. या प्रचारामुळें कांहीं कॉंग्रेसजन रागावले आणि एका साप्ताहिकानें आपल्या तीन चार अंकां-तून मला नानाप्रकारच्या शिव्या दिल्या.

अर्थात् मी कॉंग्रेसचा शत्रू कधींच नव्हतो. पण लहानपणापासून मला महाराष्ट्राचा अभिमान आहे. शिवाजी महाराज हें माझे दवत आणि मराठी भाषा ही माझी आई आहे. त्यामुळें त्याचा अभिमान बाळगल्यामुळें लोक रागावले तर त्याला इलाज नाहीं.

माझ्या भविष्यकथनाच्या पद्धतीबद्दलहि गैर-समज आहेत. साहित्यांत लोकजीवनाचें प्रतिबिंब चालतें तर तें भविष्यांत कां चालूं नये ! मी भविष्यासाठीं भविष्य लिहीत नाहीं; लोकजागृतीसाठींच लिहितो व त्यामुळें माझ्या भविष्यकथनांतील 'साहित्य' हें अपरिहार्य आहे.

९ मे १९५३ सालीं त्यावेळचे मुंबईचे मेयर श्री. स. का. पाटील यांच्या अध्यक्षतेखालीं माझा सत्कार झाला. त्यावेळीं मला दहा हजार रुपयांची थैली अर्पण करावी अशी इच्छा अनेक मित्रांनीं प्रकट केली आणि तसें जाहीरहि कर-ण्यांत आलें. पण प्रत्यक्ष सत्काराच्या वेळां मानपत्र असलेलें चांदीचें कास्केट आणि फुलांचे बारा हार याखेरीज माझ्या हातीं कांहींच आलें नाहीं मालवणला परत आलों तर माझ्या घरीं कांहीं मंडळींची ही गर्दी ! जो तो आशेनें आपलेंच गाऱ्हाणें सांगू लागला. त्यांना वाटलें मी ती १० हजारांची थैली घेऊन आलोंय. पण खरा प्रकार सांगणार कुणाला !

अर्थात् या दारिद्र्याचें मला दुःख नाहीं. कारण पैसा आहे त्याचा नाश ठरलेला आणि तो राखण्यासाठीं काय हाल होतात ते मी पाहिलेय-त्यामुळें मी खरा सुखी आहे.

# मी एक कलंदर माणूस

—रॉय किणीकर



मराठी साहित्यिकांतील एक अद्भुत वल्ली ! प्रतिमा पाक्षिकांतील किणीकरांचें मर्मग्राही लिखाण अजूनहि आठवावें. चित्रपट, नभोवाणी, नियत-कालिकें इ. सर्व आघाड्यांवर किणीकर चमकले, पण कुठेंच स्थिर झाले नाहींत. कारण अस्थिरता हा त्यांचा जीवनाचा कदाचित स्थायीभाव असावा. पण दीपावली आणि किणीकर यांचे फार दिवसाचे संबंध सर्वश्रुत आहेत.

गिरनार पर्वतावर अजूनही मूषकपंचमीचा सण मोठ्या थाटानें साजरा होत असतो. मूषकपंचमीच्या दिवशीं गिरनारचे सिंह त्या पर्वतावरील उंदरांना कडकडून भेटतात, गळामिठी घालतात आणि एकमेकांच्या शेप-ट्यांचे चुंबन घेऊन शुभचिंतन व्यक्त करतात, ही मूषकपंचमी आणि येतें नवें वर्ष तुम्हाला सुखसमृद्धीचें जावो ! विश यू प्रॉस्परस न्यू यीअर ! साल मुबारक !

या मूषकपंचमीची दंतकथा मोठी मनोरंजक आहे. फार प्राचीन काळीं गिरनारच्या एका गुहेंत एक ब्रह्मचारी सिंह रहात असे. त्या गुहेंतच एक लहानसें बीळ होतें. आणि त्या बिळांत एक विवाहित उंदीर रहात असे. शिकारीसाठीं म्हणून सिंह गुहेच्या बाहेर












पडला कीं, उंदीर आपल्या बिळांतून फुटकन् बाहेर येई आणि दिवसभर त्या गुहेंत तंगडीवर तंगडी टाकून मस्त आरामांत पडून राही. संध्याकाळीं गुहेबाहेर सिंहाचीं पावलं वाजलीं कीं, फुटकन् बिळांत तो पुन्हां परत जाई. बिळांत जातांच तो उंदीर आपल्या बायकोपुढें आणि मुलांसमोर नाना तऱ्हेच्या लंब्याचवड्या बाता मारी. एका महत्त्वाच्या कामासाठीं सिंहाबरोबर आपल्याला अलीकडे रानोमाळ कसें भटकावें लागतें, याचें तिखटमीठ लावून तो वर्णन करी. त्यामुळें उंदराच्या मुलांना आपल्या वडिलाविषयीं भलताच आदर वाटूं लागे. कधीं कधीं मुलं म्हणत, बाबा, आम्हाला सिंहकाकाची एखादी गोष्ट सांगा ना. मग हा उंदीर सिंहकाकाची एकेक गोष्ट खुलवून सांगे. गोष्ट सांगून झाली की न चुकतां तो म्हणत असे, या सिंहाला इथले सारे पशू जरी गिरनारचा राजा मानीत असले तरी आपण नाहीं आं त्याला कधीं राजाबिजा म्हणणार ! अरे, लहानपणीं आम्हीं एकमेकांच्या शेपट्या ओढून खेळत होतो, कड्यावरून धडाधड उड्या टाकीत होतो, नाचत होतो, थट्टामस्करी करीत होतो, छट् या सिंहट्याला का मी राजा म्हणीन ! हें बोलणें ऐकून उंदराचीं मुलं गाल फुगवून म्हणत, पहा आपले पप्पा कित्ती मोठे आहेत !

एकदां काय झालें ? एक संपूर्ण आठवडा लोटला, तरी सिंहाची स्वारी कांहीं शिकारीसाठीं गुहेबाहेर पडेना. त्यामुळें उंदराची मोठी पंचाईत झाली. एक–दोन दिवस असेच गेले. एके दिवशीं उंदराच्या बायकोनं विचारलं, आतांशा तुम्ही घरींच असता. सिंहाचं नि तुमचं कांहीं भांडण तर झालं नाहीं ना ? त्यासरशी उंदरानं पुन्हां एक थाप ठोकून दिली– छे छे, कांहीं तरीच तुझं. अग, गेल्या आठवड्यापासून हा सिंह एका विलक्षण संकटांत सांपडला आहे. त्याला त्यांतून कसं वांचवावं, याचा मी अहोरात्र विचार करतो आहे. त्या माउलीला तें खरें वाटलें. पुन्हां दोन दिवस निघून गेले. शेवटीं उंदराच्या बायकोनें वैतागून म्हटलें, अहो, असे तुम्ही इथं पडून राहिलात तर कसं व्हायचं आपलं ? घरात धान्याचा कण नाहीं, मुलं भूक भूक करतात, त्यांना काय खाऊं घालूं ? आतां मात्र उंदराला आपल्या बिळांतून बाहेर पडणें भागच झालें.

बिळांतून बाहेर पडलेल्या उंदराकडे सिंहाचें सहज लक्ष गेलें पण उंदराला घाम फुटला आणि त्याचे पाय लटलटूं लागले. उंदराला वाटलें, हा चांडाळ आपल्यावर झेप घेऊन आपल्याला मटकावणार ! पण तसें कांहीं झालें नाहीं. उलट सिंहानें उंदराला हंसत हंसत विचारलें, इकडं कुठं ! कोण तुम्ही ? वेळ मारून नेण्यासाठीं उंदरानें लगेच उत्तर दिलें, मला आपण ओळखत नाहीं ? मला मूषक पंडित म्हणतात. गिरनारचे बहुतेक सर्व पशुपक्षी माझ्याकडं भविष्य विचारण्यासाठीं येत असतात महाराज ! सिंहाला हंसूं आलें. भविष्यावर त्याचा अजीबात विश्वास नव्हता. पण त्या मूषक पंडिताची जरा मस्करी करावी म्हणून त्यानं विचारलं, मग आज रात्रीं माझ्या आयुष्यांत काय घडणार आहे सांगा पाहूं ? लगेच उंदरानें सिंहाचा डावा, उजवा पंजा आलटून पालटून पाहिला, त्याची आयाळ ओढून मानेवरच्या खाणाखुणा तपासल्या, कान धरून कुठं आंत तीळ दिसतोय का हें पाहिलें आणि नंतर जराशानें कसलासा विचार करून त्यानें एक मोघम थाप ठेवून दिली, महाराज आज रात्रीं आपण एका मोठ्या संकटांतून वांचणार आहांत. प्रेम या शब्दाची लज्जत चाखायला मिळेल ! आपलं एखाद्या सिंहिणीवर प्रेम बसलं आहे काय ? सिंह बिचारा चाट पडला. खरोखरच तो एका सिंहिणीच्या प्रेमांत पडला होता आणि त्या रात्रीं करवंदाच्या जाळींत जाऊन तिला भेटणार होता. उंदरान सांगितलेलं तें भविष्य ऐकून सिंहाला फार आनंद झाला. आनंदाच्या भरांत त्या उंदराला पंजांत धरून त्या सिंहानें उचललें आणि तो त्याचे पटापट मुके घेऊं लागला. योगायोग असा कीं, याच वेळीं उंदराचीं मुलं बिळाच्या तोंडाशीं येऊन लुकलुक बघत होतीं. तो सारा प्रकार पाहून आणि ते सारे संवाद ऐकून तीं मुलं धावतच आपल्या आईकडे गेलीं अन् घडलेली सर्व हकीकत सांगून नाचूं लागलीं, खरंच आपले पप्पा किती मोठे आहेत !

रात्र पडतांच सिंह गुहेबाहेर पडला आणि उंदरानं सुटकेचा निःश्वास टाकला, चला जिवावरचं संकट टळलं, आतां इथं राहण्यांत अर्थ नाहीं. तावडतोब आपलं सगळं बिऱ्हाड घेऊन उंदीर त्या रात्रींच बिळांतून बाहेर पडला आणि वाट फुटेल त्या दिशेनें तो झपाझप चालूं लागला. जातांना वाटेंत त्या उंदराला एक करवंदाची जाळी लागली. जाळीमागून त्याला कुणाचें तरी विव्हळणें ऐकूं आलें. सहज कुतुहलानें त्यानें जाळींत डोकावून पाहिलें आणि त्याला आश्चर्याचा धक्का बसला. पारध्यानें टाकलेल्या जाळ्यांत बिचारा सिंह अडकून पडला होता. आणि जाणाऱ्या येणाऱ्याची मदतीसाठीं याचना करीत होता. उंदराचें मन कळवळलें. रात्रभर बसून यानं तें जाळं आपल्या अणकुचीदार दातांनीं कुरतडून काढलं आणि त्या वनराजाची मुक्तता केली. जाळ्यांत सापडतांच सिंहानें अनेकदां गर्जना केली होती, डरकाळ्या फोडल्या होत्या, गळा काढून तो रडला देखील होता; पण त्याचं जिच्यावर प्रेम होतं ती टवळी सिंहीण कांहीं त्या बाजूला फिरकली नाहीं. त्या घटकेपासून गिरनारच्या सिंहांचा प्रेम या शब्दावरचा विश्वास जो एकदां उडाला तो उडाला आणि तेव्हांपासून गिरनारच्या सिंहांनीं कुठल्या सिंहिणीवर पुन्हां प्रेम केलं नाहीं मग लग्नाची बात तर दूरच राहिली. गिरनारवरच्या सिंहाची अस्सल जात नष्ट होत चालली आहे असें म्हणतात त्याचें कारण ही दंतकथा तर नसेल !

तात्पर्य – ही सिंहाची गोष्ट नसून ही खरी उंदराची गोष्ट आहे. उंदराप्रमाणेंच वेळोवेळीं बाता मारून आपल्या कर्तृत्वशक्तीबद्दल, जवळच्या आप्तनातलगांत आणि मित्रपरिवारांत उगाच गैरसमज निर्माण करणाऱ्या लेखकांपैकीं मी एक आहे असें मला नेहमी वाटत असतें. असें वाटत असतें तेव्हां कधीं कधी रात्रीं मला एक विलक्षण स्वप्न पडतें. एका निळ्याभोर डोहाच्या काठावर करवंदाच्या जाळींत एक सातमजली काळा सिंह अडकून पडला आहे आणि मी माझ्या हातातल्या रबरानें तें जाळें पुसून काढतो आहे असें मला वाटूं लागतें. पण तें जाळं पुसून काढतांच तो सातमजली काळा सिंह माझ्यावर झेप घेऊन मला मटकावणार तर नाहीं ना, अशी मधेंच मला भीती वाटते आणि दचकून मी माझ्या स्वप्नांतून जागा होतो ! अशा वेळीं माझी बायको म्हणते काय झालं ? कसलं स्वप्न का पडलं ? तेव्हां मी म्हणतो, छे, तुझा गैरसमज झाला आहे. माझ्यासारख्या कलंदर माणसाला कधीं स्वप्न पडणं शक्य आहे का ?

● ●








## स्पर्धा कशी सोडवाल ?

या स्पर्धेचें उत्तर निश्चितच आहे. साहित्य-रस स्पर्धेसाठीं आम्हीं मराठींतील अग्रेसर लेखकांची एक मर्यादित यादी प्रसिद्ध केली आहे. बाजूला दिलेलीं विधानें या यादींतीलच लेखकांच्या लिखाणांतून घेतलेले संपूर्ण व स्वयंपूर्ण वाक्यांचे उतारे आहेत प्रत्येक विधानांत शब्दांची एक जोडी दिलेली आहे. त्या जोडीपैकीं एक लेखकाचा मूळ शब्द आहे. तो मूळ शब्द आपण आपली बुद्धि, तारतम्य व अनुभव यांचा उपयोग करून शोधून काढा; आणि प्रवेश-पत्रांत निवडलेला शब्द ठेवून दुसरा शब्द खोडून टाका. अशा प्रकारें ८ शब्द निर्देशित केल्यावर आपलें एक प्रवेशपत्र पूर्ण होईल.

—संपादक

## प्रवेश-फी कशी पाठवाल ?

'साहित्य-रस स्पर्धे' ची प्रवेश-फी पोस्टल स्टॅम्पसच्या रूपानें पाठवूं नये तीं पुढीलपैकीं कोणत्याहि रीतानें पाठवावी.

(१) मनिऑर्डरीनें. (२) इंडियन पोस्टल ऑर्डर्सच्या रूपानें. (३) बँक ड्राफ्टच्या रूपाने अगर (४) साहित्य-रस स्पर्धा रोखीच्या पावत्यांच्या स्वरूपांत.

### टीप

मुंबईत ठिकठिकाणीं व अन्य गांवोगांवीं एजंटस् नेमलेले आहेत. त्यांच्याकडे प्रत्येक स्पर्धेच्या दोन रंगांत छापलेल्या सुबक प्रवेश-पत्रिका व रोखीच्या पावत्या मिळतात. त्यांच्याकडे ठेवलेल्या अधिकृत पेट्यांत आपल्या प्रवेश-पत्रिका भरून टाका.

## एजन्टांसाठीं

(१) रोखीच्या पावत्यांवर ७॥ टक्के कमिशन देण्यांत येतें.

(२) प्रवेश—पत्रिकांवर २५ टक्के.

(३) प्रचार साहित्य मोफत. कमिशनवजा रकम आगाऊ पाठवा. पावत्या व प्रवेश-पत्रिका [illegible] परत करतां येतील.




## साहित्य-रस स्पर्धा क्र. ५३ ची अधिकृत प्रवेश-पत्रिका

पत्ता : साहित्य-रस स्पर्धा क्र. ५३,
६९, शिवाजी पार्क रोड, नं. १, मुंबई २८.

बक्षिसें : रु. २०,००० ] [ अखेरची तारीख २९-१०-५९

**सूचना**—(१) रद्द केलेले शब्द शाईनें खोडून टाका. (२) न भरलेली प्रवेशपत्रें फुली मारून रद्द करा. (३) एकच प्रवेशपत्र भरलेलें असलें तरी ही संपूर्ण प्रवेश-पत्रिका न फाडतां पाठवा. (४) एका स्पर्धकानें ४ पेक्षां अधिक प्रवेशपत्रें पाठवूं नये. (५) एका पत्त्यावरचीं ८ पेक्षां अधिक प्रवेशपत्रें स्वीकारलीं जाणार नाहींत. (६) प्रवेश-फी मनिऑर्डरीनें पाठविली असेल, तर पोस्टाची मनीऑर्डरीची पावती सोबत जोडावी; न जोडल्यास प्रवेश-पत्रिका रद्द होईल. (७) आपलें वय १८ च्या वर असेल, तरच भाग घ्या.

| ① प्रवेश-फी : १ रुपया | | | |
|---|---|---|---|
| १ कळतें | २ कारणा | ३ प्रचार | ४ प्रतिभे |
| मिळतें | मरणा | प्रसार | प्रतिष्ठे |
| | | | ५३ |
| ५ विक्राळ | ६ अहेतुक | ७ बेमालूम | ८ आवडतात |
| विशाल | सहेतुक | बेशरम | सांपडतात |

| ② प्रवेश-फी : १ रुपया | | | |
|---|---|---|---|
| १ कळतें | २ कारणा | ३ प्रचार | ४ प्रतिभे |
| मिळतें | मरणा | प्रसार | प्रतिष्ठे |
| | | | ५३ |
| ५ विक्राळ | ६ अहेतुक | ७ बेमालूम | ८ आवडतात |
| विशाल | सहेतुक | बेशरम | सांपडतात |

| ③ प्रवेश-फी : १ रुपया | | | |
|---|---|---|---|
| १ कळतें | २ कारणा | ३ प्रचार | ४ प्रतिभे |
| मिळतें | मरणा | प्रसार | प्रतिष्ठे |
| | | | ५३ |
| ५ विक्राळ | ६ अहेतुक | ७ बेमालूम | ८ आवडतात |
| विशाल | सहेतुक | बेशरम | सांपडतात |

| ④ प्रवेश-फी : १ रुपया | | | |
|---|---|---|---|
| १ कळतें | २ कारणा | ३ प्रचार | ४ प्रतिभे |
| मिळतें | मरणा | प्रसार | प्रतिष्ठे |
| | | | ५३ |
| ५ विक्राळ | ६ अहेतुक | ७ बेमालूम | ८ आवडतात |
| विशाल | सहेतुक | बेशरम | सांपडतात |

५३

या स्पर्धेत भाग घेतांना मी असें कबूल करतों कीं, माझें वय १८ च्या पुढें असून साहित्य-रस स्पर्धेचे नियम व अटी मला मान्य आहेत व त्या माझ्यावर बंधनकारक आहेत. संपादकांचा अखेरचा निर्णय मी मान्य करीन व तो कायदेशीर आहे असें समजेन.

पूर्ण नांव : ____________________

पत्ता ____________________

____________________

(दीपावली)

प्रत्येक प्रवेश-पत्राची प्रवेश फी १ रुपया आहे. संपूर्ण प्रवेश-पत्रिकेची प्रवेश फी ४ रुपये. जोडलेली म. ऑ. पावती, पोस्टल ऑर्डर अगर साहित्य-रस स्पर्धा रोखीची पावती क्रमांक... ........... पाठविलेली प्रवेश फी : रु...........

**: अखेरची तारीख :**
**गुरुवार २९-१०-५९**

अधिकृत उत्तर
'नवशक्ति' : ३-११-५९

विजेत्यांची संपूर्ण यादी
'नवशक्ति' : ६-११-५९

[टीप : अधिकृत उत्तर व विजेत्यांची संपूर्ण यादी **मराठा,** (मुंबई) **स्वराज्य, केसरी,** (पुणें) **गावकरी,** (नाशिक) व **तरुण भारत** (नागपूर) मध्येंहि प्रसिद्ध होईल.]

# विधानें

[१] ज्ञानमार्गानें सत्य **कळतें. / मिळतें.**

[२] जगांत **कारणा / मरणा** 'शिवाय जर कांहीं असेल, तर प्रेम आहे.

[३] **प्रचार / प्रसार** हें वर्तमानपत्राचें मुख्य अंग आहे.

[४] **प्रतिभे / प्रतिष्ठे** च्या राज्यांत दैवाची सत्ताहि वरीच चालते.

[५] आजच्या कादंबरीकारांपुढील जीवनाचें स्वरूपहि अधिक **विक्राळ / विशाल** व गुंतागुंतीचें होत आहे.

[६] कला ही **अहेतुक / सहेतुक** असत नाहीं.

[७] किती मृगवृत्ति असते या पुरुषाची ! अन् प्रेमाची वतावणी तरी किती **बेमालूम / बेशरम** पणें करतात !

[८] वाङ्मयांत नुसते कवी किंवा नुसते विनोदशील लेखक असे आम्हांला क्वचितच **आवडतात. / सांपडतात.**

नियम, अटी व लेखकांची यादी क्र ५२ प्रमाणेंच. हवी असल्यास पोस्टेज पाठवावें.

( पान १९ वरून चालू )

मी कांहींच बोललो नाहीं. मिट्झी पर्सशी खेळत राहिली. कधींतरी मीही उठलो व टेकडी उतरूं लागलो.

अचानक कांहीं विचार येऊन मी म्हटलं.

" मिट्झी, तुझा नवरा काय करत असेल यावेळीं ?—

" एखाद्या जर्मन मुलीच्या बाहुपाशांत पडला असेल ! "

थांबायचं होतं, पण उतारावरून बराच खाली गेलो. मिट्झी संथपणें आली तेव्हां थक होऊन म्हटलं,

" काय बोलतेस ? कुठे आहे तो ? "

" जर्मनीला ! बर्लीनला नौकरी निमित्त गेला आहे. दोन वर्षे होतील आता. "

" तो तिकडे एकटा आहे, अन् तूं त्याच्याबद्दल असं भलतं—"

" त्यानी पत्रं, फोटो—सारं ह्या पर्समध्यें आहेत—" ती थांबली व दिवा उंचावून उजेड पाडावा तशी पर्स वर करीत स्पष्टपणें म्हणाली, " कृपा करून गैरसमज होऊं देऊं नको. माझं त्याच्यावर फार फार प्रेम आहे. त्यालाही मी फार आवडते. अनेक अडचणीतून आम्ही संसार थाटला आहे...पण मग तो परदेशी गेला नि मी मॉंटरेला नोकरीत करीत राहिले... प्रेम असून, मी असून तो विरह विसरण्यासाठी, एकटेपणा टाळण्यासाठी तिथल्या मुलींशी प्रणयचेष्टा करतो. तो पुरुष आहे, परदेशी आहे म्हणून...म्हणून..."



मिट्झीचे डोळे भरून आले. शमीजवरची निळी माळ उचलून तिनें डोळ्यांना लावली. त्या माळेचं नि आसवांचं कांहीं नातं आहे का ह्याचा विचार करीत मी अर्ध्या वाटेवर अवघडून उभा राहिलो.

" जाऊ दे—" ती पर्सला झोके देत व सावकाश पावलं टाकीत म्हणाली, " तुला हे कशाला सांगूं ?...तुला उगीच ह्यांत ओढलं मी ! "

" छे — छे—"

" छे काय !—माझ्या नवऱ्याला मला शिक्षा करावीसं वाटलं, सातासमुद्रापलिकडे आलेल्या एका परदेशी माणसाला वासनेच्या, प्रणयाच्या वातावरणांत न्यावं ति तडफडत ठेवावं असं वाटलं. तुला हात धरूं दिला नाही, नृत्य करूं दिलं नाही, उगाच रखडवत ठेवलं...उपासमार, उपेक्षा...माझ्या नवऱ्यालाच जणूं शासन घडलं. एक पुरुष, एक परदेशाचा कलंदर जीव मजजवळ आधाशासारखा आला अन् उपाशी राहिला..."

विस्मयानें विद्ध होऊन मी वारंवार थबकूं लागलो. उंच टाचेचे बूट सावकाश उचलीत ती नागमोडी रस्त्यानें टेकडी उतरत होती... परदेशी पाहुण्याचं आदरातिथ्य अन् परदेशाहून आलेल्या पुरुषाची उपासमार स्वतः अकलंकित राहून कलंदर नवऱ्याला शिक्षा...सगळं पद्धतशीर करून परत भाबडेपणानें हृदय मोकळं करायची वृत्ती...

टेकडीवरून मी झपाट्यानें खाली येऊं लागलो. माझं डोकंच नव्हे तर सगळं शरीर हादरत होतं. ह्याच नगरांत, ह्याच ठिकाणीं पूर्वी भूकंपाचे धक्के बसले होते ! धावरून मी रस्त्यावरच्या गजबजात आलो.

घरी परततांना मिट्झी हसून म्हणाली.

" सगळं विसर पाहूं ! फ्रिस्कोचं सौंदर्य तुला पाह्यचं आहे ना ? असं खोलीवर परतलं तर खिन्नतेतच झोप येईल. आपण उंचावर जाऊं सगळं शहर चारी डोळ्यांनी एकदम पाहूं. आपली मनं उंचावूं ! "

पुन्हां चढण चढून आम्हीं मार्क हॉपकिन्स होटेलशी आलो. होटेलशी वर जायला गर्दी होती. वरच्या कॉक्टेल लुंजमध्यें नेकटाय घालूनच जावं लागतं. जवळच्या टायस्टँडवरून मिट्झीनें एक निळा टाय खरेदी केला. ' माझी आठवण—" ती पुटपुटली. गळ्यात हातांचा हार पडला. टायची गाठ ओढली गेली.

होटेलच्या उंच माथ्यावरून सगळं सॅन फ्रॉन्सिस्को शहर दिसत होतं. धुक्यांत लपेटलेली, दिव्यांनी नटलेली, पॅसिफिकच्या कवेत गेलेली गूढ नगरी ! आणि निश्चल नजरेनें उंचावरून पहाणारी रोझमेरी रॉजर्स, ती फ्रिस्को पहात होती नि मी तिची आकृति पहात होतो. सगळं सगळं विसरलं जाईल, पण अपूर्व आदरातिथ्य करणारी अन् विलक्षण शिक्षा करणारी ती प्रेमळ, खेळकर, कठोर, धाडसी, नेकदार पवित्र मूर्ति माझ्या हृदयांत कायमची कोरली जाईल.

वेटरनें आमच्या हातांत मद्याचे पेले आणून दिले. सोनेरी मद्यांत बर्फाचे खडे विरघळत होते. मी भुंवया उंचावून तिच्याकडे पाहिलं. ग्लास किणकिणवत म्हणाली,

" स्कॉच ऑन रॉक्स "

" स्कोल—"

मैत्रीचा सगळा सोहळा परत सुरू झाला......"

• • •

( पान १३ वरून चालू )

त्याच्या नाकपुड्या स्फुरूं लागल्या. कपाळाला आठ्या पडल्या. सीतेला लक्ष्मणाने वनांत सोडल्याचें वर्णन करणारा श्लोक संपला न संपला, तोंच तो पाहुणा ताडकन उठून उभा राहिला आणि मोठ्यानें ओरडला, " हा अधर्म आहे ! हा अधर्म आहे ! '

वाल्मिकींच्या काव्यगायनाला पुन्हां खंड पडला. श्रोतृवृन्दांचें त्यांच्यावर खिळून राहिलेलें लक्ष द्विधा झालें. जो तो या मधेंच ओरडणाऱ्या अपरिचित रानटी माणसाकडे थोड्या कुतूहलानें, पण पुष्कळशा तिरस्कारानें पाहूं लागला.

वाल्मिकि पाहुण्याला उद्देशून म्हणाले, ' बंधो, तुला काय सांगायचं आहे तें मग सांग. काव्य मधेंच खंडित झाले तर या सर्व सभ्यांचा विरस होईल. '

तो पाहुणा खालीं मान घालून मुकाट्यानें बसला.

रामायण गायन संपलें. सर्व ऋषिमुनींनी पृथ्वीतलावर पहिलें महाकाव्य निर्माण झालें म्हणून आनंद व्यक्त केला. महर्षींचें अभिनंदन करून त्यांना धन्यवाद देण्याकरतां ते उत्सुक झाले होते ! पण भगवान् वाल्मिकींची दृष्टि दूर कोपऱ्यांत बसलेल्या त्या अपरिचित व्यक्तीकडे वळली होती. त्यांनी त्या पाहुण्याला पुढें घेऊन येण्याविषयीं शिष्यांना खूण करून सुचविलें. तो पुढें आला. आपल्याजवळ बसण्याविषयीं महर्षींनीं त्याला आग्रह केला. पण तो त्यांच्या आसनावर तर बसला नाहींच, उलट तो खालीं बसायलासुद्धां तयार होईना. शेवटीं सर्वांना ऐकूं जाईल अशा स्वरांत महर्षि त्याला म्हणाले,' बंधो, रामचन्द्रानं केलेला सीतेचा त्याग हा अधर्म आहे असं तू मघाशी म्हणालास ! '

तो पाहुणा आतां काय उत्तर देतो हें ऐकण्याकरता सारी सभा त्याच्याकडे पाहूं लागली.

तो अपरिचित पुरुष कुर्न्यानें उद्गारला, " होय. तो अधर्मच आहे. पारधीसुद्धां गाभण असलेल्या हरिणीवर बाण टाकत नाहीं ! तोसुद्धां धर्म जाणतो ! पण तुमच्या या रामानं मात्र--

वाल्मिकि शांतपणें उत्तरले, ' पत्नीचा प्रतिपाळ करणं हा पतीचा धर्म आहे. पण माझ्या महाकाव्याचा नायक केवळ पति नाहीं; तो राजा आहे ! पतिधर्म आणि राजधर्म यांतून श्रेष्ठ काय हें त्यानं आपल्या आचरणानं दाखविलं आहे. राजा केवळ करुणेच्या आहारीं गेला तर त्यालाला आपला धर्म पाळतां येणार नाहीं. त्यानं आपलं कर्तव्य केलंच पाहिजे. मित्रा, कर्तव्य करुणेपेक्षां श्रेष्ठ असतं हें विसरूं नकोस. '

पाहुण्याने प्रश्न केला, ' हें खरं ना महाराज ? '

वाल्मिकि प्रत्येक शब्दावर जोर देत उत्तरले, ' कर्तव्य करुणेपेक्षां श्रेष्ठ आहे हें अक्षरशः खरं आहे. त्रिवार खरं आहे, हें त्रिकालाबाधित सत्य आहे. कर्तव्य कितीहि कठोर असलं तरी तें शांतमनानं करणं हाच माणसाचा धर्म आहे. '

तो पाहुणा चांचरत म्हणाला, ' मग मग--'

तो पुढे बोलेना. वाल्मिकि हंसून म्हणाले, ‘ बंधो, भ्रात्या असा संकोचूं नकोस. तुला जें कांहीं बोलायचंय् तें अगदी मोकळे-पणानं सांग. ’

‘ मग–मग तुम्ही—’ एवढें बोलून तो एकदम थांबला.

सभाजन गालांतल्या गालांत हसूं लागले. रामायणाचे गायन सुरूं असतांना हा अपरिचित मनुष्य किती रानटीपणाने वागला हें सर्वांनी पाहिलें होतें. तो कुणीतरी वेडा असावा, शिष्यांच्या अनवधानामुळे त्याला या सभेंत प्रवेश मिळाला असावा, असें त्याचवेळीं अनेकांच्या मनांत आलें होतें. महर्षींनी त्याची समजूत घालण्याची तसदी घेऊं नये असें त्यांना सुचविण्याकरतां एक तरुण ऋषि आपल्या जागेवरून उठला सुद्धा ! इतक्यांत तो पाहुणाच बोलूं लागला.

किंचित् कठोर स्वराने तो वाल्मिकींना म्हणाला, ‘ मग तुम्ही ती विलक्षण शिक्षा मला कशी केली ? कां केली ? मीहि माझ्या कर्तव्याचं पालन करीत होतों ! ’

तो काय म्हणत होता हें वाल्मिकींना कळेना. ते विस्मययुक्त स्वराने त्याला म्हणाले, ‘ मित्रा, तूं काय म्हणत आहेस हें माझ्या लक्षांत येत नाहीं. मी तुला शिक्षा केली ? ’

‘ हो ! भयंकर शिक्षा केलीत तुम्ही मला ! ’

‘ केव्हां ? ’

‘ पुष्कळ वर्षें झालीं त्या गोष्टीला ! ’

‘ कुठं केली ती शिक्षा ? ’

‘ इथंच. तमसामाईच्या साक्षीनं ! ’

‘ तमसेच्या तीरावर ? भयंकर शिक्षा ? कसली ? कशासाठी ? ’

‘ शाप दिला मला तुम्ही ! ’

एखाद्या विद्ध हरणाप्रमाणें महर्षींची मुद्रा व्याकुळ झाल्यासारखी दिसूं लागली. झटकन् उठून त्या पाहुण्याच्या खांद्यावर हात ठेवीत त्यांनी विचारलें, ‘ म्हणजे ? ज्याला मी शाप दिला होता तो निषाद तू आहेस ? तो व्याध तूं आहेस ? ’

त्याने होकारार्थी मान हालवली. तो उत्तरला, ‘ होय, तोच मी दुर्दैवी पारधी ! ’

त्याच्या मुद्रेकडे निरखून पाहत वाल्मिकि म्हणाले, ‘ तुला मी ओळखलं नाहीं. क्षमा कर मला. त्यादिवशीं वृक्षावर आनंदानं विहार करणाऱ्या क्रौंच पक्ष्यांच्या जोडप्यांतला नर तूं बाण मारून खाली पाडलास. तें दृश्य मला पाहवलं नाहीं. माझं मन कळवळलं. करुणेनं उचंबळून आलं. म्हणून ती शापवाणी माझ्या मुखांतून निघून गेली.’

‘ पण, मुनिमहाराज, करुणेपेक्षा कर्तव्य श्रेष्ठ आहे असं तुम्हीं आतांच म्हणालां ना ? ’

‘ होय. ’

‘ मग मला तो शाप द्यायचा तुम्हांला काय अधिकार होता ? मी त्या क्रौंच नरावर नेम धरला तो केवळ कर्तव्य बुद्धीनं ! असं असतांना माझं आणि माझ्या कुटुंबाचं सगळं जीवन दुःखी करून टाकण्याचा तुम्हाला कोणता हक्क होता ? तुमची ती भयंकर शाप-वाणी कानांवर पडतांच मी भयभीत झालों. खूब दूर पळून गेलों. एका गुहेंत लपून बसलों. तुमच्या त्या देववाणीचा अर्थ कांहीं मला

नीटसा कळला नव्हता ! पण तुमच्या स्वरांतला राग मात्र मला पुरेपुर जाणवला होता. कितीतरी दिवस मी असा दडून बसलों. मग माझं भय थोडं कमी झालं. बायका-मुलांची चौकशी करायला मी परत आलों.'

'तुला बायकामुलं होतीं ?' महर्षींनी मधेच विचारलें.

'आम्ही साधी माणसं. कुणी ऋषिमुनि नव्हे. बायकापोरांवांचून आम्हाला कसं करमणार ?' तो व्याध उत्तरला. क्षणभर थांबून तो पुढे बोलू लागला,' त्या दिवशीं मी शिकारीला बाहेर पडलो तेव्हा माझी बायको अगदी मरणाच्या दारीं पडली होती. माझ्या वाटेकडं लावलेल्या डोळ्यांतून तिचा प्राण केव्हां निघून गेला हें कुणालाच कळलं नसेल ! माझी वाट पाहून मला शोधण्याकरता पोरंहि कुठं दूरदूर भटकत गेलीं ! माझी स्थिति भ्रमिष्टासारखी झाली. मिळालेल्या शिकारीवर बायकामुलांसह या वनांत मोठ्या आनंदानं राहात होतो मी. ती जागा आता मला खायला येऊं लागली. भुतासारखं एकटं राहायचं भय वाटूं लागलं. तुमच्या त्या शापाची पावलोंपावलीं आठवण होऊन छातींत धडकी भरत होती ! मी इथून निघून गेलो. माझा धंदा सोडला. गांवोगांव भटकलो. जातां जातां मिळेल तेवढं धर्माचं ज्ञान मिळविलं. पण तुम्ही मला शाप कां दिला हें कोडं अजूनहि मला सुटलेलं नाहीं ! तुमच्याकडं येऊन मनाचं समाधान करून घ्यावं म्हणून आज इथं आलों. योगायोगानं तुमचं हें महाकाव्य मला ऐकायला मिळालं. त्या काव्यांत तुम्ही जें सांगितलं आहे तेंच मी करीत होतों. पण माझ्या वांट्याला शाप आला आणि या रामाच्या वांट्याला मात्र—'

छक्कापन्हुति : ८



हा इथं उभा ठाकला उंट—रूप तयाचें कसें सांगावें
आहे हिरो 'अहो रूपमूचा'
उद्यानावर नजर फिरवीत चघळतो आहे गवत आणि कांटे
—जणु पभ सद् हायकमांडचा दुवबी. पहा भूमी हा
चालताना स्वीकारीत सुहास्य मुद्रेनें अभिवादन जनतेचें
आपणच आपुलकीनें.

वाल्मिकी महर्षि गोंधळल्यासारखे झाले होते. स्तब्ध बसले होते. त्यामुळें व्याध बोलतच राहिला. पण महर्षींची मुद्रा लवकरच शांत झाली. ते त्याला म्हणाले, 'मित्रा. तुझ्याविषयीं माझ्या मनांत कसलाहि किंतु नव्हता. मी शाप दिला तो निष्पाप पांखराची हत्या





अनुक्रमणिका

मला पाहवली नाहीं म्हणून ! अजून तो प्रसंग आठवून बघ. तूं ज्यावेळीं त्या क्रौंच नरावर बाण रोखला असशील, त्यावेळीं तुला सुद्धां तो सोडूं नये असं वाटलं असेल !'

वाटलं होतं. एकदां नाहीं, दोनदां नाहीं, अनेकदां मनांत आलं होतं कीं, धनुष्याला बाण न लावतां परत जावं ! फांदीवर आनंदांत बसलेलं तें जोडपं पाहून मला मोठा आनंद झाला होता. तिथं मी आणि माझी बायको बसलों आहो असा भास मला झाला होता. मग माझ्या मनांत आलं होतं, मी आणि माझी बायको अशीच आनंदानं गोष्टी करीत बसलों असतांना कुणी माझ्यावर बाण सोडला तर—' किंचित् थांबून तो पुढें म्हणाला, 'तो बाण आपण सोडला मुनिमहाराज. त्या दिवशीं माझ्यासारख्या पारध्यानं एका पांखराची हत्या केली असेल, पण त्याच दिवशीं आपल्या-सारख्या थोर ऋषीनं माझ्यासारख्या माणसाची हत्या केली ! मी बाण सोडला त्या वेळीं आपल्या इतकंच माझंहि मन दयेनं भरून गेलं होतं. पण मला माझं कर्तव्य पार पाडणं भाग होतं !'

'कर्तव्य ? कशाला एवढा मोठा शब्द वापरतोस ? कसलं कर्तव्य होतं तुला ?'

व्याध हंसत म्हणाला, "रामा- सारख्या राजाला जशीं कर्तव्यं सतात: तशीं माझ्यासारख्या पारध्यालाहि तीं असतात. माझी बायको मरणाच्या दारीं पडली होती. तिला एक मोठा विचित्र रोग झाला होता. क्रौंच पक्षाच्या मांसाचा रस तिला दिला, तर ती सुधा-रेल. असं एका म्हाताऱ्या भिल्लीणीनं मला सांगितलं होतं. तिनं या औषधाचा अनुभव घेतला होता. म्हणून त्या दिवशीं ही शिकार शोधायला मी निघालों होतों. झाडावर क्रौंच पक्षी पाहिले, तेव्हां मला विलक्षण आनंद झाला. बायको आतां बरी झाली, असं वाटलं मला ! त्या जोडप्यांतली मादी मला सहज मारता आली असती ! पण तिच्या जागीं मला माझी बायको दिसत होती. म्हणून मी नरावरच नेम धरला. मी स्वतःवरच नेम धरला होता ! मी स्वतःलाच ठार मारीत होतों; पण तें माझं कर्तव्य होतं !

सारी सभा चकित होऊन व्याधाची ही हकीगत ऐकत होते. आपण एखादें विचित्र स्वप्न तर पाहत नाहीं ना, असें सर्वांना वाटत होतें. वाल्मिकी ऋषींनीं दिलेल्या त्या शापाची कथा सर्वांनीं कर्णोपकर्णी ऐकली होती. तो शाप नसून कवि-हृदयाचा मूर्तिमत आविष्कार होता, असें वर्षानुवर्षें आबालवृद्ध मानीत आले होते. त्या शापाच्या प्रसंगाला दुसरी कांहीं बाजू असेल, महर्षींच्य करुणेइतकीच प्रबळ अशी बाजू असेल, याची कुणाला कल्पनाहि नव्हती. आतां पुढें काय होणार, याचा कुणालाच तर्क करतां येईना.

पाहुणा एक उसासा सोडून वाल्मिकींना म्हणाला, 'ठीक आहे मुनिमहाराज, जातों मी. मी जें विचारायला आलों होतों, तें विचारून झालंय.'

वाल्मिकींकडे पाठ फिरवून तो खालीं उतरूं लागला. इतक्यांत महर्षि आसनावरून उठले. त्यांनीं त्याचें दोन्हीं हात आपल्या हातांत घेतले; आणि सद्गदित स्वरांत ते त्याला म्हणाले, 'मित्रा, माझा शाप माझ्या दृष्टीनं बरोबर असेल ! पण तुझ्या दृष्टीनं तो सर्वस्वी चूक होता. तुझी दृष्टि त्यावेळीं कळणं मला शक्य नव्हतं. आज ती कळली. आज—फार उशीरां ! माझ्या हातून नकळत तुझ्यावर झालेल्या अन्यायाचं परिमार्जन करण्याची माझी इच्छा आहे. बोल, काय करूं मी तुझ्यासाठीं ?'

व्याध खिन्नपणानें हसून म्हणाला, 'कांहीं नको !'

वाल्मिकि पुनः कोमल स्वरानें म्हणाले, 'नको कां म्हणतोस ? अजून तुझा माझ्यावरचा राग गेलेला दिसत नाहीं. मित्रा, ज्या तपाच्या बळावर वाल्मिकीनं तुला शाप दिला, त्याच तपाच्या सामर्थ्यावर तो तुला उःशापहि देईल. बोल, कोणता उःशाप देऊं तुला ? काय हवय तुला ?'

महर्षींचे हात आपल्या हातांतून सोडवून घेत व्याध उत्तरला, 'मुनिमहाराज, तुम्हांला उःशाप द्यायचा असेल, तर तो एवढाच द्या—तुमच्या या महाकाव्यांत राम सीतेला टाकीत नाहीं असं दाखवा !

'मित्रा, रामकथा ही सत्यकथा आहे, ती बदलतां कशी येईल ?

'मग—'

'बोल, हवा तो उःशाप माग !

'मग—तुमच्या या काव्यांत रामानं सीतेला टाकल्यावर तिची नि त्या क्रौंचपक्षिणीची भेट होते असं दाखवा.'

'ती कशासाठी ?'

'सीतेला त्या दुःखी पक्षिणीची संमजूत घालूं दे, 'तू माझ्या सारखीच दुर्दैवी आहेस आणि तो व्याध तुझ्या इतकाच दुर्दैवी आहे' असं सीता तिला सांगूं दे,'

बोलतां बोलतां व्याध खाली उतरला आणि चालू लागला वाल्मीकि महर्षि मात्र त्याच्या त्या पाठमोऱ्या आकृतीकडे पाहतां पाहतां आपले डोळे पुसूं लागले.

• • •














Mrs Pushpa Shrinivas Parkar
Pu-shpa Sh-rinivas Pa-rkar
Pu-Sh-Pa
Pushpa—पुष्पा !

या चार ओळी लिहून लिहून पुष्पानें वहीचा एक संपूर्ण कागद खर्ची घातला. वर्गांतल्या कुंदा मोहितेनें ही गंमत सांगितल्यापासून दैवी चमत्कार पाहिल्यावर भाविक मन भरून यावं तसं पुष्पाचं मन कांठोकांठ भरून आलं होतं...पण या मेलीला कसं कळलं, माझं त्याच्यावर प्रेम आहे तें !...प्रेम प्रेम...आतून उमलून येणारं हंसूं तिच्या इवल्याशा लवचिक ओठांत मावेनासं झालं.

त्या नादांतच तिनें एक लकेर घेत गरकन् फिरकी घेतली, आणि ती ऐषआरामांत खुर्चीत लवंडली. या क्षणीं त्या खुर्चीत बसायलाच हवं होतं. नांगरून ठेवलेल्या होडीसारखी डोलणारी ती खुर्ची पुष्पाला मनापासून आवडायची. कारण त्या खुर्चीत बैठक मारली आणि झोका घेतला कीं ती आपोआपच स्वप्नाळू व्हायची. तन्मय होऊन स्वप्नं पहायची ....

फार जुनी खुर्ची आहे ती. आतां त्या खुर्चीत फारसं कुणी बसत नाहीं. आईला मात्र ती खुर्ची फार आवडायची. तीहि तशीच भारी स्वप्नाळू ! साहेबाशीं थट्टा विनोद करतांना अवखळपणें हंसायची तिला संवय. हंसतां हसतां ती त्या खुर्चीत स्वतःला झोकून द्यायची. आणि मग हिंदोळ्यावर बसल्यागत डोलत रहायची. पुढें-मागे, मागें-पुढें ! तिच्या चेष्टेनें कधीं कधीं साहेब लटके चिडत आणि मग तिला हाताला धरून खुर्चीतून ओढून काढीत.

" या खुर्चीत तूं बसत जाऊं नकोस. या खुर्चीत तूं हिंदकळत राहिलीस म्हणजे अधिक अवखळ होतेस ! "

साहेबांचे ते उद्गार तिला नेहमीं आठवत.

आई ...ल्यापासून त्यांनीं त्या खुर्चीवर बसायचं सोडून दिलं. ...र्ची आवडायची हें कळल्यापासून माईनेंहि ती खुर्ची ...मात्र आवडीनें त्या खुर्चीवर बसायची. त्या खुर्चीवर ... खुर्चीला मन आहे असं तिला वाटायचं...म्हणून ... हिंदकळत रहायची.

... रेलली आणि वेणी मागें उडवतांना मानेला हिसका द्यावा तसा हिसका देऊन तिनें खुर्चीला झोका दिला. डोलता डोलतां तिला आईची आठवण झाली...साहेब कचेरींत जायला निघाले, कीं कपाटाच्या आरशासमोर दोन्ही हात फाकून ते कवायतीला उभे राहिल्यासारखे उभे रहात—अळु-डीच्या रंगाचा लांबोडा चिरूट तोंडांत धरून. मग आई आपल्या आवडीचा कोट काढून त्यांच्या अंगावर चढवायची आणि मानेकडे बोट सारून कॉलर नीटनेटकी करायची. त्यावेळीं कधीं कधीं ती मानेला चिमटासुद्धां घ्यायची. मग कोटाचें बटण लावायला ती समोर आली म्हणजे ओढून धरलेला चिरूटाचा धूर ते भसकारून तिच्या तोंडावर फेकायचे-तिला तो वास आवडत नसे म्हणून मुद्दाम ! आणि मग उसन्या रागानें कांहीं तरी पुटपुटत ती नाकावर पदर ओढून घ्यायची......

पुष्पा तें नेहमीं दुरून पहायची. तें पाहाणं तिला आवडायचं. कां कोण जाणे ! कां पहाते-कां आवडतं, तें तिला कळत नसे. पण आवडायचं एवढं निश्चित !..... तें दृश्य डोळ्यासमोर तरळलं म्हणजे तिला अजूनहि बरं वाटायचं......

शाळा सुटली कीं घरीं यावं, त्या खुर्चीत रेलावं आणि मनमुराद आपल्या स्वप्नांत रंगावं हा छंद पुष्पाला जडला होता.

शाळेंतून येतांच ती खुर्चीत बसली खुर्चीच्या हातावर कोपर टेंकून हनुवटीला मूठ टेकली. आणि कांचेच्या बरणींतल्या दिखाऊ मासोळीसारखे चमचम डोळे नाचवले. बराच वेळ ती तशीच बसली कल्पनेच्या तरंगांत हेलावत-डुंबत.. तिला नवल वाटलं, पुष्पा या नांवांत श्रीनिवास पारकर सामावला आहे याचं. आणि तें कुंदा मोहितेनें कसं हेरलं ?.. पुष्पा पुनः पुनः नजरेनेंच तीं इंग्रजी अक्षरं गिरवूं लागली...P-U-S-H-P-A.

आणि मग खूपशा वेळानें तिला जाणीव झाली...आपल्या ओठांवर घामाचे थेंब दंवबिंदूसारखे जमले आहेत म्हणून. स्कर्टच्या टोंकानें तिनें घाम पुसला—न विसरतां माड्या चिकटवून घेत. ओठांवर घाम सांठलेला तिला आवडत नसे उद्यां कॉलेजात गेल्यावर कदाचित् लिप्स्टिक् लावावी लागेल, आणि मग घाम पुसतां पुसतां ओठांचा रंग पुसून जायचा ..

" आज भांडीवाली येईन म्हणाली होती. कुठं मेली कोण जाणे ! " माई खोलींत आली आणि तशीच किरकिरत गेली.

—आणि मग अचानक एक विचार पुष्पाच्या मनांत आला आणि घारीसारखा गरगर घिरट्या घालू लागला...माईचं लग्न होऊन आतां चार पांच वर्षं लोटलीं. पण तिला मूलबाळ कां नाहीं ?...समोरच्या दिप्यांचं लग्न होऊन तीन वर्षंच झालीं तेवढ्यात त्यांना दोन मुलं झालीं. दोन्हीं मुलीच. एक तरी मुलगा व्हायला हवा होता...होईल! पण माईला अजून कांहींच कसं होत नाहीं ?.. व्हायला हवं... चांगला गोरापान गुटगुटीत मुलगा...साहेबासारखा...माझ्यासारखा दिसणारा...मग शाळेतनं आल्यावर माझा वेळ जाईल...माईचाहि...!

म्हणूनच का साहेब गंभीर झाले असतील?...आई होती तेव्हां ते किती खेळकर नि आनंदी असायचे .. मला खेळणीं आणायचे. चॉकलेट आणायचे, आईला वेणी...मासिक...त्यांचे हात नुसते भरलेले असायचे घरीं येतांना रात्रीं पडल्या पडल्या आई त्यांना मासिकांतल्या गोष्टी वाचून दाखवायची, आणि साहेब चिरूट ओढत ऐकत पडायचे...त्यांनीं सारं बंद केलं ते एकदम बदलले बदलं नयेत तसे माई आली नि सारं गेलं. माईलाहि वाचनाचं कांहीं नाहीं वाचते तेवढी फक्त ज्ञानेश्वरीच—आणि तीहि तोंडांतल्या तोंडांतच !— अगदीं रूक्ष दिसायला आहे तशीच !

तिच्या ओठावर अगदीं मिसरूडच असावेत तसे काळेभोर केंस . थोडे तुरळक आहेत एवढंच. आणि हनुवटीवर काळाभोर तीळ...त्यावर ते तीन चार लांब केस—ओल्या चहाच्या पातीसारखे ! आणि मिशीवर तिला घाम यायचा तो पुष्पाची ती कधींच तसदी घेत नसे. आतांच दुर्वांवर पाऊस पडून गेल्यासारखं वाटायचं साहेब एवढे दिसायला सुंदर. त्यानी हिला कशी पसंत केली कोण जाणे !

पुष्पा गॅलरींत येऊन उभी राहतांच समोरच्या कौलारू छपरावर कबुतरं फडफड करीत इकडे तिकडे नाचलीं. एका पारव्यानें तर अगदीं निर्लज्जपणें चोंचींत चोंच खुपसली-मोठ्या मिजाशींत. माना उडवीत एकमेकांच्या माना टोंचल्या ..पुष्पा पहात राहिली. ती पहाते आहे हें तिच्या प्रथम लक्षांत सुद्धां आलं नाहीं. ती पहात राहिली.

"कुणाला पहातेस ग ?"

माईचा खरखरीत आवाज कानीं येतांच पुष्पा ओशाळून मागें फिरली.

"छे ! कुठं काय ?" कबुतरांना पाहिलं तर हिचं काय जातं !

"नाहीं म्हटलं, भांडीवाली दिसली तर हांक मार—"

पुष्पाला माईचा राग आला. हिचं आपलं उठल्या सुटल्या भांडीवालीचं खूळ कधीं म्हणून संपायचं नाहीं !

तिला वाटलं, भांडीवालीची वाट पहाण्यापेक्षां बाहेर पडावं हें बरं ! व्यायामशाळेवरनं लायब्ररींत जाऊन मासिक बदलून आणावं म्हणजे कदाचित् रस्त्यांत श्रीनिवास भेटेल...श्रीनिवास पारकर...मोठा हुशार नि छकडा पोरगा. गोड नि नीटनेटका.. शाळेतल्या पोरींशीं फारसा कधीं बोलणार नाहीं-आणि खरं तेंच बरं ! नाहीं तरी पोरींना पुढें पुढें करायची भारीच संवय...मेली कुंदा मोहिते तर मरते नुसती... पण श्री बोलायचा नाहीं...न बोलेना...पहातां तर येईल... !

पुष्पानें स्कर्ट बदलून पांच वारी पातळ अंगावर ओढलं, तिच्या स्कर्टचा आतां कंटाळा आला होता. खूप वर्षं स्कर्ट घातलं. स्कर्टमुळें यायच्या गोऱ्या पोटऱ्यांना दृष्ट लागते आणि छातीवर पदर ओढतां येत नाहीं. लहानपणाची गोष्ट निराळी ! आतां कांहीं ती लहान नव्हती. किती दिवस स्कर्ट घालायचे ! आतां मुली सुद्धां म्हणायला लागल्या, तुला पांच वारी दिसेल म्हणून--म्हणूनच पुष्पा पांच वारी नेसली. लफ्फेदार पदर काढला. फ्लॉवर पॉट मधल्या गुच्छांतलं एक गुलाबाचं फूल वेणींत खोवलं, आणि मासि घेऊन ती खालीं उतरली.

आजुबाजूला वळून स्वतःलाच पहात ती व्यायामशाळेवरनं लायब्ररीकडे निघाली. कोपऱ्यावर चार सहा पोरांचं टोळकं गप्पा थांबवून तिच्याकडे पहात आहे हें तिला डोळ्यांच्या कडांतून जाणवलं. त्यांत श्रीनिवास आहे कीं काय हें पहाण्यासाठीं तिनं झटकन् त्या घोळक्यावर नजर फिरवून घेतली. पण त्यांत तो नव्हता. असता तरी त्यानें वळून पाहिलं नसतं.

लायब्ररींत येतांच सारे डोळे एकदम आपल्या पातळाला चिकटले आहेत असा तिला भास झाला. आणि ती म्हणतां म्हणतां अचानक भांबावून गेली वाचायला बसलेल्या मंडळीकडे वळून पहाण्याचं धाडस सुद्धां तिला झालं नाहीं. वळून बघतां बघतां कुणी पाहिलं तर ! नजरानजर झाली तर !... घांदरट विचारानें ती गडबडून गेली .. शीः ! आपण बराच वेळ घाम पुसला नाहीं याची तिला जाणीव झाली आणि तिनें रुमालाची वंद घडी झटपट ओठावरनं फिरवली

श्रीनिवास सुद्धां कुठं तरी कोपऱ्यांत वाचत बसलेला असेल. तो इथंच येतो. पण नसेलहि या वेळीं. व्यायामाला गेला असेल...मोठा वक्तशीर बेटा...साहेबांना आवडेल...खूप आवडेल...

" बदलायचंय मासिक ? "

" हं ! दुसरं द्या एखादं ! " ती टेबलावरलीं मासिकं चाळूं लागली.

" हें आगलंत त्यांतली 'बिंदु ' ही कथा वाचली कीं नाहीं ! "

कारकुनाच्या या प्रश्नानें पुष्पा एकदम चपापली. कुंदा मोहितेनें सांगितलं म्हणून तीच वाचण्यासाठीं तिने तें मासिक नेलं होतं ..या चकण्याला तें कसं कळलं ! मेला इलकट आहे...

" ऑं ' कशी आहे कथा ! " तो उगाच डोळे मिचकावीत हंसला. आणि न होऊन पुष्पाहि हंसली- एकदम हंसली. आणि मग आपण असं हंसतां नये होतं याची जाणीव होतांच ती कपाळाला आठ्या घालीत गंभीर झाली. आणि उगाच मासिक उलटीपालटी करूं लागली.

' बिंदु ' या कथेंतल्या नायकाला नायिकेच्या ओठावर अडखळून राहिलेले घर्मबिंदु चाटून घ्यावेसे वाटतात शीः ! कांहीं तरीच मेले लिहितात...असं वाटल तरी कधीं कुणाला ! घाम चाटायचा...

दुसरं मासिक घेऊन बाहेर पडतां पडतां तिला वाटलं, आपण त्या कारकुनाशीं हंसलें तें कुणी पाहिलं तर नसेल ना ...हंसलें सहज आणि अगदीं अचानक. ' बिंदू ' कथेंतल्या नायकाची आठवण होऊन...पण बघणारे भलतेसलते अर्थ घ्यायचे...दुडदुडत्या पावलांनीं जिने उतरून खालीं येतांच तिला बरं वाटलं.

ती पुनः व्यायामशाळेवरनं गेली. जातां जता तिनें आंत पाहिलं. पण श्रीनिवास कुठं दिसला नाहीं. आंत दंडबैठका काढीत असेल...उघडा बंब...मिसरूटावर घामाचे थेंब जमले असतील ..ती एकदम शहारल्या-सारखी झाली...घामाचे थेंब ओठावरचे झाले म्हणून काय झालं !



ते पुसून घ्यायचे सोडून चाटून कोण घेईल !.. भलतंच आपलं कांहीं तरी ..! तिनें आपल्या ओठावरनं दोन बोटं ओढून घेतली. आणि समोरच्या फाटकांतून एकदम श्रीनिवास बाहेर पडला हातांतल्या टॉवेलनें ओठावरचा घाम पुशीत...

तो श्रीनिवास असावा एवढाच तिला भास झाला. पण तो तोच होता ही खात्री नव्हती, त्यानें ओठावरनं टॉवेलाची घडी ओढली एवढं तिला निश्चित दिसलं. पण त्यामुळेंच चेहरा हुकला आणि हुरहुर वाटली. पण वळून पहाण्याचा धीर झाला नाहीं. उलट छातींत धडधड उठली. पावलाला पाऊल आपटायला लागलं. आणि निष्कारण घसा खाकरावसं वाटूं लागलं. फक्त चालतां चालतां खांद्यापर्यंत हनुवटी वळवून तिनें तिरकस नजरेनें तो मागून येतो आहे कीं काय तें हेरण्याचा प्रयत्न केला. पण तो येत नव्हता. येणारच नाहीं. आहेच तसा तऱ्हेवाईक...असूं दे ! चालेल मला !...पण मी ओठावरनं बोटं फिरवली तें पाहून तर त्यानें आपल्या ओठावर टॉवेल ओढला नसेल ना ! त्या मादक विचारानें ती बराच वेळ गुंगून गेली. इतकी कीं, घरचा रस्ता सोडून ती चौपाटीच्या दिशेनें आली हें तिच्या लक्षांतसुद्धां आलं नाहीं.

बसल्या जमल्या, गुदगुल्या केल्याप्रमाणें गडबडा लोळणाऱ्या लाटा पाहून तिच्या अंगावर कांटा उभा राहिला. जणुं तिच्याच मांसल कुशींत बोटं खुपसून तिलाच कुणीतरी गुदगुल्या करीत होतं...त्या काव्याचं सुख तसंच अंगावर साठवून तिनें वाळूवर अलगत हात फिरवला आणि एका काडीनें अक्षरं लिहिलीं.

(Mrs.) PU-SHPA SH-RINIVAS PA RKAR
PU-SH-PA

पण कुणीतरी एकदम जवळून जातांच तिनें झटक्यानें वाळूवरुन हात फिरविला. आणि "लाटेनें धुवून निघालेल्या किनाऱ्याप्रमाणें तिच कपाळ दिसूं लागलं." हें 'बिंदु' कथेंतल वाक्य एकदम तिच्या लक्षांत आलं. म्हणून वाळूच्या त्या वीतभर पट्ट्यावर तिनें उजव्या हाताचा अंगठा रोवून टिळा लावला.

"असा कुंकवाचा टिळा मी लावीन हं!"

"खरंच ?" तिनें लाजून आपली हनुवटी गुडघ्यावर टेकली.

"आणि पलंगावर पाडून गुदगुदल्याहि करीन..."

"कसं कळलं तुला ?"

"काय ?"

"साहेब आईला गुदगुदल्या करीत तें ?"

तो नुसताच हंसला. पण किती गोड !

"मी आपली डोलणारी खुर्चीहि घरीं आणीन—"

"पण खुर्चीत बसून चेष्टा करीत हंसत राहिलीस तर मात्र हाताला धरून ओढून काढीन !"

"इश्श !"



अनुक्रमणिका

"कपडेहि तुझ्या आवडीनें .."

"तूं फक्त आरशासमोर उभं रहायचंस... मी कोट चढवीन...कबूल...!"

"कबूल!"

"पण चिरूट नाहीं ओढायचा!"

"मग तुला काय आवडेल!"

"तुझं प्रेम! माझ्या आईवर जसं साहेबांनीं केलं तसं तूं करायला पाहिजेस...करशील ना!"

'आत्तां करूं!"

"आधीं तोंड पूस —"

"कां!"

"घाम बघ ओठावर किती आलाय!"

"चाटून घे..."

"शी:!"

ती घास्तावलेल्या आवेगानें तिथून उठली आणि तडक घरीं आली.

फ्लॉवर पॉटमधली गुलाबाची एक उमलती कळी घेऊन तिनें स्वतःला खुर्चींत झोकून दिलं. गुलाबाची कळी शीळ घालते आहे असा तिला भास झाला. निमुळत्या ओठासारखी. ती नाकावर घेण्याच्या निमित्तानें तिनें ओठांवर फिरवली. पाकळयांत लपलेलं पाण्याचं शीतल थेंब तिच्या ओठावर पडतांच तिचं अंग नि अंग अगदीं मोहरून गेलं. जणुं श्रीनिवासच्या पहिल्या स्पर्शाचंच सुख......अजूनहि ती खुर्चीत डोलतच होती.

साहेब अजून घरीं आले नव्हते म्हणून न बोलतांच त्यांनीं जेवणं उरकलीं. मग नेहमींप्रमाणें पुष्पानें आपल्या खोलींत समई लावली आणि समोर चौरंग ठेवून त्यावर ज्ञानेश्वरी ठेवली. आई समईपाशीं बसली. पण तिनें ज्ञानेश्वरी उघडली नाहीं.

'कां...!"

"डोकं दुखतंय—"

पुष्पाला वाटलं, माइ म कळा आहे, तिच्या मांडीवर डोकं टेकून उताणी पडावं आणि मनातलं म्हणून विचारावं..

" साहेबांना उशीर कां होतो हल्ली !' खाटेवर पडल्या पडल्या तिनें प्रश्न विचारला. थोडं बोलणं सुरूं व्हावं म्हणून.

" कोण जाणे !' भुवया उंच करून माईनें वैताग ताणला.

त्यामुळें पुष्पा पुढें बोललीच नाहीं.

कांहीं क्षण दोघीहि शांत राहिल्या.

फक्त समईच्या ज्योतीबरोबर माईची सां.ली तेवढी फडफडली.

पण पुष्पाला थंड बसवत नव्हतं.

तिनें मध्येंच ओशाळल्या आवाजांत विचारलं, " एखाद्या मुलावर प्रेम असलं...तर...'

" शहाण्या मुलीनं पुरुषावर प्रेम करूंच नये ! '

माई एवढी फटकळ असेल असं पुष्पाला कधींच वाटलं नव्हतं.

" कां...' "

" पुरुषानें प्रेम करायला पाहिजे ना !

" कां नाहीं ! साहेब —"

'माहीत आहे ! तुझी आई होती तेव्हां ते माझ्याकडे यायचे. ती गेल्यावर त्यांनीं माझ्याशीं लग्न केलं—आतां त्यांना उशीर व्हायला लागलाय —"

सुंदर रूप दाखविणारा आरसा खळकन् निखळून पडला.

पुष्पा लगेच या कुशीवरनं त्या कुशीवर वळली.

तिला वाटलं माईच्या गळ्यांत गळा टाकावा – आणि—

पण नाहीं -

तिनें फक्त तोंडावर पांघरूण ओढलं.

एका रात्रींत ती बालविधवेसारखी प्रौढ नि खिन्न दिसूं लागली.








ारतीय शेतकरी

# " किर्लोस्कर एंजिनानें साथ दिली — उत्पन्नांत भर पडली "

— श्री. भोंसले



मे. किर्लोस्कर ऑईल एंजिन्स लि.
पुणें ३

धोंराभणी
ता. २७-४-५९

स. न. वि. वि.

किर्लोस्कर ५ हॉर्स पॉवर एंजिन नंबर १००९१ हें तारीख १६-९-४९ रोजी मी खरेदी केलें.

एंजिन खरेदी करतेवेळेस इतरांनीं देशी उभें एंजिन न घेतां परदेशी आडवें एंजिन घेणेबाबत शिफारस केली असतांना मीं आपलेंच उभें एंजिन खरेदी केलें व त्यावर किर्लोस्कर B.S.A. ४"x४" पंप बसविला. त्यावेळेस इतरांनीं एंजिन फुटेल असें सांगितलें. तसें कांहीं न होतां आजतागायत सदर एंजिन-पंप व्यवस्थित चालत आहे.

सदर एंजिन-पंपसेटवर मी बागायती जमीन करीत आहे. माझें निव्वळ उत्पन्न रुपये 2000/- आहे.

किर्लोस्कर एंजिन घेतलेपासून चार वेळां रिपेरी केली. त्याचा खर्च अगदीं नाममात्र आला.

आपला विश्वासू

(सही)

(नामदेव शिवराम भोंसले)



## किर्लोस्कर एंजिनांची गरज
## किर्लोस्कर एंजिनेंच भरून काढतात!




किर्लोस्कर ऑईल एंजिन्स लि., खडकी, पुणें ३

KOEL/M-6/59

TOM & BA

COVER PRINTED BY SADHANA ART PRINTERS

अनुक्रमणिका